ग्रंथसंपादक व प्रसारक मंडळीची ग्रंथमाला,

ग्रंथ १९ वा.

# सुलभ परमार्थज्ञानमाला,

## भाग १ ला.

## कर्मयोग, भक्तियोग व राजयोग.

एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति ॥

प्रकाशक,

दामोदर सांवळाराम आणि मंडळी,

बडोदें व मुंबई.

"इंदुप्रकाश" जाइंट-स्टॉक कंपनी प्रेस,

ठाकुरद्वार, मुंबई.

सन १९००.

किंमत १॥ रुपया.

# प्रकाशकांचें हृद्गत

## अथवा

## प्रस्तुत सुलभ परमार्थज्ञानमाला गुंफण्याचा मुख्य हेतु.

—०-०:०:०-०—

**सेवाधर्मः परमगहनो योगिनामप्यगम्यः ॥**



र्वांत सेवाधर्माचें माहात्म्य फार मोठें आहे. इतकेंच नव्हे, तर, सेवाधर्म योग्यांना सुद्धां अगम्य आहे, असें एक प्राचीन संस्कृत कवि ह्मणतो. अर्थात् सत्सेवा हें मोठें पुण्यकर्म होय. अशा प्रकारचें पुण्यकर्म जोडण्याचा सुसमय तूर्त आमच्या भाग्यानें प्राप्त झाला आहे. ह्मणजे प्रस्तुतकाळीं ज्ञानदानाची 'बहुकाळ पर्वणी'च आलेली असल्यामुळें, स्वदेशबांधवांची यथाशक्त्या व मनोभावें सेवा करणें हें एक हल्लीं मोठेंच पुण्यकर्म होऊन राहिलें आहे. आणि त्यांतही आपल्या देशबांधवांची शोधकबुद्धि जागृत व्हावी; खरें सुख व खरा आनंद ज्ञानार्जनांतच आहे हें त्यांस कळावें; आपलें देह सार्थक कशांत आहे, व आपली आत्मोन्नति कशी करून घ्यावी, हें त्यांचें त्यांनींच जाणावें; निदान ह्या त्यांच्या देहसार्थक्याच्या प्रवृत्तीस कांहीं विशेष साधन व्हावें; त्यांची विचारशक्ति, त्यांची नीतिमत्ता, त्यांची प्रयत्नशीलता, व त्यांचें मनःसामर्थ्य हीं वृद्धिंगत व्हावीं; अशा सदिच्छेनेंच जी स्वदेशबांध-

वांची सेवा करावयाची, तिचें फल तर त्याहूनही फार मोठें आहे, असें आह्मीं समजतों. ह्मणजे प्रत्येकानें कोणत्या ना कोणत्या तऱ्हेनें, सद्यःस्थितीस लोकांच्या उपयोगीं पडेल, अर्थात् ती सत्कारणी लागेल, अशी सेवा करणें हेंच उचित होय. सुधारणेचें मुख्य तत्व जें काय आहे, तें हेंच. ह्या तत्वावरच पाश्चात्य राष्ट्रांत ज्ञानाचा एवढा प्रसार झाला, आणि त्यामुळेंच तेथें आजकाल सर्व सिद्धींचें आदिस्थान होऊन राहिलें आहे. हें उच्च तत्व लक्षांत आणून प्रस्तुत मंडळीनें, ग्रंथप्रकाशन व ग्रंथोत्तेजन, ह्या दोन रूपांनीं ही लोकसेवा चालविली आहे. आजपर्यंत आह्मीं बरेच लोकोपयोगी ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. त्यांत कांहीं सामाजिक, कांहीं नैतिक, कांहीं ऐतिहासिक, कांहीं बोधप्रद व कांहीं मनोरंजक असे निरनिराळ्या तऱ्हेचे अनेक लोकोपयोगी ग्रंथ व पुस्तकें आहेत. परंतु मनुष्यांच्या आत्म्यास सर्वतोपरी प्रफुल्लित करून सोडणारें, व अक्षय्य सुख जोडून देणारें जें परमार्थज्ञान, तत्संबंधी एकही ग्रंथ किंवा पुस्तक आमच्या ह्या ग्रंथमालिकेंत आजवर उपलब्ध नव्हतें. ती उणीव दूर करण्याकरितां, आह्मीं ह्या वर्षीं ही **सुलभपरमार्थज्ञानमाला** गुंफून, तींतील **कर्मयोग, भक्तियोग** व **राजयोग** अशीं तीन सुवासिक पुष्पें, आज वाचकांस अर्पण करीत आहों. तेव्हां सर्व साधारण रीतीप्रमाणें, प्रस्तुत ज्ञानमालेच्या पुष्पांतील विचारमकरंद वाचकांस सुलभ व्हावा ह्मणून, परमार्थज्ञान ह्मणजे काय? त्याचें महत्व किती आहे? व त्यापासून शेवटीं लाभ केवढा आहे? इत्यादि विषयांचें विवेचन, प्रथमतः थोडक्यांत केल्यास बरें पडेल असें वाटतें, यास्तव प्रथमतः परमार्थज्ञानाचा संक्षेपतः विचार करून, नंतर प्रस्तुत मालेचें

महत्व, तींतील वर सांगितलेल्या तीन पुष्पांचें सौंदर्य, अर्थात् त्यांची थोरवी, इत्यादि सांगून, शेवटीं आमचा उद्देश व पुढील धोरण कथन करूं.

## पारमार्थिक सुख व परमार्थज्ञान.

सुख हें प्रत्येक प्राणिमात्रास हवें असतें. मनास अखंड शांति, समाधान, किंवा आनंद प्राप्त होणें, हेंच खरें सुख होय. पशूंस इंद्रियज्ञानांत; साधारण मनुष्यांस बुद्धिज्ञानांत; व तत्वज्ञांस अध्यात्मज्ञानांतच सुख वाटत असतें. असे सुखाचे निरनिराळे पर्याय आहेत. मनुष्य जो अहोरात्र इतके जीव तोडून सायास करीत असतो; हवा ह्मा ह्मणून पैसा मिळवीत असतो; लग्न करून मुलाबाळांची खस्ता काढीत असतो; घरदार प्रपंच करून यातायात भोगीत असतो; तो कशा करितां? तर एका सुखाकरितांच होय. अनेक राजकारस्थानी, शोधक, बुद्धिमान् व ज्ञानी पुरुषांच्या आणि अनेक राष्ट्रांच्या सुद्धां ज्या एवढ्या उलाढाली चाललेल्या असतात, त्या कशा-करितां? तर परंपरया एका सुखाकरितांच होत. कोणास चैन; कोणास ख्याली खुशाली; कोणास प्राण्यांचा शोक; कोणास ज्योतिष; कोणास गणित; कोणास काव्यें; कोणास इतिहास; कोणास चित्रकला; इत्यादींची आवड असते. ती कशाकरितां? तर मनास कांहीं काल तरी उत्तम सुख मिळावें ह्मणून! मनुष्येतर प्राण्यांची गोष्टही अशीच. चिमणी; बिचारें इवलेसें पांखरूं! पण दिवसभर खपून कोठून तरी एक एक गवताची काडी पैदा करून घरट्यांत सांठवीत असते. कोळी तो बिचारा काय? पण तीनतीनदां जाळें तुटलें, तरी पुन्हां पुन्हां त्याची चक्राकार धागेबांधणी सुरू

असतेच; दहांदा ढांसळला तरी वाळव्या आपला चिमुकला अर्ध वीत उंचीचा बुरूज पुन्हां पुन्हां उभारीतच असतात; मुंग्यांची तर ह्या वारुळापासून त्या वारुळापर्यंत सारखी फेरच चाललेली असते; तोंडांत पांढरीं शुभ्र अंडीं, व रात्रंदिवस दौड ही तर त्यांची नेहेमीं ठेवलेलीच! हें सर्व इतकें कशाकरितां? तर एका सुखाकरितांच होय. ह्मणजे सुख हें प्रत्येक प्राण्यास अत्यंत प्रिय असतें. त्या एका सुखाच्या आशेनेंच प्राणिमात्रांचे हे सारे प्रयत्न व खटाटोप चाललेले असतात. किंबहुना सुखाकरितांच प्राणिमात्रांचें जीवित आहे, ह्मटल्यास हरकत नाहीं.

आणखी हें सुख उत्तरोत्तर वृद्धिंगत व्हावें, ह्मणून प्राणिमात्रांचे भगीरथ प्रयत्न चाललेले असतात, व आहेतही. ह्यास उदाहरण, पहिलें आपल्या देशांचेंच कां घ्याना? छापखाने, तारायंत्र, आगगाडी, आगबोटी, गिरण्या, पोष्टऑफिसें हीं सर्व आमच्या सुखाचीं केवढीं बरें साधनें होऊन राहिलीं आहेत! हीं पूर्वकाळीं अर्थात् पेशवाई अमदानींत किंवा मराठेशाहींत होतीं काय? आणखी अशींच सुखसाधनें वृद्धिंगत व्हावीं, ह्मणून महान् महान् शोधकांचे केवढाले बरे प्रयत्न चालले आहेत? नाना शास्त्रें व कला उदयास आल्या; अपूर्व शोधांचीं भांडारें खुलीं झालीं; अगणित विद्यादानाची खैरात होऊं लागली; ज्ञानामृताचीं षड्रसान्न-नव्हे नवरसान्न, भोजनें मुक्तद्वार मिळूं लागलीं, अशीं एक का दोन, असंख्य सुखसाधनें भरारत आहेत. ह्याप्रमाणें आमच्या सुखाची एक एक कला रोज वाढतच चालली आहे. आतां दुसरें उदाहरण पाश्चात्य देशांचें. येथें तर काय पहावयासच

नको. येथील एकेक आश्चर्य ऐकावें, तों तों थोडेंच. "सर्वाश्चर्यमयं नभः" ही जशी आकाशाची स्थिति, तशीच येथील अपूर्वाई! तूर्त, पाश्चिमात्य देश ह्मणजे सरस्वतीचें क्रीडागृह; लक्ष्मीचें माहेर; ज्ञानाचें मूळपीठ; कलाकौशल्याची खाण; सुधारणा देवीचें विलासमंदिर; नाना शोधांचें विश्रांतिस्थान; उद्योगशीलतेचें आगर; इतकेंच केवळ नव्हे, तर "सकल सिद्धीचें भांडार"च आहे असें ह्मटलें असतांही शोभेल. येथें संजीवनीसारखीं दिव्य औषधें आहेत; प्रति गंगापुत्र आहेत; प्रति अश्विनीकुमार आहेत, पंचमहाभूतें तर हल्लीं येथें दासासारखींच राबत आहेत. येथील एकेक कल्पक तर असे आहेत कीं, प्रतिसृष्टि करणाऱ्या विश्वामित्रास सुद्धां ते कांहीं दिवसांनीं हात टेंकावयास लावतील. पारिस व चिकागो येथील नुसतीं प्रदर्शनांचीं वर्णनें वाचलीं किंवा ऐकलीं, तरी सुद्धां असें वाटतें कीं, हीं प्रदर्शनें कालांतरानें इंद्राच्या अमरावतीस, किंवा त्याच्या भपकेदार नंदनवनास, किंवा प्रत्यक्ष मायावी मयसभेस सुद्धां मान खालीं घालावयास लावतील. अशा जेथें सकल देवता अगदीं प्रसन्न होऊन राहिल्या आहेत, तेथील सुख काय सांगावें? केवळ अपरिमित; परंतु अशा अपरिमित सुखाचा लोट जरी तेथें निघत आहे, तरी सुखाचीं साधनें सारखीं वाढतच आहेत. सुखाचा हव्यास व लोट सारखा वाढत्या प्रमाणावर चालला आहे. त्यांत तिळभरही कमतरता पडूं नये, ही सारखी लोकांची इच्छा! हल्लीं एकेक अचाट उद्योग व कल्पना ज्या ऐकूं येतात, त्या साऱ्या ह्या इच्छेचींच दर्शकें होत.

परंतु लक्ष्मी ही जशी चंचल, तसें हें आमचें ऐहिक

सुखही चंचलच होय. किती सुधारणा होवो; कितीही सुखाचीं साधनें उदयास येवोत; कितीही कलाकौशल्यांत भर पडो; कितीही ज्ञानामृताचे डोह फुटोत; कितीही शोधांचीं द्वारें खुलीं होवोत; उद्योगधंदा कितीही भरभराटीस येवो; कितीही द्रव्यसंपत्तीचा लोट निघो; ऐश्वर्य कुबेराप्रमाणें कितीही शिखरीं चढो; परंतु कांहीं झालें तरी आमचें हें इहलोकींचें सुख क्षणिकच म्हटलें पाहिजे. "नलिनीदलगतजलवत् तरलं" अशीच त्याची क्षणभंगुरता; किंवा बुडबुडा, कांच व आयुष्य हीं जशीं क्षणभंगुर, तसेंच हें आमचें ऐहिक सुखही क्षणभंगुरच होय. आतांच्या क्षणाला जरी सुखाचीं साधनें वाढत चाललीं आहेत, तरी शेवटीं त्यांचें काय होणार? त्यांस कांहीं तरी सीमा असलीच पाहिजे. आज यंत्रें जेथें बोलकीं झालीं; विजेसारख्या प्रखर शक्तीलाही जेथें जासुदगिरी करावी लागली; वाफेसारख्या सूक्ष्म तत्वाला जेथें सारथ्यकर्म करावें लागलें; पवनराजांना जेथें दिवाबत्ती करण्याचा प्रसंग आला; सहस्त्ररश्मि सूर्यनारायणाला जेथें चिताऱ्याचें काम करणें भाग पडलें; समुद्रकन्या जेथें पांगुळली; शारदेचा खजिना जेथें रिता पडत चालला; ज्ञान जेथें पायधुळींत लोळूं लागलें; सुधारणेस सारखी राजमान्य कामधेनु जेथें दुभतें देऊं लागली; अशा सकलैश्वर्यसंपन्न विद्यमान राष्ट्रांत सुखाचीं साधनें झपाट्यानें वाढलीं तर त्यांत कांहीं विशेष नवल नाहीं. पण तीं वाढणार वाढणार म्हणून तरी किती? अपूर्व शोध झाले; अपरमित सुधारणा झाली; सर्व प्रकारची अनुकूलता झाली; चवदा चौकड्यांची संपदा एकेकाच्या वांटणीस येऊं लागली (अशी कल्पना करूंया); सर्व कांहीं झालें, तरी अखेरीस काय?

त्याची सीमा संपली, व एकदां कालचक्र फिरलें कीं, पडलें सर्व सुखावर पाणी! किंवा इ. स. १८९२ सालांतील *अमेरिकेंतील भयंकर अग्निप्रळयाप्रमाणें एखादा ईश्वरी कोप झाला कीं, गेलें सर्वस्व मातींत! किंवा समजा कीं, एखादा भूकंप झाला तर काय होणार? ती सारी सुधारणा, ते सारे शोध, ती सर्व संपत्ति, ती बुद्धिमत्ता, तीं अप्रतिम नररत्नें, त्यांचीं तीं अचाट यंत्रें, त्यांचें तें अनुपमेय सुख, चटसारें रसातळास जाईल. सुमारें १७।१८०० वर्षांपूर्वी, इंद्रभुवनाप्रमाणें रमणीय अशा पांपी शहराची काय बरें दशा झाली, हें आमच्या इतिहासज्ञ वाचकांस माहीत असेलच. आधीं वसंत ऋतूची काय चैन चालली होती!! सोनें, रुपें तर तेथें खिसगणतींत नव्हतें! पण त्या भयंकर ईश्वरी कोपानें (भूकंपानें) एका क्षणार्धांत सर्व जेथल्या तेथें गडप होऊन गेलें! पर्वतप्राय राखोडीचा ढीग मात्र वर दिसूं लागला!! अशीं, सुधारणेच्या, वैभवाच्या, व सुखाच्या शिखरीं पोंचलेलीं कैक राष्ट्रें जमीनदोस्त होऊन

---

* अमेरिकेंत "ऑइलसिटी" नावाचें एक मोठें शहर आहे. येथें रॉकेलतेलाच्या विपुल खाणी आहेत. रॉकेलतेल हें फार उपयोगी व स्वस्त आहे खरें! पण हें बाळ किती गुणी आहे, हें आवा आमच्या देशांत तरी निदान सर्वांस बहुतेक चांगलें कळून चुकलें आहे. वर नमूद केलेल्या सालीं एके दिवशीं एकदम तुफान वारा सुटून, मुसळ धार पर्जन्य वृष्टि होऊं लागली. तेलाच्या खाणी तमाम भरून वाहूं लागल्या. सर्व शहरांत तेलच तेल होऊन गेलें. इतकें कीं, घरांत राहतां सुद्धां येईना. तशांत तो त्याचा असह्य भपकारा! मग काय विचारावें? आणि त्यांतही त्याच वेळीं अग्निनारायणांनीं त्यांस मध्येंच येऊन सहाय्य केलें. मग तो अनर्थ काय पुसावा? १०००० ची वस्ती, पण बहुतेकांचा स्वाहा झाला!

गेलीं. बाबिलोन, निनवे, बगदाद, रोम, कार्थेज इत्यादि नर-वीर रत्नांनीं खचलेल्या, व ऐश्वर्याच्या शिखरीं पोंचलेल्या राष्ट्रांचें पूर्व वैभव आतां राहिलें आहे काय? त्यांतील कांहीं शहरें तर हजारों वर्षांपूर्वींच पार धुळीस मिळालीं! व त्यांचें सुखही त्यांजबरोबरच लयास गेलें! त्यांचें नांव सुद्धां शिलक राहिलें नाहीं. त्या त्या कालाच्या मानानें त्यांनीं सुखाचीं साधनें चांगलीं करून ठेविलीं होतीं, ह्यांत कांहीं संशय नाहीं. दुःखाकरितांच, किंवा नाश व्हावा म्हणूनच तर कोणी कांहीं करीत नाहीं? सर्व खटपट सुखाकरितांच चाललेली असते. पण नेहेमीं होत असतें मात्र त्याच्या उलट! सुखाकरितांच सर्व कांहीं करावें, व बरेच दिवस कांहीं सुख म्हणून भोगावें, आणि अखेरीस त्याचें पर्यवसान दुःखांत व्हावें, हें नेहेमीं ठरलेलेंच असावयाचें! म्हणजे सुख संपलें कीं दुःख व दुःख संपलें कीं सुख, ही परंपरा नेहेमींच चाललेली असते. आमच्या त्या हिंदुस्थान देशांत तरी काय पूर्वी सुख कमी होतें? एकाकालीं तर येथील घोर वनें सुद्धां नंदनवनाप्रमाणें आनंदप्रद होतीं! शांतीची तर येथें अक्षय्य बैठक, लक्ष्मीचा तर येथून पाय निघत नसे; गजांतलक्ष्मी तर येथें ठेवल्यासारखी; आनंदाचें तर येथें घर असे; गाईचीं खिल्लारें, गोरस विपुल, धान्याची समृद्धि, भूमि सुपीक, अशी जिकडे तिकडे अवर्णनीय समाधान स्थिति असे. नल, दुष्यंत, दाशरथि राम, हरिश्चंद्र, युधिष्ठिर, असलालीं रणधीर, दानशूर, सत्यव्रत व पुण्यश्लोक राजरत्नें येथें अनेक चमकत असत. सत्य, न्याय, व पुत्रवत् प्रजापालन हें तर राजांचें ब्रीद; आणि शांततासुख हें तर प्रजेचें दैवत असे.

मराठेशाहींत व पेशवाईच्या अमदानींत तरी काय सुखाचीं साधनें कमी होतीं? त्या कालाच्या व परिस्थितीच्या मानानें बरींच होतीं म्हणावयास हरकत नाहीं. तो सर्व इतिहास बहुतेकांस माहित असल्यामुळें येथें अधिक लिहिण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. पूर्वी हा देश म्हणजे सुवर्णभूमि असे; पण अरेरे! आतां, येथील द्रव्यनिधीला ओहोट लागली; प्रजा बिचारी कंगाल झाली; अन्नास मोताद होण्याची वेळ आली! हें तर आम्हीं हल्लीं डोळ्यांनीं पाहत आहों—म्हणजे "कामधेनूचें वांसरूं। खाया न मिळे काय करूं?॥" अशीच तूर्त येथील दशा झाली आहे! तीच गोष्ट येथील जुन्या राज्यांचीं व शहरांचीं! त्यांचे एकेक पूर्व इतिहास श्रवण केले, म्हणजे मन किती बरें रमतें? पण आतां तीं नामशेष होऊन तेथील पडझड पाहिली म्हणजे त्यांची पूर्वीं सुखांत लोळलेल्या वेळची स्थिति व आतांच्या वेळची स्थिति ही चटकन मनांत येऊन मन अगदीं उदास होतें, आणि त्या बरोबरच

पुरा यत्र स्रोतः पुलिनमधुना तत्र सरिताम्।
विपर्यासं यातो घनविरलभावः क्षितिरुहाम्॥
बहोर्दृष्टं कालादपरमिव मन्ये वनमिदम्।
निवेशः शैलानां तदिदमिति बुद्धिं द्रढयति॥ १॥

ह्या भवभूतीच्या श्लोकाचें चित्र डोळ्यापुढें मूर्तिमंत उभें राहतें! असो. इतका विस्तार करून सांगण्याचें तात्पर्य काय कीं, एकाकाळीं एके ठिकाणीं सुखाचीं साधनें वाढवाढ वाढतात, व कालांतरानें धुळीस मिळतात, मग त्यांचा मागमोस सुद्धां राहत नाहीं, हा सृष्टीचा नियमच आहे.

ऐहिक सुख हें असें क्षणभंगुर आहे, हें पदोपदीं जरी अनुभवास येतें, तरी मनुष्याचा सुखाचीं साधनें उत्तरोत्तर वाढविण्याचा सारखा प्रयत्न चाललेलाच असतो. ज्याच्या घरांत अन्नाची भ्रांत; अठराविश्वे दरिद्र; " मुलें भुकेनें करिती तंटा; घरांत वाजे नकार घंटा " अशी दुर्धर स्थिति असते, अशा मनुष्याची देखील ह्या ऐहिक सुखार्थ सारखी जिवापाड मेहनत चालत असलेली दृष्टीस पडते. ज्यांस आज सर्व कांहीं अनुकूल आहे, अशा भाग्यवानांचा व ज्यास कोणीकडूनही ( दारिद्र्य खेरीज करून ) दैव अनुकूल नाहीं, अशा भाग्यहीनांचा, दोवांचाही प्रयत्न त्यासाठींच चाललेला असतो. असें कां? तर त्यांत मनुष्याचा मुख्य उद्देश हा दिसतो कीं, आपणास कायमचें अर्थात शाश्वत सुख मिळावें; व प्रयत्नानें केव्हां तरी तें मिळेल, असा त्याचा समज असतो. आणखी त्यासाठींच तो अविश्रांत श्रम करून, हर प्रयत्नानें चार दोन पैसे गांठीस बांधीत असतो; व घरदार, लग्न, मुलेंबाळें करून, कुटुंब जोडून राहत असतो. पण, त्याजपासून त्यास असें कायमचें सुख मिळतें काय ? तर नाहीं, असेंच ह्मणावें लागेल. सुखाचें सर्वांत मोठें साधन "कनक आणि कांता" हेंच काय तें आहे असें मनुष्यांस वाटत असतें. पण त्यांच्या सारखें दुःखदायक व अनर्थकारक दुसरें कांहीं नाहीं! असें आजपर्यंत सत्कवि व सत्पुरुष ह्मणत आले. आणखीं तशा तऱ्हेचीं उदाहरणें कैक घडून आलेलीं आहेत व येत आहेत. पैशानें सर्व कांहीं मिळतें, ही गोष्ट खरी! परंतु क्षुल्लक कारणासाठीं जिवास तळतळ लावून सोडणारा, 'एकोत्र्याच्या वाढीसाठीं आगींत उडी घालावयास लावणारा,' व एवढ्या

तेवढयानें अगदीं गहजब करून, अंतीं सर्वस्वीं फशीं पाडणारा तोच होय. तेव्हां त्यापासून मनुष्यास खरें सुख कितपत होत असेल, हें दिसतेंच आहे! कांतेची गोष्टही तशीच. ती जर सुशील, मनमिळाऊ, समजूतदार व संसारदक्ष असली, तरच बरी! नाहीं तर तें सुख काय विचारावें? हालापरी हाल होऊन, जगांत हंसें मात्र होऊन बसावयाचें! आणि जगांत " चांगलें तितकें थोडें, किंवा अल्पायुष्यी " हा सृष्टीचा नियमच असल्यामुळें, तशाच तऱ्हेचीं उदाहरणें फार! बरें एखाद्यास कुटुंबांत कांतेचें सौख्य चांगलें असलें, तर पैसाच हवा तसा नसतो! किंवा एखाद्याजवळ पैसा वगैरे विपुल असला तर त्यास कुटुंबसौख्य किंवा मन:स्वास्थ्य तरी चांगलें नसतें! मिळून काय? सारा छत्तिसांचा आंकडा! बरें एखाद्याजवळ कनककांतेचेंही यथास्थित सुख असलें, तरी शेवटीं काय? त्यास तर शाश्वत सुख हवें असतें. शाश्वत ह्मणजे मरणकालपर्यंत, मरणसमयीं, व मरणोत्तरही सुख हवें. पण तें त्यास द्रव्यानुकूलतेनें वगैरे मिळतें का? तर नाहीं. एकादे वेळीं मरणकालपर्यंत कदाचित् जेमतेम सुख मिळेल. परंतु पुढें त्यांतील एक कपर्दिकही बरोबर येत नाहीं, कीं भोंवतालच्या जिव्हाळ्याच्या ह्मणून मानलेल्या आप्त इष्टमित्रांपैकीं एकही सहाय्यास किंवा मरणोत्तर सुखदु:खाचा वांटेकरी व्हावयास येत नाहीं! पुराणांतरींची वाल्मीकऋषीची गोष्ट जगजाहीरच आहे. बिचाऱ्यानें जन्मभर लोकांचें गळे कापून द्रव्यार्जन केलें व बायकामुलांची भर केली. पण अखेरीस जेव्हां कळून आलें कीं, बायकामुलांपैकीं कोणीही आपल्या पाप पुण्याचा वांटेकरी व्हावयास तयार नाहीं, तेव्हां बिचाऱ्याचे डोळे उघडले! आणि

एकदम खरी उपरति आंगांत आणून ज्ञानमार्गाकडे वळला. बिचारा महमूद गझनी! केवढा कर्तुमकर्तुं बादशाहा! ज्यानें मींमीं ह्मणत बारा स्वाऱ्या करून, हजारों मुलूख काबीज केले; कांहीं दिवस हिंदुस्थानावर आपलें वर्चस्व मिरविलें; सोरटी सोमनाथासारखीं ऐश्वर्यसंपन्न देवालयें लुटून "बुत्‌फरोश"—"मूर्ति विकणारा"—पेक्षां "बुत्‌शिकन्"—"मूर्ति फोडणारा"—अशी उज्वल कीर्ति संपादून, अपार संपत्ति खेंऱ्यानें ओढून नेली; त्या पराक्रमी, तेजस्वी, व संपत्तिमान् बादशहाची मरणसमयीं काय बरें अवस्था झाली? प्राणोत्क्रमणाची वेळा जेव्हां जवळ आली, आपल्या पूर्वकर्मांचें स्मरण होऊन मरणोत्तरस्थितीचें चित्र जेव्हां डोळ्यांपुढें दिसूं लागलें, तेव्हां त्यास स्वकष्टार्जित अपार संपत्तीबद्दल फार हळहळ वाटूं लागली. "सर्व संपत्तीचा मजसमोर ढीग घाला" ह्मणून त्यानें जवळच्या सेवकांस फर्माविलें, आणि शेवटीं तो हुकूम अमलांत आल्यावर, मोठ्या निरुपायानें आपल्या दौलतीचें एकदाचें शेवटचें दर्शन त्यास घ्यावें लागलें. त्यावेळीं ही सर्व संपत्ति आतां आपणास टाकून जावें लागणार ना? ह्मणून त्यास रडूं सुद्धां आलें. याचें कारण काय? तर मरणकालपर्यंत द्रव्याची कमाई कितीही जरी केलेली असली; कांता कितीही जरी सर्वगुणसंपन्न, सुस्वरूप व स्वभावानें चांगली असली; कुटुंबसौख्य कितीही जरी असलें; मुलेंबाळें, घरदार, धनधान्य कितीही जरी समृद्ध असलें; तरी त्यांपैकीं, शेवटीं मरणोत्तर मनुष्याबरोबर कांहींही येत नाहीं. ह्मणूनच, तुकारामासारख्या महासाधूनें—

**धन मेळवुनी कोटी। सवें न येरे लंगोटी॥**
**पलंग न्याहाल्या सुपती। अंतीं गोंवऱ्या सांगाती॥**

असलाले हृदयांत विरक्ति बाणविणारे उद्गार काढले आहेत. एवंच, ऐहिक किंवा प्रापंचिक सुख हें कांहीं खरें शाश्वतीचें सुख नव्हे.

तर मग ऐहिक सुख जर खरें शाश्वतीचें सुख नव्हे, तर खरें सुख तरी कोणतें? आणि तें कशांत व कोठें आहे? शाश्वतीचें सुख तरी असें कोणतें, कीं ज्यापासून मनास अखंड समाधान प्राप्त होईल? सुखाचे प्रकार दोन आहेत. एक ऐहिक किंवा प्रापंचिक सुख; आणि दुसरें पारमार्थिक सुख. त्यांपैकीं ऐहिक किंवा प्रापंचिक सुखाचें निरूपण वर बहुतेक केलेंच आहे. आतां, उरलें पारमार्थिक सुख. हें सुख मात्र खरें, शाश्वतीचें, किंवा सर्व सुखांत श्रेष्ठ ह्मटलें पाहिजे. कारण, परमार्थ ह्याचा अर्थच तसा खोल आहे. परम ह्मणजे मोठा; आणि अर्थ ह्मणजे हेतु. ही त्याची व्याख्या. ह्मणजे आपल्या आयुष्यांत जो मोठा हेतु साधावयाचा, त्याचें नांव परमार्थ. मोठा हेतु ह्मणजे "मीं आज हें मिळविलें; आतां अमुक मनोरथ प्राप्त होईल; हें तर मजजवळ आहेच; आणि हेंही द्रव्य माझेंच होईल."* अशा प्रकारचा नव्हे. हे सर्व ऐहिक किंवा प्रापंचिक हेतु होत. ह्यांच्या योगानें समाधान तर कांहींही होणार नाहीं. उलट तृष्णा मात्र अधिकाधिक वाढत जाईल. कारण, प्रपंच ह्याचा अर्थच तो आहे. प्र ह्मणजे पुढें किंवा प्र ह्मणजे प्रगति असाही अर्थ घेतल्यास हरकत नाहीं. आणि पंच ह्मणजे पंचमहाभूतें. ह्मणजे पंचमहाभूतांची

---

*"इदमद्य मयालब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम्।
इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम्॥
(श्रीमद्भगवद्गीता.)

( अर्थात् सर्व विश्वाची ) जी प्रगति किंवा उलाढाल, त्याचें नांव प्रपंच. संसार ह्याचा अर्थही तोच होतो. सं ह्मणजे एकत्र फिरून फिरून, आणि सृ--सर--चळवळ करणें. ह्मणजे एकसारखी, चक्राप्रमाणें चालत असलेली जी विश्वाची घडामोड त्याचें नांव संसार. अर्थात् प्रपंच व संसार ह्या दोहोंचा अर्थ एकच होय. तेव्हां, प्रत्येक प्राण्याच्या मागें जन्मल्यापासूनच संसार लागला आहे, असें ह्मणणेंही सयुक्तिक दिसेल. नाश होईतोंपर्यंत एकएक पदार्थ जोडावयाचा, आणि त्यांची मर्यादा संपली कीं त्याचा वियोग व्हावयाचा, हें रहाटगाडगें ठरलेलेंच आहे. ह्या अखिल ब्रह्मांडांतील यच्चयावत् वस्तूंची स्थिति हीच! ह्याचेंच नांव विश्वाची घडामोड! हें गेलें कीं तें; तें गेलें कीं हें. ही ह्या इहलोकींची दशा! तेव्हां वर सांगितलेले प्रापंचिक हेतु सिद्धीस गेले तरी त्यांपासून खरें सुख तें कितीसें होणार? ह्या प्रापंचिक सुखाची दशा वर यथातथ्य वर्णिलीच असल्यामुळें येथें अधिक सांगणें नकोच. तर आपणास मोठा हेतु जो साधावयाचा तो हा कीं, जेणेंकरून आपणास इहलोकीं व परलोकीं सुद्धां अखंड समाधानसुख प्राप्त होईल. ज्यानें हरप्रयत्नेंकरून हें पारमार्थिक सुख संपादन केलें असेल, तो परमसुखी समजावा. असो.

आतां, ह्या पारमार्थिक सुखाची थोरवी किती आहे? परमार्थाचें मुख्य तत्व काय? त्यानें संपादावयाचें काय? परमार्थज्ञान तें कोणतें? त्याचा रोख, त्याचा शेवट, व त्याची दिशा कोणती? पारमार्थिक सुख तें कोणतें? आणि शेवटीं तें साध्य करण्याचे मार्ग कोणते? इत्यादि विवेचन थोडक्यांत करून हा परमार्थज्ञानाचा विचार संपवूं.

ह्या आमचा मनुष्यदेह परम दुर्लभ होय. ही ईश्वराची आह्मांस केवळ अमोलिक देणगी आहे. रामदास ह्मणतातः– " नरदेह हें नाना गुणांचें आगर; परमार्थविचाराचें स्थान; व परलोकींचें तारूं आहे." तें अक्षरशः खरें आहे. ह्या मनुष्य जन्मांत विवेकबळानें, प्रयत्नानें, किंवा नियमित अभ्यासानें काय हवें तें प्राप्त होतें. हल्लीं पाश्चात्य देशांकडे– तेथील सुधारणा, अचाट उद्योग, भगीरथ प्रयत्न, अपूर्व शोध, विशाल बुद्धिमत्ता, इत्यादि गोष्टींकडे- नजर फेंकली असतां, कोणासही ह्या वचनाची सत्यता दिसून येईल. इतर कोणत्याही प्राण्यास ज्या देणग्या कधींही मिळावयाच्या नाहींत, त्या देणग्या परमेश्वरानें मनुष्य प्राण्यास बहाल केल्या आहेत. वाचा, बुद्धि, आणि ज्ञान ह्या तीन तर फारच थोर देणग्या होत. हीं तीन अमोलिक साधनें मनुष्यावांचून इतर कोणत्याही प्राण्यांत एकवटलेलीं दिसत नाहींत. ह्मणून मुख्यतः ह्या तीन साधनांवरच मनुष्य केवळ जगज्जेता व कर्तुमकर्तुं होऊन बसला आहे. नाहीं तर मनुष्य ह्मणजे केवळ पंगु केवळ दीनगायच होय. बिचाऱ्या बोट अर्धबोट लांबी रुंदीच्या, केवळ नखानें चिरडल्या जाणाऱ्या, एका यःकश्चित विंचवानें एक नांगी मारली कीं, झाला मनुष्य घाबरा! लागला " आई आई " करावयाला! एक साप दृष्टीस पडला; एक बैल आंगावर आला; किंवा वाघाची एक गर्जना ऐकली; कीं लागला धूम पळावयाला! बसलीच पांचावर धारण!! ही बिचाऱ्याची शारीरिक दैना! पण तोच स्वस्थानीं येऊन बुद्धिप्रभाव गाजवूं लागला कीं, मग पहा ने! मग प्रत्यक्ष पंचानन सुद्धां त्यापुढें गोगलगाय; हजारों जहाजांस जलसमाध देणारा समुद्र सुद्धां ह्याचा दास; " पृथ्वीच्या

समोंवार एक घटकाही न लागतां, एकाच उड्डाणाबरोबर सातां समुद्राला प्रदक्षिणा घालणारा" तुफान वारा सुद्धां त्याचा अंकित; आपल्या कडकडाटानें, दिव्य प्रभेनें, व अलोट शक्तीनें भूभागावर कल्पांत करून सोडणारी प्रखर विद्युच्छक्ति सुद्धां त्याच्या अर्ध्या वचनांत !! असें त्याचें सामर्थ्य आहे. इतकेंच नव्हे, तर, आपल्या अस्सल कर्तबानें, अव्वल हुशारीनें, व अजब करामतीनें " नरका नारायण " होण्याची सुद्धां त्यांच्या अंगीं योग्यता आहे. यत्न, फिरून यत्न, किंवा झटून अभ्यास मात्र हवा. मग त्याची चीज पहावी! अहाहा! ह्या मनुष्यदेहावर, प्रथमपासूनच परमेश्वराची केवढी कृपा आहे बरें !! तेव्हां, अशी ज्याची योग्यता, असें ज्याचें सामर्थ्य, व अशी ज्यावर परमेश्वरी कृपा, तो नरदेह जर आपणास भाग्यानें प्राप्त झाला आहे, तर मनुष्याच्या हातून त्याच्या बुद्धिवैभवास साजेसें त्याचें सार्थक व्हावयास नको काय ? अवश्य. तें तर त्याचें आद्यकर्तव्य आहे. असें आद्यकर्तव्य कोणतें, तें वर सांगण्यांत आलेंच आहे. ह्मणजे मनुष्यानें परमार्थाचा विचार केला पाहिजे. केवळ संसार केला; घोडा गाडी, शेतवाडी, जमीनजुमला हीं मिळविलीं ह्मणजे कांहीं झालें नाहीं. नाना व्यापार, उदीमधंदे केले; अमूप पैसा मिळविला; मानमान्यता संपादिली; ह्मणजे कांहीं झालें असें होत नाहीं. प्रपंच हा प्रत्येकानें केलाच पाहिजे. त्यावेगळें गत्यंतरच नाहीं. कारण, कसाही सुशिक्षित असो; कीं अशिक्षित असो; लहान असो, कीं थोर असो; स्त्री असो, कीं पुरुष असो; तसेंच पशु असो, कीं पक्षी असो; कृमि असो कीं कीटक असो; इतकेंच नव्हे. तर वृक्ष असो, कीं वल्ली असो;

कसलाही सजीव पदार्थ असला कीं पुरे! इहलोकीं असेपर्यंत त्याच्या मागचा प्रपंच हा कांहीं कधीं सुटावयाचा नाहीं. ह्मणजे, प्रत्येकास, आपण हयात असेपर्यंत दुसऱ्याचा ( प्राण्याचा किंवा वस्तूचा ) कशाही-कोणत्या ना कोणत्या तऱ्हेनें उपयोग हा करून घेतला पाहिजे. याचेंच नांव प्रपंच! ह्मणजे व्याप; आणि व्याप तितका संताप! मग सुख व सार्थक कशाचें? असें जरी आहे, तरी, ह्या प्रपंचांतच नीटनेटकेपणानें राहावें, आणि त्याची क्षणभंगुरता पूर्ण लक्षांत आणून, त्यांत विशेष आसक्ति न ठेवतां, परमार्थाचा विचार करून देहसार्थकाची दिशा धरावी. सुधारलेल्या राष्ट्रांनीं कितीही नव्या नव्या कल्पना काढल्या; माणसांचीं सुखदुःखें जाणून कितीही ज्ञान वाढविलें; कितीही यंत्रें काढलीं व कितीही सुधारणा केली; तरी कांहीं मनुष्यजन्माची इतिकर्तव्यता किंवा देहसार्थक झालें असें होत नाहीं. कारण, पाश्चात्य राष्ट्रांनीं आपल्या अगाध कल्पनाशक्तीनें हजारों धन्वंतरि, हजारों अश्विनीकुमार व हजारों संजीवनी जरी निर्माण केल्या, तरीही वस्तुनाश किंवा मरण हें कांहीं मनुष्यास टाळतां येत नाहीं. ह्मणजे:—

**यदि प्राप्तिं विघातंच जानन्ति सुखदुःखयोः ।**
**तेप्यद्धा न विदुर्योगं मृत्युर्न प्रभवेद्यथा ॥ १ ॥**

"त्यांना, सुख कसें मिळवावें, व दुःख कसें घालवावें, तें कळत असतें, तरी पण प्रत्यक्ष मृत्यूचें सामर्थ्य चालणार नाहीं कशानें; तो उपाय मात्र त्यांना ठाऊक नसतो." असेंच ह्मटलें पाहिजे. तेव्हां मृत्यु जेथपर्यंत आपणास टाळतां आला नाहीं, तेथपर्यंत आमची ही सर्व सुधारणा, हीं आमचीं ऐहिक सुखें,

व त्यांचीं साधनें अगदीं कुच कामाचीं होत. हें अगदीं निर्वि-
वाद आहे. ह्मणून मनुष्यानें मरण हें आपणास केव्हां तरी
येणारच. तें कांहीं केलें तरी चुकावयाचें नाहीं, हें मनांत
वागवून आपल्या देहसार्थकाचा विचार अवश्य केला पाहिजे.
आपलें जन्म झालें कसें? आपला जन्मदाता कोण? गर्भाव-
स्थेंत आपला पोशिंदा कोण? जन्म हें काय आहे? आपण
शेवटीं कोठें जाणार? अर्थात् मरणोत्तर माझी अवस्था काय
होणार? ह्या सृष्टीचा नियंता कोण? हें सृष्टिचक्र कसें चाललें
आहे? चंद्र, सूर्य, पृथ्वी, तारे, वृक्षवनस्पति; पशु, पक्षी, जलचरें,
इत्यादि प्राणिजाती; पाणी, वारा, आकाश, हें सर्व कसें निर्माण
झालें? ह्या ब्रह्मांडांत सत्य काय आहे? इत्यादि गहन प्रश्नांचा विचार
करावयाचा व खरें ज्ञान संपादावयाचें, मनुष्यजन्माचा
प्रधान हेतु; आणि हाच परमार्थाचा विचार होय. हा विश्वप्र-
पंच हाच मायापाश होय, हें जाणून, ह्या प्रपंचचक्रांतच धर्म,
अर्थ, काम हे तीन पुरुषार्थ उत्तमरीतीनें साधावयाचे, व शेव-
टीं चवथा पुरुषार्थ जो मोक्ष, म्हणजे ह्या मायापाशांतून सुट-
का करून घेणें, तोही उत्तम रीतीनें साधावयाचा, म्हणजे
स्वदेहस्थितीचा व आत्मस्थितीचा सूक्ष्म व पूर्ण विचार
करून अखंड सुख साध्य करावयाचें, हाच परमार्थाचा रोख
होय सन्मार्गानें चालणें, धर्मनीतीस अनुसरून वागणें, परो-
पकार करणें, सर्वाभूतीं समानभाव ठेवून शत्रूंचें व मित्रांचें
ही कल्याण चिंतणें, अर्थात् अगदीं निर्मळ अंतःकरणानें
जगांत राहणें, साधुसंतांची पूजा करणें, तसेंच ईश्वरभजनीं
लागणें इत्यादि गोष्टींचा ह्या परमार्थांतच समावेश होतो. त-
थापि हा सर्व नीतिशास्त्राचा भाग होय. खरें परमार्थज्ञान म्ह-

णून जें काय आहे, तें खालील प्रश्न सोडविण्यांतच आहे. "मीं कोण?" "आत्मा म्हणजे काय?" "परमात्मा तो कोण?" "त्याचें स्वरूप काय?" "त्याचें सामर्थ्य केवढें?" "प्राण म्हणजे काय?" "मन, त्याचे गुण व शक्ति कशीं असतात?" इत्यादि गहन प्रश्नांचा विचार करणें, हें काम वरील प्रश्नांच्या विचाराहूनही श्रेष्ठ आहे. त्यांतही, "मीं कोण?" हा सर्वांत गहन प्रश्न होय. ह्या एका प्रश्नाचा उलगडा झाला, त्याचें सत्यस्वरूप समजलें, त्यांचें खरें ज्ञान झालें, कीं सर्व परमार्थज्ञानाचा उलगडा झाला; ह्या सृष्टियंत्राचें मूल-सत्य-स्वरूप समजलें; सर्व दृश्य व अदृश्य शक्तींचा ठेवा नजरेस पडला; आणि सर्व अखंड-सुखाची गुरुकिल्ली हातीं आली, म्हणून खास समजावें. वेद, उपनिषदें, गीता, भागवत, पुराणें, माहात्म्यें ह्या सर्व ग्रंथांत ह्याच प्रश्नाचा उलगडा करण्याचा प्रयत्न केलेला आहे. त्यांत सारा परमार्थसुखाचाच विचार भरलेला आहे. फार तर काय, पण सर्व धर्मग्रंथांत अर्थात् बायबल, कुराण इत्यादि परकीय धर्मग्रंथांतसुद्धां सारा ह्या परमार्थाचाच ऊहापोह केलेला आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. धर्म व नीतिशास्त्रें ह्यांचा जन्मच मुळीं परमार्थासाठीं!! "मीं कोण?" हा प्रश्न सकृद्दर्शनीं जितका सोपा दिसतो, तितकाच तो अवघड आहे इतकेंच नव्हे. तर, वर परमार्थविचारासंबंधीं जे इतर प्रश्न घातले आहेत, त्या सर्वांचा उलगडा होण्यास जितका काल लागेल त्याहूनही "मीं कोण!" येवढा प्रश्न सोडविण्याला अधिक काल लागेल, ह्यांत संशय नाहीं. कारण, हा प्रश्न तसाच गहन आहे. "मी" ह्याचा शोध अनंत; विचार अनंत; व त्याचा

काळही अनंतच आहे, ह्मटल्यास चालेल. मीं ह्मणजे हात, मी ह्मणजे पाय, कां मी ह्मणजे डोकें, मी कोण? कां मी ह्मणजे झाड, मी ह्मणजे पशु, कां मी ह्मणजे पक्षी? मी कोण? मी ह्मणजे सूर्य, का मी ह्मणजे चंद्र, का मी ह्मणजे आकाश? मी कोण? आपला एखादा हात भाजला, किंवा पाय मोडला, तर माझा हात भाजला, माझा पाय मोडला, असें आपण ह्मणतों. पण मी भाजलों, किंवा मी मोडलों असें आपण ह्मणत नाहीं. ह्याचें कारण काय? तर "मी" ह्मणून जें काय तत्व आहे, तें उघड उघड देहातीत आहे, असें दिसून येतें. अर्थात् तें इतर सर्व देहाहूनही वेगळें असलें पाहिजे. इतकेंच नव्हे; तर ह्या अखिल विश्वांतील सर्व चराचर वस्तूंहूनही तें भिन्न आहे. तेव्हां उघडच झालें कीं, तें सूर्यही नव्हे; चंद्रही नव्हे; पशुही नव्हे. तर तें सर्व शक्तिमान्; अखिल तेजोमय; अजरामर; अखंड व शाश्वत होय. तें जरी सर्व वस्तूंहून अतीत आहे, तरी तें सर्व वस्तूंत विद्यमानही आहे. पण सर्व वस्तु मात्र * तें नव्हत. तर तें आहे ह्मणून त्या सर्व वस्तु अस्तित्वांत आहेत. नाहीं तर त्यांचा मागमूस सुद्धां लागताना! तें एकच अद्वितीय आहे. ह्या सर्व अकटोविकट विश्वाच्या मुळाशीं सत्य ह्मणून जें काय आहे, तें तेंच; सर्व सुखांचें आदिस्थान काय तें तेंच! त्याचें सत्यस्वरूप समजलें; त्याचा प्रभाव एकदां कळून चुकला; कीं आपण सर्वज्ञ झालों, व ह्या जन्ममरणाच्या तडाक्यांतून सुटलों ह्मणून

---

* "एष सर्वमिदं विश्वं न विश्वं चैष सर्वगः।
विद्यते ह्येष एवैको न तु विश्वाभिधास्ति दृक्॥ १॥"
(योगवासिष्ट स. ७)

समजावें. ह्याच तत्वाला प्राचीन आर्य तत्वज्ञांनीं " आत्मा " अशी संज्ञा दिलेली आहे. आणि ह्या आत्म्याचें जें अत्युच्च स्वरूप, तो परमात्मा होय. चारही वेदांत ह्या आत्म्याचा विचार करून, त्याचें ज्ञान संपादून, नानाप्रकारच्या हृदयंगम स्तोत्रांनीं त्यास आळविलें आहे. आणि इतकेंही करून त्याचें बरोबर वर्णन होईना (कारण, हें तत्व बुद्धीस अगम्य आहे. ), ह्मणून शेवटीं " नेति नेति "–न इति–इति–ह्मणजे हेंही नव्हे, तेंही नव्हे–असें ह्मणून वेदांनीं हात टेंकले. त्या एका आत्म्याचा–अर्थात् आदिशक्तीचा–विचार करण्याकरितांच मोठमोठाले महंत सर्व संसारसुखावर पाणी सोडून, विरक्त होत्साते, घोर रानावनांत, खोल व अंधारमय गिरिकंदरांत वास्तव्य करीत आले. प्राचीनकाळीं महान् महान् ऋषि निर्जन अरण्यांत आश्रम स्थापून, कंदमूळ फळें सेवन करून, एकांतवासांत राहत असत, ते त्या एका आत्म्याच्या प्राप्तीकरितांच होत. विश्वामित्रासारखे राजर्षि लोहपिष्ट भक्षण करून दहा दहा हजार वर्षे तपश्चर्या करीत राहिले ( असें पुराणांतरीं वर्णन आहे ) ते तरी ह्या एका आत्मशक्तीच्या सिद्ध्यर्थच होत. कित्येकांनीं तर त्या एका आत्मप्राप्तीकरितांच, ब्रह्मानंदांत निमग्न होऊन, आंगावर वारुळेंच्या वारुळें वाढवून घेतलीं !! ह्या आत्म्याचा विचार करून, त्याचा अभ्यास करून, त्याचें स्वरूप जाणून, त्याचें ज्ञान संपादून, त्याचा अंतरीं अनुभव घेऊन, कैक महामुनि तत्स्वरूपच होऊन राहिले, व त्याची शक्ति साध्य करून बसले. व्यास, वाल्मिक, पराशर, नारद, शुक महामुनि, कपिल महामुनि, पातंजली, वसिष्ट, विश्वामित्र, जनक वगैरे महान् महान् आत्मज्ञानी होऊन गेले. त्यांनीं आत्म्याचें स्वरूप

जाणलें होतें, व ते अखंड मुक्त होऊन, ह्या मायापाशांतून सुटून, खरे सुखी होऊन बसले होते, यांत कांहीं शंका नाहीं. उदाहरणार्थः-जनकच घेऊं या. जनक हा खरें पाहतां मोठा पराक्रमी राजा, अनेक देशांचा अधिपति. अर्थात् त्याच्या मागें अनेक व्याप असावयाचे; वारंवार मनोवृत्ति चंचल होण्याचे अनेक प्रसंग त्याजवर यावयाचे ! असें असतां, केवळ विवेक-बळानें त्यास केवढें विलक्षण ज्ञान झालें होतें पहा! नेहमीं एकीकडे एक हात स्त्रियेच्या स्तनावर, व दुसरीकडे एक पाय अग्नींत, अशा अपूर्व थाटांत स्वारी सुवर्ण मंचकावर शयन करावयाची !! पण मनास कोणताही विकार कधीं व्हावयाचा नाहीं !! उलट आत्मानंदांत मग्न ! केवढी आत्मशक्ति !! हा सारा आत्मज्ञानाचा प्रभाव होय. शंकराचार्य, गौतमबुद्ध, रामानुज, असलाले महात्मे अर्वाचीनकाळीं असलेच आत्मज्ञानी होऊन गेले. ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास, कबीर, नानक, वगैरे जे महान् साधुसंत, योगी होऊन गेले त्यांनीं तरी काय ? हें सर्व शक्तिमान तत्वच साध्य करून घेण्याचा प्रयत्न केलेला होता. तत्वज्ञान हां ह्या आत्मज्ञानाचाच पर्याय होय. ह्मणजे तत्वज्ञानांत शिरणें, हें आत्मज्ञानाचाच अभ्यास केल्यासारखें आहे. तेव्हां सॉक्रेटीस, आरिस्टॉटल्, प्लेटो, सेन्टबर्नार्ड, मार्कस, ऑरोलियस, सोलन वगैरे वंदनीय पाश्चात्य पुरुषांनीं, जो सारा जन्म तत्वज्ञानांत घालविला, तो तरी हें सर्व शक्तिमान् आत्मतत्व आपणास साध्य होईल, या आशेनेंच घालविला ह्मणण्यास हरकत नाहीं. ख्रिस्त व महंमद ह्यांचाही धर्मस्थापनांत मूळ हेतु हाच असावा. एकंदरींत असलाल्या महान् महान् तत्वज्ञान्यांनीं, व आत्मज्ञा-

ऱ्यांनीं, त्या आत्म्याचें–त्या अनादिसिद्ध आदिशक्तीचें–त्या अखिल सत्यतत्वाचें–अभ्यासानें व विचारानें ज्ञान करून घेऊन, अखंड–शाश्वत–सुख संपादन केलें असेल व इहलोकीं आणि परलोकींही धन्य धन्य ह्मणवून घेतलें असेल, हें कांहीं अधिक सांगणें नकोच!

आमच्या ऋषींनीं–आर्यतत्वज्ञान्यांनीं–आपण आत्मज्ञान संपादून, व अखंड सुखी होऊन, इतर जनांसही त्याचा बोध व्हावा, आणि ते अखंड सुखी व्हावे, ह्मणून आत्मस्वरूपपर वेद रचून ठेविले; महासिद्धांत स्थापन केले; व त्यांनीं महावाक्यांचेंही निरूपण करून ठेविलें आहे. आपल्या सर्वमान्य वेदग्रंथांत " ज्या पासून हें सर्व ब्रह्मांड निर्माण झालें, व ज्या एका वस्तूचें ज्ञान झालें असतां ह्या सर्व विश्वाचें ज्ञान होईल अशी वस्तु कोणती? तिचा शोध कर. " ह्मणून पहिला बोध केला आहे. नंतर आपण कोण? आत्म्याचें स्वरूप काय? व तो कोण? आणि जगांत सत्य तें काय? इत्यादि गोष्टींचें निरूपण सूत्ररूपानें करून ठेविलें आहे. " तत्वमसि " " आनंद आत्मा " " एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति"+ ह्या तीन सूत्रांत आत्मज्ञानाचें सर्व कांहीं सार सांगून ठेविलें आहे असें ह्मणावयास हरकत नाहीं. मी कोण? " तत्वमसि " तत्+त्वम्+असि=तोच तूं आहेस. ह्मणजे ह्या सर्व विश्वाची जी मूळ–आत्मशक्ति तीच तूं होस, आणि तोच आत्मा. बरें, त्या आत्म्याचें

---

+ बरोबर अशाच अर्थाचें वाक्य भागवतांत आहे. तें हें:–

**ब्रह्मैतदद्वितीयं वै गीयते बहुधर्षिभिः।**

" ब्रह्म हें अद्वितीय ह्मणजे एकच असतां, ऋषींनीं बहुत प्रकारांनीं वर्णिलें आहे. " ( भा० एकं ११, अ. ९ श्लो. ३१ )

स्वरूप काय ? तर "आनंद आत्मा" ह्मणजे आत्मा आनंदरूप आहे. अर्थात् सुखाचें सर्वस्व काय तो तोच होय. त्याचें स्वरूप जो कोणी समजून घेईल, तो खरा व अखंड सुखी होय. आतां, ह्या विश्वांत सत्य काय ? तर "एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति." ह्मणजे "सत्य ह्मणून जें काय आहे, तें एकच ( आत्मा किंवा ब्रह्म ). ऋषींनीं त्याचें निरनिराळ्या प्रकारांनीं वर्णन केलें आहे" एवढेंच. अर्थात् सत्य ह्मणून जें काय आहे, तें तो आत्माच होय. तोच विश्वाचा प्रभु किंवा परमात्मा ! संकटसमयीं ज्याला निरनिराळ्या नांवानें हांका मारतात, किंवा आनंदोत्सवांत भक्तीनें नानाविध स्तोत्रें रचून ज्याचें स्तवन करतात, तोच तो होय. ह्यावरील मुख्य तीन सिद्धांतांचें यथातथ्य ज्ञान झालें, ह्मणजे मनुष्य खरा ज्ञानी झाला. ह्मणजे सर्व प्रापंचिक ज्ञानाचें सर्वस्व व जगाचें जगच्छक्तीचें मूळबीज जें आत्मज्ञान, तें पूर्ण कळलें, असें झालें. आणि खरें सुख ह्मणून जें आहे, तें ह्या आत्मज्ञानांतच आहे.

ह्या आत्म्यासच, ब्रह्म, परब्रह्म, ईश्वर, परमेश्वर इत्यादि संज्ञा आहेत. वेदांतशास्त्र, अध्यात्मविद्या, परमार्थज्ञान, तें सारें हेंच आत्मज्ञान होय. ह्या आत्मज्ञानास किंवा परमार्थज्ञानासच पराविद्या, श्रेष्ठज्ञान, असें मांडुक्योपनिषदांत ह्मटलें आहे. बाकी सर्व ज्ञान ह्मणजे ऐहिकज्ञान, ही सारी अपराविद्या ( कनिष्ठ प्रतीचें ज्ञान ) किंवा अविद्या होय. आणि अविद्या हिचेंच दुसरें नांव माया आहे. अर्थात् माया ही भ्रामक असली पाहिजे, हें तेव्हांच दिसून येईल. तेव्हां हा सारा मायाभ्रम पुरा ओळखून, आत्म्याच्या ठायीं लीन होणें, त्याचें

सत्यस्वरूप जाणणें, हेंच कायतें आपलें खरें कर्तव्य आहे; हाच कायतो आपला मनुष्यजन्मांतला परमार्थ ( मोठा हेतु ) आहे; हाच कायतो परमार्थज्ञानाचा शेवट आहे, आणि आत्मस्वरूपाची जोड संपादणें, ह्यांतच अखंड शांति, अखंड समाधान, अखंड आनंद, अर्थात् खरें–शाश्वतीचें–सुख आहे. ह्यावरून परमार्थाची थोरवी केवढी आहे बरें? असो. आतां फक्त हें आत्मज्ञान संपादण्याचे कांहीं ऋषिप्रणित मार्ग सांगून हें प्रकरण आटोपतें घेतों.

हें वर सांगितलेलें आत्मस्वरूप जाणणें, ती आनंदमय—अर्थात् अखंड समाधानास्थिति साध्य करणें, हें मनुष्यप्राण्याचें आद्यकर्तव्य होय, हें पूर्वी सांगितलेंच आहे. पण हें कसें साध्य करावें? त्याविषयींही आमच्या प्राचीन भरतखंडस्थ आत्मज्ञान्यांनीं कांहीं मार्ग सांगून ठेविले आहेत. ते मार्ग मुख्यत: चार होत. ह्मणजे कर्म, भक्ति, ज्ञान, व मन:सिद्धि हे ते चार मार्ग. ह्या चार मार्गांपैकीं, हव्या त्या मार्गानें जरी मनुष्य गेला तरी तो अखेरीस आत्म्याच्या ठायीं लीन होईल. मग तो निष्काम कर्ममार्गानें जावो; किंवा अव्यभिचार भक्तिमार्गानें जावो; किंवा निर्मल ज्ञानमार्गानें जावो; कीं ओढाळ गुराप्रमाणें चंचल जें मन व इंद्रियग्राम त्यास अभ्यासानें व विवेकबळानें तिकडे खेंचून, आत्मस्वरूप साध्य करो; तो अखेरीस महान् महान् आत्मज्ञानी जें पद पावतात, त्याच पदास जाऊन पोंचेल. त्या मार्गास "योग" अशी संज्ञा आहे. योग* ह्मणजे दुर्लभ वस्तूचा लाभ करून घेण्याचा

*" जें जें काळीं जें जें। देहनिर्वाहास पाहिजे। तें मेळवावा न कीजे। यत्न कांहीं अर्जुना! नाहीं तें मेळवावें। अगा! यास योग ह्मणावें॥" ( वामन पंडितकृत यथार्थदीपिका अ० २ ओ. ९८६।८७.)

मार्ग. आत्मस्वरूप हें आधीं परम दुर्लभ आहे. तेव्हां त्याचा लाभ करून घेणें, ह्मणजे दुर्लभ वस्तूचा लाभ करून घेणें नव्हे काय ? ह्मणूनच वर सांगितलेल्या चार मार्गांस अनुक्रमें, कर्मयोग, भक्तियोग, राजयोग, ( मनःसिद्धीचा मार्ग ), व ज्ञानयोग अशीं नांवें दिलेलीं आहेत. त्या चार मार्गांनीं जो जाईल, तो अत्यंत सुखी होईल; त्याला सत्य कळेल; व अद्‌भुत शक्ति त्याच्या अंगीं येऊं लागतील. असो. प्रस्तुत मालेंतील पुष्पांत त्या मार्गांचाच सविस्तर विचार केला असल्यामुळें येथें अधिक लिहिण्याचें प्रयोजन दिसत नाहीं.

झालें. येथपर्यंत पारमार्थिकसुखाचा व परमार्थज्ञानाचा संक्षेपतः विचार झाला. परमार्थाचा सविस्तर विचार करूं लागलें तर ग्रंथच्या ग्रंथ भरतील. आणि त्याचा यथातथ्य विचार करण्यास मनुष्य केवळ असमर्थ होय. तथापि परमार्थज्ञान थोडेंसें सुलभ व्हावें, ह्या हेतूनें त्याचा वेदांत ग्रंथांधारें घेतां आला तसा यत्किंचित् मथितार्थ येथें सादर केला आहे. ह्यावरून वाचकांस पुढील विषय बराच सोपा जाईल, अशी आशा आहे. असो. इतकें सांगून आतां आह्मीं आमच्या मुख्य हेतूकडे वळतों.

## आमचा मुख्य हेतु.

वरील सर्व विवेचनावरून ही माला सुरू करण्यांत आमचा हेतु काय असावा, हें वाचकांच्या बहुतेक लक्षांत येऊन चुकलेंच असेल. तथापि त्यासंबंधीं आणखीही चार दोन शब्द सांगणें इष्ट दिसतें. प्राचीनकाळीं आमच्या ह्या भरतखंडांत तत्वज्ञानाचा व अध्यात्मज्ञानाचा फैलाव फारच झाला होता, असें वैदिक कालाच्या इतिहासावरून चांगलें सिद्ध होतें. पूर्व-

काळाचे तपस्वी, महान् महान् सिद्ध मुनि, त्यांची राहणी, त्यांचे आश्रम, त्यांची दिनचर्या, आणि त्यांची निर्मळ मनोवृत्ति किंवा प्रौढ विचार, इत्यादींविषयीं वेदपुराणोक्त ग्रंथांत वर्णनें वाचलीं असतां, त्याकाळीं अध्यात्मज्ञानाची गोडी किती होती, ह्याची तेव्हांच खात्री पटते. इतकेंच नव्हे; तर, चार पांच हजार वर्षांपूर्वी जन्मास आलेले, उदात्त विचारांनीं भरलेले, प्रेमळपणानें डवरलेले, निर्मळ मनोभावानें मोहरलेले, सुबोधकुसुमांनीं फुलून गेलेले, आपल्या प्रौढगीर्वाण भाषासाहित्यानें रमणीयता पावलेले, व आपल्या अगाध विवेकबुद्धीनें ब्रह्मांडाचीं गूढ ह्रवें व्यक्त करून जगद्वंद्य झालेले, असे जे आम्हां आर्यजनांचे परमपवित्र वेदग्रंथ, ते सुद्धां ह्या अध्यात्मज्ञानाच्या गोडीचींच गोजिरवाणी अपत्यें होत, असें म्हटल्यास हरकत नाहीं. उपनिषदें हीं त्यांचींच छोटीं छोटीं मावंडें होत; आणि शास्त्रें, पुराणें, माहात्म्यें ह्यांची, त्यांपुढें पुत्र, पौत्र, प्रपौत्र, अशी माळिका लाविल्यास यथायोग्य होईल. अशा प्रकारें, ऐतिहासिक दृष्टया निदान हजार दीडहजार वर्षें ह्या परमतेजोमय अध्यात्मज्ञानाची ज्वाला, सारखी जोरानें धुमसत होती ह्मणावयास हरकत नाहीं. मध्यंतरीं कालकालाचे ठायीं ही ज्वाला राज्यतृष्णेच्या वावटळीनें जराजरा खालीं दबून जात असे. तेव्हां तिस प्रज्वलित करणारेही कोणी तरी तेजस्वी महात्मे मध्येंच अवतीर्ण होत. सांख्यशास्त्राचे उत्पादक महातत्ववेत्ते कपिल महामुनि; योगशास्त्रास ऊर्जितावस्थेस पोंचविणारे पतंजलि; अद्वैतसिद्धांताचा जरीपटका द्वैतमताच्या धुमश्चक्रींत अढळ उभा करणारे शंकराचार्य; व तत्वज्ञानानेंच ओतून निघालेली मूर्ति गौतमबुद्ध; हे, ह्या अध्यात्मज्ञानरूप

दिव्य नगरास चाललेला जो वेदमार्ग, त्यावरील चार भव्य बाहुटेच होत. परंतु ह्यानंतर ह्मणजे विशेषत: जेथपासून इतिहासकाल लागला, तेथपासून ह्या अध्यात्मज्ञानाचें एक एक पाऊल मागें पडत चाललें. त्याचें कारण बहुधा ' मुसलमानी रियासत ' हेंच असावें ! शिवाय, मध्यंतरीं, पुराणें उदयास आल्यापासून ह्या अध्यात्मज्ञानाचें स्वरूप हळू हळू बदलत गेलें. ह्मणजे कथा, दंतकथा इत्यादिरूपानें त्यांस ' भागवत ' स्वरूप येऊं लागलें ह्मटल्यास चालेल. माहात्म्यें हीं तर अगदीं अर्वाचीनकाळीं निघालेलीं दिसतात. त्यांनीं तर त्या ' भागवत ' स्वरूपाचा कळसच करून सोडला. मिळून खरें अध्यात्मज्ञान ' कालनेमिक्रमा'नें लोपत चाललें. आमच्या महाराष्ट्र देशांतील, अध्यात्मज्ञानाचे अर्वाचीनकाळचे पहिले अध्वर्यु, मुकुंदराज हे होत—नंतर निवृत्तिनाथ, ज्ञानेश्वर वगैरे संतमंडळ निर्माण झालें. त्या मंडळींत अध्यात्मज्ञानाचा प्रसार जरी जरासा अधिक होता, तरी बहुतेक भागवतधर्माचाच पगडा त्याहून विशेष होता. पुढें पुढें तर त्यांत ढोंगच फार माजूं लागलें. पेशवाईच्या उतरत्या काळापासून तर, वरकरणी परमार्थ, व गतानुगतिक, जीर्ण झालेलें, वर अज्ञानाची थोडीशी मळमी धरलेलें, असें ज्ञान आणि अविश्वसनीय भागवतधर्म प्रचारांत येऊं लागला. त्यामध्यें कोठें कोठें - कोणातरी व्यक्तींत खऱ्या ज्ञानाचें तेज चमकत असे. पण क्वचित् ! कित्येक तर खरे अध्यात्मज्ञान जाणणारे असत, पण ते गुप्त राहत असत. बहुधा, तुकाराम, रामदासांसारखी एका हाताच्या बोटानेंच मोजतां येण्याइतकी मंडळी केव्हां तरी बाहेर पडली

तर पडत. नाहीं तर जनसांसर्गापासून दूर एकांतवासांतच राहणारे फार! असें होऊं लागलें. त्याहीपुढें अध्यात्मज्ञान किंवा योगशास्त्र अलौकिक–छाछू वगैरे चमत्कारांत मोडूं लागलें. सिद्धमांत्रिक, बहुरूपी, पंचाक्षरी, देवऋषी ( देवर्षि ह्याचा अपभ्रंश ) ज्योतिषी, मनकवडे असलाल्या कलिकालांतील अर्वाचीन संतमंडळांच्या प्रभावानें अध्यात्मज्ञान देशोधडीस लागलें. आणि एक प्रकारचें विकारीज्ञान व भोळाभाव ह्याचा प्रादुर्भाव जिकडे तिकडे होऊं लागला, व त्याचें बीज अद्यापिही पुरतेपणें मोडलें गेलें नाहीं! ह्या भोळ्याभावाविषयीं समर्थांनीं जो टोला मारला आहे, तो फारच ध्यानांत ठेवण्यासारखा आहे! ते ह्मणतात––

**ह्मणोनि जितुका भोळा भाव। तितुका अज्ञानाचा स्वभाव। अज्ञानें तरी देवाधिदेव। पाविजे कैसा॥ १॥**

भोळा भावच जिकडे तिकडे फैलावल्यामुळें कित्येक अर्वाचीन संतांस चांगलें फावलें! ह्यांनीं, घरदार सोडावें; परमार्थसाधनाची दिशा धरावी; फकीर किंवा बैरागी व्हावें; किंवा एकादे मोठे बकध्यानी बुवा होऊन बसावें; आणि हजारों भाविकांस आपल्या जाळ्यांत गुरफटून टाकावें, असा क्रम चालविला! हल्लीं ह्या ढोंगी परमार्थाची पुरी शहानिशा झालेली असल्यामुळें, त्याविषयीं अधिक पाल्हाळ करणें नको! पुढें इंग्रजी अंमल सुरू झाल्यापासून, अनेक अनुभवांनीं, व अपूर्व शोधांनीं कसास उतरलेलें सोलींव पाश्चात्यज्ञान इकडे फैलावलें, आणि त्यामुळें ह्या ढोंगी परमार्थाचें अचाट व गूढ स्वरूप नवीन पिढीच्या चांगलें निदर्शनास येऊं लागलें. त्यामुळें आधुनिक विद्वानांचा परमार्थावरील विश्वास पार

उडाला! आणखी, तसें होणेंही साहजिक होतें. कारण तो काल तसाच–युरोपांतील तमोयुगाप्रमाणें (Dark age)–अज्ञानाचा होता. जिकडे पहावें तिकडे, भूतखेत, मंत्रतंत्र, पोंकळ समाधि लावून, गोमुखींत हात घालून चालत असलेलें ईश्वरपूजेचें बंड, इत्यादि प्रकार दृष्टीस पडावयाचे! खऱ्या परमार्थांत शिरलेले असे क्वचित् दृष्टोत्पत्तीस पडत. आणखी, असे जे कांहीं थोडे असत, त्यांस तरी अध्यात्मशास्त्र किंवा वेदांतशास्त्र, अथवा ज्यास खरें परमार्थज्ञान ह्मणतात, त्याचें मर्म कितपत अवगत होतें, तें देव जाणे! हजार दीड हजार वर्षांपासून चालत आलेले वेदांताचे ठरींव शब्द यांच्या नेहेमीं पाठांत असावयाचे! 'शाखाचंद्रन्याय' 'घटपटादि वस्तु' 'रज्जुसर्पाकार,' 'तत्वमसि' इत्यादि ठरींव शब्दांचें सदोदित पुराण चालावयाचें! परंतु त्यांचा खरा, गहन व व्यापक अर्थ फारच थोड्यांस माहित असे, ह्मणावयास हरकत नाहीं. कोणत्याही गोष्टींत दिवसेंदिवस नवीनत्व व सुधारणा हीं होत गेलीं पाहिजेत. तेव्हांच तीस उज्ज्वल स्वरूप प्राप्त होतें. पण तसा प्रकार ह्या आमच्या पूर्वापार सत्य व गहन अध्यात्मज्ञानासंबंधानें घडून आला नसल्यामुळें, तें बिचारें दिवसेंदिवस लोपतच चाललें. तत्वज्ञान ह्मणजे काय? हेंच मुळीं त्यावेळीं लोकांस चांगलें माहित नसल्यामुळें, लोकभ्रम बराच माजला होता. आतां, मध्यें केव्हां तरी विरक्त साधुसंत, आत्मज्ञानी वगैरे दृष्टीस पडत, नाहीं असें नाहीं. पण ज्ञानदानास जे अधिकारी असत, त्यांसच ते आत्मज्ञानाचा प्रसाद करीत. त्यामुळें इतर लोक आपले ' कोरडे पाषाण'च रहात. अशा प्रकारें उत्तरोत्तर त्या सुखप्रद अध्यात्मज्ञानास आमचे लोक आंचवत चालले, पूर्वापार

वेदमार्गास धरून चालणारांची ही दशा झाली. आतां, नवीन पिढीची दशा पहा! ह्या नवीन पिढीस बहुतेक पाश्चात्यज्ञानाचाच संस्कार फार झाला असल्यामुळें, व परमार्थांत सारें ढोंग आहे असाच त्यांचा ग्रह बनून गेल्यामुळें, त्यांच्यापैकीं बहुतेकांची ह्या अध्यात्मज्ञानाकडे मुळींच प्रवृत्ति नसे. होतां होईतों, नूतन ज्ञान संपादणें; मानमान्यता, अधिकार, पैसा पुष्कळ मिळविणें; कलाकौशल्य, उद्योगधंदा इत्यादि गोष्टींत अंगीं प्रावण्य आणणें; आणि पाश्चात्य वळणावर हरएक बाबतींत सुधारणा करणें हेंच काय तें सुखाचें सर्वस्व आहे, असा त्यांचा समज असे. ह्मणजे बुद्धिविषयक व जडसृष्ट्यात्मक सुधारणेंत ह्यांचें मन गढलेलें असावयाचें! परंतु मनःशक्ति किंवा आत्मशक्ति वाढवावी, हें त्यांच्या गांवींही नसे. ह्यामुळें तत्त्वज्ञान किंवा अध्यात्मज्ञान ह्याची त्यांस गोडी नसे; त्यांचा योगशास्त्र, अभ्यास, त्यानें अद्‌भुत चमत्कार घडतात, मनाची शक्ति अतर्क्य होते, इत्यादि गोष्टींवर त्यांचा भरंवसा नसे; आत्मा ह्मणजे कांहीं अतर्क्य व अविनाश वस्तु आहे, हें त्यांस संमत नसे; आणि ते बहुधा जवळ जवळ प्रत्यक्षवादी होत. बरें; एखादे वेळीं अध्यात्मज्ञानपर एखादा ग्रंथ पहावा, असें ह्यांच्या मनांत आलेंच, तर त्या विषयाच्या गहनत्वामुळें व पूर्वापार चालत आलेल्या शब्दांच्या अपरिचितपणामुळें, त्यांतील आशय कळणें सुद्धां कठीण जात असे. अशी ही नूतन पिढीची दशा! मिळून साधारणतः दोहींकडेही ह्या अध्यात्मज्ञानाचा अभाव होऊन गेला. अशा प्रकारें कांहीं कालपर्यंत ह्या अध्यात्मज्ञानाची चोहोंकडून फार हानि झाली परंतु सत्याच्या अभेद्य पायावर हें ज्ञान उभारलेलें असल्यामुळें

त्याचा सर्व अंतर्भाग मजबूत होता. फक्त बाहेरचा सफेता जरा मळीण झाला होता! त्यामुळें जरा जीवन मिळण्याचा कायतो अवकाश! तें मिळालें कीं, आली पुन्हां तरतरी! अशी त्याची स्थिति होती. आणखी, पूर्वकालीन वंदनीय—परमपूज्य आर्यांच्या जबर पूर्वपुण्याईनें तसें जीवनही त्यास अलीकडे हळूं हळूं मिळत चाललें. प्रथमतः युरोपांत आमच्या पवित्र संस्कृत भाषेची गोडी लागत चालली. सर्व कविकुलांत अग्रगण्य जो कालिदास, त्याच्या अप्रतिम व मनोहर 'शाकुंतल' नाटकानें गेटीसारख्या परकीय विद्वज्जनांससुद्धां तल्लीन करून सोडलें. त्यामुळें आमच्या गीर्वाण भाषेची अभिरुचि पाश्चात्य देशांत फार वाढत चालली. संस्कृत ग्रंथांत काय काय अपूर्व रस भरला आहे, तो चाखून पाहण्यास कांहीं पाश्चात्य विद्वान् अगदीं आतुर होऊन गेले. आणखी, त्यामुळें म्याक्समुल्लरांसारख्या जाड्या पाश्चात्य पंडितांनीं, ३०।३९ वर्षें खपून वेदग्रंथांचें स्वकीय भाषेत भाषांतर केलें. हे म्याक्समुल्लर साहेब तर आमच्या पूज्य वेदग्रंथांचे एवढे भक्त आहेत कीं, वेदाच्या आधारावांचून किंवा त्यांतील उच्च तत्व सांगितल्यावांचून त्यांचा एकही ग्रंथ किंवा व्याख्यान तडीस जावयाचें नाहीं! अशाप्रकारें आमच्या सनातन वैदिकधर्माचें बीज युरोपांत रुजत चाललें. पुढें, मद्रास येथें ' थिऑसोफिक सोसायटी '—' तत्वविवेचक मंडळी '—स्थापन झाली. ह्या मंडळीस आमचें वेदांतशास्त्र, योगशास्त्र, वगैरे मान्य होऊं लागलें. मिसेस् ॲनी बिझांट, ब्लॅव्हाटस्की, कर्नल अल्कॉट यांसारखी मंडळी गुरुदीक्षा घेऊन, ज्ञानकांड, कर्मकांड, गीताशास्त्र इत्यादि गहन विषयांवर यथामति व्याख्यानें देऊन लोकांस इंग्रजींतून

उपदेश करूं लागली. ह्यामुळें, अध्यात्मशास्त्राचा पाश्चात्य देशांत प्रसार होऊन, त्याचीं तत्वें अर्वाचीन पंडितांस मान्य होऊन, त्याचें पुनरुज्जीवन होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. त्यांतही ह्या पुनरुज्जीवनकार्यास एका गोष्टीनें अधिक भर पडण्याचा विशेषच संभव दिसूं लागला. ती गोष्ट ही कीं, युरोपांत मानसशास्त्रसंबंधीं शोध चालू झाले. आणि शोधाअंतीं, मेसमेरिझम् ( मनुष्यास नुसत्या हात उताऱ्यांनीं झोंप आणणें ) ॲनिमल् म्यॉग्नेटिझम् (प्राणिवशीकरण—मोहनी विद्या), क्लेयरव्हॉयन्स ( साक्षात् अनुभवाचें शास्त्र ) इलेक्ट्रिकल् सायकॉलाजी ( विद्युन्मानसशास्त्र ), असलालीं अपूर्व मानसशास्त्रें उदयास आलीं. त्यामुळें मनाची शक्ति फार अचाट आहे, ती शक्ति साध्य केली असतां, विलक्षण कार्यें घडतात; मनोजय संपादिला असतां, किंवा मनास सदाचाराचें व सत्यवळण लावून, त्यास एका विवक्षित स्थितींत ठेवलें असतां, दुसऱ्यांचीं मनें आपल्या मनःसत्तेखालीं आणतां येतात; दुसऱ्याच्या मनांत काय आहे तें सांगतां येतें; प्राणिमात्रांचे कसलेही अपरिहार्य रोग बरे करतां येतात; मनोधर्माच्या प्राबल्यानें पदार्थांस हवींतशीं रूपांतरें देतां येतात; इत्यादि विलक्षण गोष्टी अनुभवास येऊं लागल्या. ह्या अद्भुत गोष्टींनीं परमार्थाकडे वळण्यास जशी मनःप्रवृत्ति असावी लागते, तशीच परद्वीपस्थ लोकांची मनःप्रवृत्ति बनत चालली. हें आमच्या अध्यात्मज्ञानाच्या पुनरुज्जीवनास केवढें बरें साहाय्य झालें! तदनंतर, शेत प्रथमतः नांगरून कुळवून तयार झाल्यावर मग जसा मेघवृष्टीचा लाभ व्हावा, तद्वत् स्वामी विवेकानंदांसारख्या महात्म्यांनीं तेथें जाऊन, आपल्या अध्यात्मज्ञानरूप अमृत-

रसाची, वाणीरूपानें पाश्चात्यांच्या सुपीक अंतःकरणक्षेत्रां-वर अकस्मात् वृष्टि केली. तें भाग्य व तो प्रसंग काय वर्णावा? आणि स्वामी विवेकानंदजींची वाणी किती गोड, विषय विवेचन किती मुद्देसूद व अनुभविक ह्मणून सागावें? ( ह्यासंबंधीं उल्लेख पुढें आहे. ) प्रतिशंकराचार्य, ही त्यांची योग्यता! येणेंप्रमाणें स्वामींनीं आमच्या सर्वमान्य वैदिक धर्माचा दिग्विजय केल्यापासून, अमेरिकेंतील व युरोपांतील विद्वज्जनांस व थोर थोर लोकांस, आमच्या उच्च व पवित्र धर्माची, आमच्या वेदग्रंथांची, आमच्या ऋषींची, त्यांच्या श्रेष्ठ तत्वविचारांची, त्यांच्या निर्मलतेची महती चांगली कळून आली; आणि येथील पुष्कळ लोक ह्या थोर आर्यधर्माच्या कांसेस लागले! नंतर त्या सुधारलेल्या देशांतूनच ( इंग्रजी भाषेच्या द्वारें ) जेव्हां हा अध्यात्मज्ञानाचा सुंदर प्रवाह वाहतां, वाहतां, त्याचा ओघ ह्या भरतखंडाकडे ( अर्थात् फिरून उगमाकडे ) वळला,आणि जेव्हां 'ब्रह्मवादिन्,' 'प्रबुद्धभारत' वगैरे मासिक-पुस्तकें इंग्रजींतून निघूं लागलीं, तेव्हां अलीकडे आमच्या देशांतील कांहीं कांहीं नूतन विद्वानांचाही त्यावर थोडथोडा विश्वास बसत चालला आहे, असें ह्मणावयास हरकत नाहीं. आणि जे वेदमार्गास धरून चाललेले आहेत, त्यांच्या मनांत पूर्वींचाच अध्यात्मज्ञानाचा जीर्ण झालेला अंकुर होता त्यास हें ताजें जीवन मिळून, तो बिचारा पुनरपि झपाट्यानें वाढीस लागला आहे. तर ह्या आमच्या पूर्वापार अध्यात्मज्ञानांत, सर्व नीतितत्वांचें व अखिल सत्याचें मूळ बीज भरलेलें असल्या-मुळेंच, त्यास मध्यंतरीं बराच काल जरी आघात सोसावे लागले, तरीही त्यानें पुन्हां डोकें वर काढलें असें होत नाहीं काय?

आमचा हिंदुधर्म सर्व श्रेष्ठ; परमपवित्र; गीता* ही अतिउत्तम तत्वविचारानें नखशिखांत भरलेली अल्पवल्लरी; भरतखंडांतील आर्यांचे विचार फार थोर; असें जें कांहीं परद्वीपस्थ लोकांस हल्लीं वाटूं लागलें आहे, तें त्यामुळेंच नव्हे काय ? तर होयच ह्मणावें लागेल. कारण, नाहीं तर व्यवहारज्ञान, कलाकौशल्य, विद्वत्ता, बुद्धिमत्ता वगैर सर्वच बाबतींत सुधारणेच्या शिखरीं पोंच-लेल्या पाश्चात्य देशांत, जुन्या चालीरीतींसच चिकटून राहाणाऱ्या आमच्या देशांतील, लुप्तप्राय होत आलेल्या, व परकीयांस ज्यांतील विचारतत्वें अगदीं अपरिचित अतएव कंटाळवाणीं भासण्याचा संभव होता, त्या अध्यात्मज्ञानाचा प्रसार व मान्यता हीं होणें, ह्मणजे कांहीं आजकाल थट्टा नव्हे ! हें निर्विवाद आहे. असो.

वर आम्हीं थोडेसें गतकालाचें पर्यालोचन करून अध्यात्मज्ञानाची ऐतिहासिकरीत्या येवढी जी थोरवी निवेदन केली आहे, ती कशाकरितां ? असा सकृद्दर्शनीं साहजिकच प्रश्न येतो. परंतु आमचा काय जो मुख्य हेतु तो त्यांतच आहे, हें आम्हांस येथें मुद्दाम सांगावयाचें आहे. आमचा सनातन वैदिकधर्म आपल्या सत्य तत्वांच्या योगानें अद्या-पिही जगन्मान्य होत आहे; हजारों संकटांशीं व इस्लाम,

---

*गीता ही युरोपांत लहान थोर कैक जनांस फार प्रिय आहे. तिची गोडी पाश्चात्य खेडवळ माणसांत देखील किती आहे, त्याबद्दल एक चांगलें उदाहरण ऐकिवांत आहे. तिकडील काबाडकष्ट करणारे शेतकरी सुद्धां, एकीकडे आऊत धरीत असतां, गीता (युरोपांत निरनिराळ्या भाषेंत गीतेचीं भाषांतरें झालीं आहेत, हें सांगणें नकोच!) मोठ्या प्रेमानें वाचीत असतात. केवढी बरें ही गीतेची थोरवी ?

बौद्ध, ख्रिश्चन इत्यादि धर्मांच्या टोळधाडीशीं टक्कर देऊन, अद्याप आपल्या उज्ज्वळ पूर्वस्वरूपानें वास्तव्य करीत आहे; आणि आपल्या प्रौढ तत्वविचारांनीं म्याक्समुल्लरांसारख्या पाश्चात्य वेदोनारायणांस व मोठमोठ्या तत्ववेत्त्यांस आनंद भ- रानें डुलावयास लावीत आहे. तीच गोष्ट आमच्या अध्यात्म- ज्ञानाची व योगशास्त्राची. मेस्मेरिझम् आणि विद्युन्मानसशास्त्र ह्या दोन अर्वाचीन मानसशास्त्रांनीं जर अद्भुत शक्ति अंगांत येतात, व नाना चमत्कार घडतात, असें पक्कें अनुभवास येतें; तर आमच्या पूर्वकालीन ऋषिवर्यांनीं—(जे केवळ सत्याचे, शां- तीचे, व सच्छीलतेचे आगर )—अनेक अनुभव घेऊन, आत्म- स्वरूपाचा साक्षात्कार घेऊन, अनेक सिद्धि मिळवून, मनोजय संपादून, जें योगशास्त्र निर्माण केलें आहे, तें तरी खोटें कसें म्हणावें? योगी जनांनीं सांगितल्याप्रमाणें आपण बरोबर अभ्यास ( आणि अभ्यासानें काय काय म्हणून साध्य होत नाहीं?) केल्यास, त्यांच्या वचनाबरहुकूम सदाचार, मनःशुद्धि, मनोजय, प्राणायाम ( प्राणावर सत्ता ) हीं साध्य केल्यास आपल्या आंगीं अद्भुत तेज, अद्भुत शक्ति, अंतःसाक्षित्व, वगैरे येणार नाहीं म्हणून कशावरून? नाहीं, म्हणवत नाहीं. आ- णखी, तशा प्रकारचे अद्भुत चमत्काराचे दाखलेही अनेक आढळतात. फार कशाला? हल्लींच तीन चार वर्षांखालीं, एक योगी समाधि लावून, जमिनीपासून वीत दीड वीत उंचीं- वर अगदीं अधांतरीं बसल्याचें कित्येकांनीं पाहिलेंही व लिहि- लेंही आहे. एकंदरींत, सांगावयाचें तात्पर्य काय कीं आमचा वैदिकधर्म, आमचें अध्यात्मज्ञान, आमचें योगशास्त्र हीं सर्व सत्याच्या साक्षात् अनुभवाच्या पायावर उभारलेलीं असतां,

अद्यापि कित्येक मंडळीस, कित्येक विद्वानांसही-त्यांत कांहीं खरेपणा नाहीं असें वाटतें. परंतु त्यांत खरेपणा नाहीं, असें वाटणें हा त्यांचा शुद्ध भ्रम व त्यांच्या अध्यात्मज्ञानाच्या अज्ञानाचें दर्शक आहे. तो त्यांचा भ्रम व तें त्यांचें अज्ञान दूर व्हावें; आणि ज्या कोणांस अध्यात्म किंवा वेदांतशास्त्र, तसेंच योगशास्त्र बरोबर अवगत झालें नसेल, त्यांस तें बरोबर अवगत व्हावें; त्यांची सोप्या रीतीनें फोड होऊन, त्यांतील विचार त्यांच्या मनांत बरोबर ठसावे, हा आमचा मुख्य हेतु आहे. म्हणूनच ही सुलभ परमार्थज्ञानमाला आम्हीं सुरू केली आहे. ही नीट वाचून, नीट मनन करून, निर्मळज्ञान संपादून, अभ्यासानें अनुभव घेऊन, आपलें खरें देहसार्थक कोणी तरी करून घेतील, अशी आह्मांस दृढतर आशा आहे. असो.

**आह्मीं ह्या मालेंत कोणकोणते ग्रंथ घेतले? तें कां घेतले? व त्यांचें महत्व**—ह्याविषयींही येथें दोन शब्द सांगावयाचे आहेत. ह्या मालेंत आह्मीं मुख्यत: भक्तियोग, कर्मयोग, राजयोग व ज्ञानयोग हे चार अत्यंत रमणीय ग्रंथ गोंवणार आहों. आणि त्यांपैकीं पहिले तीन योग प्रस्तुत मालेच्या ह्या पहिल्या भागांत सामील केले आहेतच. त्यांचा अनुक्रम येणेंप्रमाणें लावला आहे. पुष्प १ लें, कर्मयोग; पुष्प २ रें, भक्तियोग; व पुष्प ३ रें, राजयोग. ह्या पुष्पांस अत्युत्तम विचारसौंदर्यानें मनमोहक रंग चढला असून, त्यांतील मकरंद सत्तत्वामृतरसानें डबडबला आहे. आणखी पुष्पांचा कीर्तिरूप परिमळ आसमंतांत दूरवर पसरलेला असल्यामुळें, हीं पुष्पें प्रत्येकास आनंदप्रद, प्रत्येकास सुखदायक व प्रत्येकास आपल्या अमृतपानानें तृप्ति देणारीं आहेत। असो.

हे तिन्ही अत्युत्तम योगग्रंथ श्रीमत्स्वामी विवेकानंद ( प्रस्तुत स्वामींचा अल्प आयुःक्रम जोडला आहेच. ) यांच्या व्याख्यानाधारें लिहिले गेले आहेत. तेव्हां, त्यांचें महत्व किती आहे, हें येथें अधिक सांगितलेंच पाहिजे, असें नाहीं. प्रस्तुत स्वामींचें ३।४ वर्षांखालीं अमेरिकेस प्रयाण होऊन, त्यांनीं प्रथमतः तेथील एका मोठ्या धर्मपरिषदेंत, 'हिंदुधर्म' ह्या विषयावर व्याख्यान दिलें, आणि आपल्या अलौकिक तेजानें, मनोहर वाणीनें, परिपक्व विचार साहित्यानें, गहन सिद्धांत निरूपणानें, अनुभविक व उच्च तत्वज्ञानानें, अप्रतिम भाषापटुत्वानें, हृदयंगम विषयप्रतिपादनशैलीनें, आणि आपल्या गोड व कळकळीच्या भाषणानें, स्वामी विवेकानंदजींनीं तेथील सभाजनांचीं अंतःकरणें अगदीं प्रफुल्लित करून सोडलीं. पुढें त्यांनीं तेथेंच 'सर्व जगांत श्रेष्ठ धर्म कोणता?' अर्थात् आपला वैदिकधर्म सर्व श्रेष्ठ होय—'मनुष्याचें सत्यस्वरूप,' 'आत्मन्' इत्यादिविषयांवर व्याख्यानें देऊन, ( हीं व्याख्यानें देखील अतिशय सुंदर व मनोरंजक आहेत, तींही हळूहळू स्वतंत्ररीतीनें भाषांतररूपानें छापून काढण्याचा आमचा मानस आहे.) नंतर प्रथम राजयोग, पुढें कर्मयोग, व भक्तियोग ह्या अति गहन योग विषयांवर अति सुरस भाषणें केलीं. हीं पुस्तकरूपानें इंग्रजींत प्रसिद्ध झालींच आहेत. तीं वाचलीं असतां त्यांतील सौरस्य व रमणीयता सहज कळून येईल. ह्या स्वामींच्या व्याख्यानांनीं पाश्चात्य लोकांच्या मनांत वैदिकधर्म, आर्य लोक, त्यांचें उच्च तत्वज्ञान, योग वगैरेंविषयीं पूज्यबुद्धि उत्पन्न होऊन, हजारों लोक आमच्या सनातन आर्यधर्माचे अनुयायी बनले. स्वामींनीं, 'आत्मा हा अज, अनादि,

अविनाश, निराकार, निर्विकार आहे; तो जवळही आहे, व दूरही आहे; तोच सर्व शक्तीचें, ज्ञानाचें व आनंदाचें मूल-स्थान आहे; हें मूलस्थान आपल्यापाशींच आहे; पण तें गुप्तरूपानें असतें; तें साध्य करून घेणें हेंच काय तें खरें सुख; आणि तें साध्य करण्यास योग हें उत्तम साधन आहे; त्याचा अभ्यास करून अनुभव घेणें, हें आपलें कर्तव्य आहे'. इत्यादि केलेला उपदेश त्यांच्या मनांत चांगला बिंबून, ते परकी लोक असूनही त्याचा अभ्यास करूं लागले. तेव्हां ह्या तिन्हीही योगग्रंथांची योग्यता केवढी मोठी आहे, हें सांगणें नकोच! त्यांची रमणीयता आमच्या महाराष्ट्र देशीय बंधूंसही कळावी, ह्या उद्देशानेंच आह्मीं हा प्रयत्न केला आहे. आणखी दुसरें असें कीं, ज्यांस इंग्रजी येत नसल्यामुळें, त्यांतील आस्वाद मिळणें अशक्य आहे, अशांना मराठी भाषेंत त्याचा लाभ मिळणें अवश्यक आहे. शिवाय असें कीं, मराठी भाषेंत भागवत, ज्ञानेश्वरी, यथार्थदीपिका, सिद्धांतसंहिता वगैरे जे वेदांतपर ग्रंथ आहेत ते चांगल्या चांगल्यांसही पूर्णपणें समजणें बरेंच जड जातें. त्यामुळें; व इतर कोणत्याही अध्यात्मग्रंथांपेक्षां, ह्या ग्रंथांत प्रस्तुत स्वामीनीं, फारच सुरेख, व अगदीं साध्या शब्दांनीं फोड करून वेदांतशास्त्र व योग-शास्त्र आबालवृद्धांसही सुलभ करून दिलें आहे. अर्वाचीन शोधांचाच आधार घेऊन आमचीं पूर्वकालीन योगतत्वें चांगलीं सिद्ध केलीं आहेत; आणि माहिती सविस्तर असून, संगतवार आहे, व सुंदर दृष्टांतपर गोष्टींनीं त्यांस फार मनो-रंजकता आणली आहे; इत्यादि कारणांमुळें ते मराठींत उतरणें आह्मांस योग्य व अवश्य वाटलें. त्याप्रमाणें, हे तीन योगग्रंथ

आह्मीं होतां होईतों चांगल्या रीतीनें छापून, त्यांतील विषय प्रतिपादन व भाषा होतां होईतों सुलभ,-चटकन् अर्थ कळे अशी-होईल, अशी योजना केली आहे. ह्मणूनच ह्या परमार्थ-ज्ञानमालेस आह्मीं 'सुलभ' हें उपपद आरंभीं जोडलें आहे. असो.

## ग्रंथांचें-प्रसिद्ध झालेल्या पुष्पांचें-साधारण स्वरूप.

**पहिला ग्रंथ कर्मयोगः**-यामध्यें पहिल्या प्रथम कर्म ही सुख प्राप्त करून घेण्याची, व जगाचें सुख वाढविण्याची प्रचंड शक्ति कशी आहे याचें सविस्तर विवेचन केलें आहे; दुसऱ्या प्रकरणामध्यें असें निरूपण केलें आहे कीं, प्रत्येक माणसामध्यें जो आत्मा आहे तो ईश्वरांश आहे; कमी अधिक हा भेद अज्ञानानें असतो. जो आळस टाकील; अनिष्ट परि-स्थितीचा प्रतिकार करण्यासाठीं उद्योगाची कांस धरील; व फळासाठीं परमेश्वरावर भंरवसा ठेऊन आपल्या कर्तव्यतेची सीमा करून दाखवील; तोच उच्च पदास पोंचेल. तिसऱ्या प्रकरणामध्यें निष्काम परोपकारबुद्धि ही उत्तम प्रकारें जगा-ला वळण देण्याची, आपलें व जगाचें सुख वाढविण्याची, आणि थोड्या श्रमानें बहुत कार्यें साधण्याची गुरुकिल्ली आहे हें शिकविलें आहे. चवथ्या प्रकरणामध्यें कर्तव्य ह्मणजे काय याचा तात्विकदृष्ट्या विचार करून अखेरीस कर्तव्याची परम सीमा ह्मणजे कोणाला इजा न देणें व होतां होई तों दुसऱ्यांवर उपकार करणें ही होय, असें सांगितलें आहे. जो आपल्यावरून दुसऱ्यांचें सुखदुःख पहाण्याचा अभ्यास

करितो, तोच आपलें कर्तव्य उत्तम प्रकारें जाणणारा होय, असें सांगितलें आहे. पांचव्या प्रकरणामध्यें आपण सर्व जगाचे ऋणी आहोंत कसे, व जगाचें सुख वाढविण्यासाठीं झटण्यांत आपण आपल्याच साठीं कसे झटतों, हें दाखवून उत्तम स्वार्थ व परोपकार यांची एकवाक्यता केलेली आहे. सहाव्या प्रकरणामध्यें अनासक्ति ही आत्मत्यागाची परिपूर्णता कशी हें सुरेख दाखविलें आहे. परमेश्वराला सर्व प्राण्यांचें हित प्रिय आहे. सर्व वस्तू परमेश्वराच्या आहेत. जें जें आपण करावें तें परमेश्वराला प्रिय ह्मणजे ज्यापासून जगद्धित घडेल असें असावें, त्यांत आकुंचित स्वार्थ नसावा. जो अनासक्तीनें कर्म करील, तो परमसुखी असेल, लोकांचा उद्धार करील, व परमेश्वराला प्रिय होईल. सातव्या प्रकरणामध्यें अनासक्तीपासून मिळणारें अमृत जें अखंड शांतिसुख त्याचा महिमा वर्णिला आहे; विषयसुखें क्षणिक असतात व परिणामीं चांगलीं नसतात. शांतीचें सुख, प्रारंभीं, मध्यें व परिणामींहि हितकर होय; ती संजीविनी आहे. आठव्या प्रकरणामध्यें कर्म योगाची अत्युच्च कल्पना कोणती तें दाखविलें आहे. जें आपल्याला करितां येईल तें उत्तम कुशलतेनें करावें; या क्षणीं माझें कर्तव्य काय आहे हें सर्वदा मनांत असावें; व काळाचेंहि साधेल त्या मार्गांनीं उत्तम सार्थक्य करणें, हीच कर्तव्याची सीमा ! मनुष्याची योग्यता त्यानें कोणतें काम हातीं घेतलें आहे, यावर नाहीं; तर तो तें काम कसें करीत आहे, यावर आहे. जसे अनेक रस्ते एकाच बाजाराशीं मिळतात, सगळ्या नद्या एकाच समुद्राला मिळतात, त्याचप्रमाणें निरनिराळ्या मार्गांनीं आपलें खरें कर्तव्य यथायोग्य बजाविणारे

लोक आपल्या योग्यतेनें एकाच अखंड शांतिसुखाच्या मंदिराला येऊन पोंचत असतात. येणेंप्रमाणें या पुस्तकाच्या आठ प्रकरणांचें संक्षिप्त स्वरूप आहे.

**मालेंतील दुसरें पुस्तक–भक्तियोग**–या पुस्तकामध्यें गौणीभक्ति व पराभक्ति असे दोन भाग केलेले आहेत. पहिल्या भागाच्या प्रारंभीं भक्ति ह्मणजे काय याचें विवेचन करून भक्तीचें लक्षण सांगितलें आहे. भक्ति ह्मणजे परमेश्वराविषयींचें अत्यंत प्रेम होय. या प्रेमापासून क्लेश फिटून जातात; ज्ञान वाढतें आणि अखंड व दिव्य आनंदसुख प्राप्त होतें; पुढल्या प्रकरणांत ईश्वर स्वरुपाचा तात्विकदृष्टया विचार आहे व समर्पक प्रमाणें देऊन ईश्वर स्वरुपाची सिद्धता केलेली आहे. तिसऱ्या प्रकरणांत भक्ति करण्यामध्यें भक्तानें मिळवावयाचें काय, तर एक ईश्वर साक्षात्कार; त्यावांचून उत्तम आनंदप्राप्ति होणें नाहीं, हें सांगितलें आहे. चवथ्या प्रकरणांत सद्गुरूची अवश्यकता समजून सांगून पांचव्यामध्यें गुरु शिष्यांचीं लक्षणें सांगितलीं आहेत. सहाव्यामध्यें धर्मग्लानि झाली असतां परमात्मा जे अवतार धारण करितो, त्यासंबंधानें सांगितलें आहे. सातव्यामध्यें मंत्र–माहिमा, जपमहिमा काय हें सांगितलें आहे; आठव्यामध्यें मूर्तिपूजेवर येणाऱ्या आक्षेपाचें खंडन केलें आहे; नवव्यामध्यें इष्टदेवता अथवा ध्येयस्वरूप ह्मणजे भगवत्पदीं जाण्याचा एक मार्ग कसा हें समजून दिलें आहे; दहावें प्रकरण भक्तियोगाचीं साधनें या विषयावर

आहे. येथें पुस्तकाचा पूर्वार्ध झाला. पुढें उत्तरार्ध; यांत पराभक्तीचें विवरण आहे; पहिले प्रकरणांत असें सांगितलें आहे कीं, पराभक्तीचें पहिलें लक्षण परित्याग आहे. खरा परित्याग ह्मणजे परमेश्वराखेरीज कोठें मन रमूं नये असें होणें. दुसऱ्या प्रकरणामध्यें भक्तीनेंच ह्मणजे परमेश्वराचे ठायीं मन अधिकाधिक रमूं लागल्यानें इतर सर्व वस्तूंपासून तें विरक्त कसें होतें हें सांगितलें आहे. तिसऱ्या प्रकरणामध्यें भक्तियोगाचा राजमार्ग कोणता व त्याची गुरुकिल्ली कोणती हें सांगितलें आहे. चवथ्या प्रकरणांत भक्तीचीं व्यक्त स्वरूपें कोणतीं ह्मणजे कोणत्या लक्षणांवरून उत्तम भक्ति होत आहे असें ओळखावें, हें सांगितलें आहे. पांचव्या प्रकरणांत सर्वांभूतीं आपण प्रेम करूं लागल्यापासून त्यामध्येंच आपल्याला परमात्म्याविषयींचें चांगलें ज्ञान कसें होतें व आपला आनंद कसा वाढत जातो, हें सांगितलें आहे. सहाव्यामध्यें भक्तास श्रेष्ठ ज्ञान व उच्च प्रतीचें प्रेम हीं एकच होत हें कसें, तें दाखविलें आहे. सातव्यामध्यें भक्तीचा त्रिकोण कसा असतो ह्मणजे अनासक्ति, अभीति, व प्रेम, व ध्येय स्वरूपाची उत्तमता या तीन तत्वांवर भक्तीची इमारत कशी आहे हें दाखविलें आहे; आठव्यामध्यें प्रेमस्वरूप ईश्वर दिसणें हीच त्याची मूर्तिमंत साक्ष कशी हें सांगितलें आहे. नवव्यामध्यें त्या प्रेमस्वरूपाचें शाब्दिक प्रतिबिंब कसें आहे ह्मणजे ईश्वराला आह्मी जीं नांवें देतो त्यांत हें प्रेमस्वरूप कसें व्यक्त झालेलें असतें हें सांगितलें आहे. दहाव्या प्रकरणांत उपसंहारामध्यें प्रेमाचें पराकाष्ठेचें स्वरूप झाल्यावर भक्ताला दुसरें कांहींही नकोसें कसें होतें, व ज्ञान-

ही तुच्छ कसें वाटतें हें सांगितलें आहे. येथें दुसरा भाग संपला; येणेंप्रमाणें प्रस्तुत मालेंतील दुसऱ्या पुस्तकाचें स्वरूप अति संक्षेपानें कथन केलें. आतां:—

**मालेंतील तिसरें पुस्तक, राजयोग**—हें पुस्तक प्रो. चिंतामण गंगाधर भानू बी. ए. यांनीं लिहिलें आहे. या पुस्तकाच्या पहिल्या बऱ्याच पानांत विषयप्रवेश या सदराखालीं योग म्हणजे काय हें समजून दिलें आहे. पुढल्या प्रकरणांत योगाचीं जीं अष्ट अंगें आहेत त्यांचें विवेचन केलेलें आहे; तिसऱ्या प्रकरणांत प्राण म्हणजे काय व त्याच्यावर देहाचे व्यापार कसे अवलंबून असतात, प्राण ही शक्ति कशी आहे हें सांगितलें आहे. चवथ्या प्रकरणांत मानसिक प्राण हा विषय आहे; यामध्यें प्राणांनाही आधार जो मानसिक प्राण, गूढ शक्ति—त्याचा प्राणांच्या चालनेशीं व ज्ञानाच्या वृद्धीशीं कसा संबंध आहे, तें दाखविलें आहे. पांचव्या प्रकरणामध्यें प्राणायाम म्हणजे काय, प्राणायामानें मनःशुद्धि व देहशुद्धि कशी होते तें सांगितलें आहे; सहाव्या प्रकरणामध्यें प्रत्याहार—म्हणजे इतर सर्व ऐहिक विषयांपासून मन पराङ्मुख करणें व धारणेनें परमेश्वरावर एक चित्तानें योजणें, या गोष्टीचें विवेचन केलें आहे; सातव्या प्रकरणामध्यें धारणेंत चित्त रमतां रमतां ध्यान कसें होतें, व ध्यानांत मजा वाटतां वाटतां समाधि म्हणजे तद्रूपता व आनंद यांची प्राप्ति कशी होते हें सांगितलें आहे. येणेंप्रमाणें या तिसऱ्या पुस्तकाचा सारांश आहे. हें पुस्तक योगाभ्यास करूं इच्छिणारांस फारच उपयोगी होणार आहे.

# आमचें पुढील धोरण
## व
## वाचकांस अगत्याची विनंती.

आह्मीं, प्रस्तुत मालेच्या ह्या पहिल्या भागांत, जे पहिले तीन योग सामील केले आहेत, त्यांचें महत्व व साधारण स्वरूप, वर सांगितलेंच आहे. आतां, उरला काय तो ज्ञानयोग. हा ज्ञानयोग मुख्यत: पुढील भागांत सामील करण्याचा आमचा विचार आहे. तो पहिल्या भागांतच ह्या तीन योगांबरोबर जोडला असता तर फार चांगलें दिसलें असतें खरें! पण तसें न करण्याचीं कारणें अनेक आहेत. आणि तीहीं बरींच सयुक्तिक आहेत. एक तर ज्ञानयोग हा अत्यंत गहन; त्यांतील विचार फार खोल; त्यांतील तत्वें अति उदात्त; अर्थात् तो साधारण जनांस समजण्यास फार बिकट आहे. तेव्हां इतर योग हे बरेच सोपे आहेत, तेच आधीं देणें प्रशस्त. व त्यांची नीट समजूत पटल्यावर, त्यावरून वेदांतशास्त्राचीं तत्वें बरींच चांगलीं कळूं लागल्यानंतर ज्ञानयोगासारखा ग्रंथ वाचकांस सादर करणें, योग्य होय. दुसरें कारण असें कीं, "ज्यांस अधिकार आहे, अर्थात् चांगलें ज्ञान आहे, तत्वज्ञानाकडे ज्यांची प्रवृत्ति आहे, अशांसच हा योग सांगावा." असें खुद्द स्वामींचें वचन आहे. आणि ह्मणून त्यांनीं पहिले तीन योग अमेरिकेस सांगितले, पण ज्ञानयोग तेथें सांगितला नाहीं! तो इंग्लंडास सांगितला. ह्याचें कारण उघडच आहे कीं, इंग्लंडचे विचार अति उच्च; व ते केवळ ज्ञानाच्या शिखरीं पोंचलें आहे–ह्मणजे तेथील लोक सर्वश्रेष्ठ असून, अध्यात्मज्ञानदानास अगदीं योग्य अधिकारी आहेत. अर्थात्

ज्ञानयोगाचें प्रतिपादन तेथें केलें तरच त्याचें चीज होईल, हें जाणून स्वामी विवेकानंदजींनीं तो तेथें सांगितला. तेव्हां ज्ञानयोगाची थोरवी फार मोठी असल्यामुळें, आह्मांस तसेंच करणें भाग आहे. ह्याकरितां, ह्या पहिल्या भागांतच आह्मीं ज्ञानयोग न दिल्याबद्दल वाचक आह्मांवर रोष करणार नाहींत, अशी आशा आहे. असो. दुसऱ्या भागांत हा ज्ञानयोग मुख्यतः देऊन, त्याच्याच तोडीचीं आणखी कांहीं अध्यात्मज्ञानपर पुस्तकें त्यांत सामील करण्याचा आमचा विचार आहे. शिवाय, साधल्यास, स्वामी विवेकानंद यांचें व त्यांच्या परमपूज्य गुरूंचें चरित्र समग्र मिळाल्यास देऊं, आणि वेदांत परिभाषा-म्हणजे पूर्वापार चालत आलेले वेदांतशास्त्राचे जे अवघड परिभाषिक शब्द आहेत, त्या सर्वांचें अगदीं सोप्या भाषेनें स्पष्टीकरण करण्याचा आमचा मनोदय आहे. ह्याप्रमाणें आमचें पुढील धोरण आहे. असो.

**वाचकांस अगत्याची विनंतीः**—प्रस्तुत मालेचा हा पहिला भाग प्रसिद्ध होण्यास बराच अवधि लागला. याचें कारण, या सालीं प्रस्तुत मंडळीचें कांहीं दैविक कोपानें बरेंच नुकसान झालें हें होय. आणि त्यांतही कै. घांटे, व कै. गुर्जर ह्यांसारखीं आमची लेखकरत्नें यंदा हरपल्यामुळें, मंडळींच्या ग्रंथप्रकाशनकार्यास बराच व्यत्यय आला. तर हीं कारणें लक्षांत आणून, मालेच्या दिनावधीबद्दल मनांत क्षमा वागवावी, व आपला उदार आश्रय पूर्ववत् द्यावा, येवढी आज वाचकांस अगत्याची विनंती करावयाची आहे. ह्मणूनच आतां—

## उदारआश्रय देण्याबद्दल देशबांधवांस शेवटचे विनयपूर्वक दोन शब्द.

प्रस्तुत माला काढण्याचें प्रयोजन काय, परमार्थज्ञान ह्मणजे काय, आमचा मुख्य हेतु कोणता, या मालेमध्यें स्वामी विवेकानंद यांचेच ग्रंथ प्रथमारंभीं कां घेतले, व जे ग्रंथ तयार झाले आहेत त्यांचें साधारण स्वरूप, इत्यादि गोष्टींचें येथपर्यंत विवेचन केलें व आतां आमच्या देशबांधवांस प्रस्तुत उद्योगास उदार आश्रय देण्याबद्दल विनयाच्या दोन शब्दांनीं विनंति करून आह्मीं ही फार लांबलेली प्रस्तावना किंवा हें ह्रद्गत पुरें करितों.

आजपर्यंत जे ग्रंथ आह्मीं प्रसिद्ध केले, त्यांना आमच्या गुणग्राही देशबांधवांकडून चांगला आश्रय देण्यांत येत गेला याबद्दल आह्मीं प्रभूचे व त्यांचे आभार मानितों. असा आश्रय मिळत गेला ह्मणूनच ही नवीन एक माला सुरू करण्याची आह्माला हुरूप आली. परंतु हेंही कबूल केलें पाहिजे कीं, फ्रान्स, इंग्लंड, अमेरिका, जर्मनी या देशांतील वाचक वर्गाशीं आमच्या देशांतील वाचक वर्गाची तुलना करितां आमच्या देशामध्यें वाचनाभिरुचि वास्तविक ज्या प्रमाणांत असली पाहिजे त्या प्रमाणांत नाहीं असें आढळून येतें. राष्ट्रोत्कर्ष ज्ञानाखेरीज व्हावयाचा नाहीं; उत्तम ग्रंथांच्या वाचनानें सर्वांच्या आत्म्यांमध्यें समान व दिव्य स्फूर्ति झाल्याखेरीज व सर्वांचा एक जीव झाल्याखेरीज वैभवाच्या मार्गावर राष्ट्राचें पाऊल कधींही पडावयाचें नाहीं. पहा. इंग्लंड, जपान व जर्मनी हे देश लहान आहेत तथापि

ते ज्ञानामुळें किती बरें योग्यतेस चढले आहेत ? पशु व मनुष्य; आणि मनुष्य व देव; या मध्यें जें श्रेष्ठत्व व कनिष्ठत्व आहे तें ज्ञानामुळें आलें आहे. साधारण मनुष्य व मुत्सद्दी; साधारण शिपाई व नेपोलियन; यांमध्यें ज्ञानाचेंच अंतर आहे. अडाणी इंग्रज माणसाला स्वदेशाचा अभिमान केवढा असतो बरें ? अडाणी मुसलमानाला आपल्या पंथाचा केवढा अभिमान असतो बरें ? हे सर्व परिणाम त्या त्या संस्कारापासून आहेत. हे संस्कार करून घेतल्याखेरीज कोणाच्याही अंगीं योग्यता किंवा अधिकार येत नसतो; एखादा मोठा संगमरवरी दगड आपल्यापुढें कोणी आणून ठेविला तर त्याबद्दल आपल्या मनाला कांहीं विशेष असें वाटणार नाहीं; परंतु तोच कोरून त्याची जर एक सुंदर मूर्ति बनविली तर मात्र तिकडे हें आपलें लक्ष्य वेधेलच वेधेल. हा प्रभाव कशाचा ? तर, संस्काराचा होय ! यावरून हें लक्ष्यांत येईलच कीं, जर एकाद्या मनुष्यसमाजाला थोरपणास चढणें आहे, तर त्याला ज्ञानाचे संस्कार घेऊन घेऊन जगाला आत्मतेजानें दिपविणारी; रमणीयतेनें मोह घालणारी; व प्रभावानें पावन करणारी; अशी दिव्य मूर्ति बनलें पाहिजे. असे संस्कार मागें आपण अनेक वेळां घेतले म्हणून काळाच्या विचित्र क्रमामध्यें आम्हीं अद्याप सुखरूप आहों. पुन्हां असे संस्कार घेण्याचा काळ आज आला आहे. तेव्हां काळाच्या महत्वाप्रमाणें आपण वेळींच कंबर बांधून तयार असलें पाहिजे, आणि आपल्या खऱ्या कामाला लागलें पाहिजे. राष्ट्राला उत्तम संस्कार देण्याचें प्रचंड काम केवळ अनंत आहे; तें श्रमविभागाच्या न्यायानें झालें पाहिजे, म्हणजे तें उत्तम होत असतें. विचारवंतांनीं ग्रंथ लिहिले;

दुसऱ्या कोणी ते प्रकाशित केले; व त्यांना योग्य लोकाश्रय मिळाला, ह्मणजे काम सुरेख होत असतें. या सर्व गोष्टी ध्यानांत घेऊन आमच्या देशबांधवांनीं आमच्या प्रयत्नास आपला उदार आश्रय द्यावा; ज्यांनीं आजवर दिला ते प्रेमानें पुढें देणार ही आमची खात्री आहेच; परंतु ज्यांच्याकडून आजवर आश्रय मिळाला नाहीं, त्यांनींही या पुढें ह्या आमच्या 'परम गहन' अशा 'सेवाधर्म'ऋमामध्यें आह्मांला उत्तेजन द्यावें; आणि अशा रीतीनें आत्मकर्तव्यांतूनही यथाशक्ति उत्तीर्ण व्हावें; अशी आह्मीं त्यांस शेवटीं सविनय विनंति करीत आहों! तिकडे आमचे वाचक—आमचे रसिक, आमचे श्रद्धाळू देशबांधव आणि तो जगच्चालक प्रभु, लक्ष पुरवो; आणखी आमचे शुभ संकल्प व सत्य मनोरथ पूर्ण करो! अस्तु.

**सत्यसंकल्पाचा दाता नारायण । सर्व करी पूर्ण मनोरथ ॥**

**( ॐ तत्सत्. )**



# महानुभाव स्वामी विवेकानंद

यांचा

## अल्प आयुःक्रम

—०-०:०:०-०—

**जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती ।**
**देह कष्टवीती उपकारें ॥** ( तुकाराम. )

ह्या स्वामींचें समग्र चरित्र आज येथें देणें इष्ट व अवश्य होतें, परंतु मोठ्या दुर्दैवाची गोष्ट ही कीं, प्रस्तुत स्वामींचें चरित्र, संक्षिप्तरूपानें सुद्धां कोठें उपलब्ध झालेलें नाहीं. स्वामी विवेकानंद हे संन्याशी म्हणजे केवळ विरक्त असल्याकारणानें स्वचरित्रासंबंधीं एकादा शब्द त्यांच्या तोंडून बाहेर पडण्याचा तितका संभवही नाहीं. त्यांच्याच कांहीं व्याख्यानग्रंथांतून कोठें आत्मचरित्रासंबंधानें कांहीं उद्गार-अगदीं तुरळक-असे-निघाले आहेत, तेवढीच कायती माहिती! त्यावरच हवाला ठेवून चालल्यावांचून दुसरा कांहीं निर्वाह नाहीं. केरळकोकिळ व विद्याविनोद ह्या दोन मासिकपुस्तकांतून त्यांची कांहीं माहिती अगदींच त्रोटकरूपानें आलेली आहे. केरळकोकिळांतील माहिती बरीच असावी असें वाटतें, परंतु ती अद्यापि पुरी बाहेर पडलेली नाहीं. आणि आहे तीही तितकी संगतवार असल्याचें दिसत नाहीं. तेव्हां ह्यांच्या चरित्रकथनासंबंधानें आम्हीं केवळ पंगु आहों तथापि त्यांची जेवढी माहिती उपलब्ध आहे, तीच चार दोन शब्दांनीं आम्ही येथें नमूद करितों. तीच वाचकांनीं गोड करून घ्यावी.

स्वामी विवेकानंद ह्यांची जन्मभूमी कलकत्त्याकडे असून, त्यांचे पूर्वाश्रमीचें नांव-नरेंद्रनाथ असें होतें. हे जातीनें बंगाली बाबू असून, क्षत्रिय आहेत. त्यांच्या मुखश्रीवर ब्रह्मतेज व क्षात्रतेज हीं एकत्र होऊन चमकत असल्यामुळें, यांचा चेहरा फार तेजस्वी दिसतो; व तो पाहून प्राचीन काळच्या क्षत्रियकुलोत्पन्न महर्षींची आठवण झाल्यावांचून राहत नाहीं. हे ज्या कुटुंबांत जन्मले, तें

कुटुंब साधारण-खाऊन पिऊन बरें, अशांपैकीं आहे. ह्यांचीं माता-पितरें अद्यापि हयात आहेत. हे बाळपणापासून बुद्धीनें फार चलाख असल्यामुळें, ते लैकरच कलकत्ता युनिव्हर्सिटीचे बी. ए. झाले. ह्यांस तत्वज्ञानाची व सृष्टिसौंदर्याची फार आवड आहे, असें त्यांच्याच कित्येक उद्गारांवरून दिसून येतें. ह्यांनीं, बी. ए च्या वेळीं तत्वज्ञान हाच विषय घेतला होता. परंतु स्वामींचें त्यावेळचें तत्वज्ञान निवळ अर्वाचीन, ह्मणजे पाश्चात्य ग्रंथांतून, नूतन शोधांच्या प्रवाहांतून वाहत आलेलेंच असावयाचें, हें उघड आहे. तेव्हां, त्यावेळीं त्यांची मनोवृत्ति तशीच बनलेली होती, हें कांहीं सांगावयास नकोच. ह्यांस तत्वज्ञानाचीच आवड असल्यामुळें, कोठें कांहीं अध्यात्म किंवा पारमार्थिक विषयांवर कोणाचें भाषण वगैरे असलें कीं, ह्यांनीं तेथें जावें, तें भाषण ऐकावें; आणि वक्ते जे कोणी आपण वेदांती, विरक्त, आत्मज्ञानी व साधु ह्मणून मिरवणारे असतील, त्यांच्याशीं पाखंडवाद करून, दीर्घ शंका काढून, त्यांनीं त्यांस नेहमीं कुंठित करावें, असा क्रम चालला. असें होतां होतां, पुढें एके दिवशीं, तेथेंच-कलकत्त्यासच-ह्यांच्याशीं एका महान् साधूंची गांठ पडली, व स्वामी विवेकानंद ह्यांच्या सर्व शंकांची पुरी निवृत्ति होऊन, ते सन्यासी बनले. हे महान् साधू म्हणजे भगवान् रामकृष्ण परमहंस हे होत. हे महान् कालिभक्त; महान् तपस्वी; महान् योगी; व महान् ज्ञानी, केवळ अवतारी पुरुष होते. हे बोलण्यांत फार चतुर; बहुश्रुत; व्यवहारज्ञानांत चांगले वहिवाटलेले; बहुतेक धर्मांत पारंगत; मृदुभाषणी; अज्ञान्यांस ज्ञानामृतपाजणारे; असे होते. ह्यांचीं वचनें सुभाषितांप्रमाणें रसाळ; इक्षुरसाप्रमाणें मिष्ट; आणि सुंदर व सोप्या व्यावहारिक दृष्टांतानें व सत्यज्ञानानें भरलेलीं असत- अशाशीं गांठ पडल्यावर मग काय विचारावें? तेथें कोणत्या बरें शंकांची निवृत्ति होणार नाहीं? सर्वांचीच होईल, यांत कांहीं संशय नाहीं. नेहमीं, अज्ञान मनुष्यांस अध्यात्मज्ञानाचीं तत्वें समजावून द्यावयाचीं; व सर्वांस परमार्थाचा नेहमीं उपदेश करावयाचा; हा ह्या परमहंसांचा परिपाठ असे. एके-समयीं, हे परमहंस नित्याप्रमाणें कांहीं मंडळींस उपदेश करीत अस-

तां, प्रस्तुत विवेकानंद स्वामी तत्वार्थबुभुत्सेनें तेथें गेले. त्यावेळीं स्वामी पाश्चात्य ज्ञानानें नुकतेच मंडित झालेले असल्यामुळें-त्यांची मनोवृत्ति कशी होती, हें वर सांगितलेच आहे-त्यांनीं परमहंसांचा उपदेश ऐकून घेऊन शेवटीं, पूर्वक्रमाप्रमाणें पाखंडवाद घेऊन, "महाराज! आपण तरी तो ईश्वर पाहिला आहे काय?" ह्मणून मोठ्या जोराचा प्रश्न केला. त्या प्रश्नानें इतर उपदेशक अगदीं गडबडून जात, व तेव्हांच कुंठित होत. कारण, उघडच आहे कीं, त्यांजपाशीं साक्षात अनुभव कोठून आणावा? पण हे परमहंस पडले पूर्ण ज्ञानी; व साक्षात् अनुभव घेतलेले! ते त्या प्रश्नास डगमगणार थोडेच! त्यांनीं एकदम शांतपणानें जबाब दिला कीं, "हो! हो! मी तर ईश्वर पाहिलाच आहे, पण तुलाही हवा तर दाखवितों. तुला पहावयाचा आहे काय?" ह्या उत्तरानें स्वामींची पूर्ण खात्री होऊन चुकली, कीं सर्व अध्यात्मज्ञानाचें खरें पाणी येथेंच मुरतें आहे. पुढें स्वामींचा त्यांशीं बराच सहवास होऊन त्यांच्या रसाळ व अध्यात्मज्ञानानें, परिप्लुत अशा उपदेशानें, स्वामींच्या सर्व शंकांची निवृत्ति होऊन, ते त्यांचे पट्ट शिष्य बनले. त्या वेळीं स्वामींनीं गृहस्थाश्रमांत न शिरतां, आजन्म कडकडीत ब्रह्मचर्यव्रत पाळण्याचा विडा उचलून, संन्यासदीक्षा घेतली; आणि नरेंद्रनाथ हें आपलें पूर्वाश्रमींचें नांव पालटून, आपल्या अध्यात्मविवेकप्रवृत्तीस साजेसें 'विवेकानंद' हें सुंदर व आनंदजनक नांव धारण केलें. आणि तेथपासून प्रस्तुत स्वामी योगाचा अभ्यास करूं लागले. ह्या स्वामींनीं हिमालयावर, अगदीं निर्जन प्रदेशांत, व कडक थंडींत, ऊन्ह, वारा, पाऊस, सहन करून, केवळ देहदंडन करून, एकांत वासांत सुमारें एक तप ह्मणजे १२।१३ वर्षे तरी वास्तव्य केलें असावें, असें त्यांच्याच कांहीं उद्गारांवरून दिसून येतें. सन १८८६ सालीं, आपल्या वयाच्या ५३ व्या वर्षी, त्यांचे परमप्रिय सद्गुरू, भगवान् रामकृष्ण (त्यांचें इत्थंभूत चरित्र देण्याचें सर्व साहित्य आह्मांपाशीं आहे. परंतु स्थलसंकोचास्तव, व विस्तारभयास्तव, या ठिकाणीं तें देणें अप्रशस्त, यास्तव आह्मी येथें तूर्त ऐवढ्यावरच भागवितों.) हे समाधिस्त (समाधिकालीं हे गुरु

खराखरच निर्विकल्प समाधींत अगदीं निमग्न होते ) झाले. ह्यामुळ परमहंसांच्या सर्व छात्रवर्गास परम दुःख झालें. मग त्यांचे पट्ट-शिष्य जे स्वामी विवेकानंद, त्यांस आपल्या परमप्रिय गुरूंचा वियोग किती बरें दुःसह झाला असेल? पुढें परमहंसांच्या सर्व शिष्यमंडळांत पुढें सद्गुरूंचें स्मारक काय करावें; हा प्रश्न पडला, आणि बरीच भवति न भवति होऊन अखेरीस, सद्गुरुंचा धर्मप्रसाराचा जो उद्देश होता, तोच तडीस नेण्याचा सर्वांनुमतें निश्चय ठरला. हा निश्चय ठरून सर्वांनीं संन्यासवृत्ति स्वीकारुन एकापेक्षां एक आनंदजनक नांवें धारण केलीं. कोणी अभेदानंद; कोणी शारदानंद; कोणी रामकृष्णा-दिनंद; कोणी आत्यानंद असे जिकडे तिकडे मूर्तिमंत आनंदी आनंदच होऊन गेले. पुढें स्वामी धर्मप्रसाराच्या हेतूनें, व यात्रिकाच्या रूपानें पुण्यास राष्ट्रीयसभेस गेले होते. तेथें त्यांनीं आपल्या भाष-णाची थोडीशी चमक दाखविली असें ह्मणतात, पण व्हावा तसा प्रसार झाला नाहीं. पुढें प्रस्तुत स्वामींनीं मद्रास, रामेश्वरपर्यंत गमन केलें. रामेश्वरास त्यांची फार चहा होऊन, तेथील महाराजांच्या प्रेरणेनें मद्रासेस वर्गणी वगैरे जमवून स्वामी चिकागोच्या प्रदर्शनसमयीं अमेरिकेस गेले. तेथें त्यांच्या भाषणाची इतकी चीज झाली कीं, तेथील मोठमोठ्या वर्तमानपत्रांत स्वमींचें देवतातुल्य वर्णन येऊन गेलें. पुढील हकीकत संक्षेपतः हृद्गतांत आलीच आहे. लेडी श्रद्धानंद नांवाची एक अमेरिकन बाई ( ही मुंबईसही एकदां आली होती. ) स्वामींवर छत्र धरीत असते. तूर्त स्वामी विवेकानंद अनेक मानपत्रें घेऊन, विश्रांतीस्तव स्वस्थानीं आल्यामुळें स्वामी अभेदानंद व शारदानंद तिकडे स्वधर्म प्रसार करीत आहेत. महानुभाव स्वामी विवेकानं-दजींच्या ह्या अल्प पण दिव्य चरित्राचा विचार करतां, व ते अवतीर्ण होण्याच्या पूर्वींची, आमच्या वैदिकधर्माची स्थिति लक्षांत आणतां, खालील गीता वचनाची साक्ष पटते. असो.

यदा यदाहि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
अभ्युथानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥

सुलभपरमार्थज्ञानमाला.

पुष्प १ लें.

# कर्मयोग.

(स्वामी विवेकानंद यांच्या व्याख्यानांचें भाषांतर.)

लेखक,

शंकर विठ्ठल कदम कातरणीकर, बी. ए.

प्रकाशक

दामोदर सांवळाराम आणि मंडळी.

बडोदें

"पूर्णचंद्रोदय" छापखाना.

सन १९००.

किंमत ६ आणे.

## मन्दाक्रान्ता.

"नास्था धर्मे न वसुनिचये नैव कामोपभोगे
यद्भाव्यं तद्भवतु भगवन्! पूर्वकर्मानुरूपम्।
एतत्प्रार्थ्यं मम बहुमतं जन्मजन्मान्तरेऽपि
त्वत्पादांभोरुहयुगगता निश्चला भक्तिरस्तु" ॥

—मुकुन्दमालायां श्रीकुलशेखरः

---

## स्रग्धरा.

धर्माची चाड नाहीं, धननिधि नलगे भोग कामादि सारे,
होवो जें व्हावयाचें नियमित, भगवन्! पूर्वकर्मानुसारें;
ह्या जन्मीं, अन्यजन्मीं, बहुमत मम ही प्रार्थना एक तूतें,
कीं त्वत्पादारविंदीं निशिदिनिं अचला भक्ति दे ह्या जनातें.

—चंद्रशेखर.



# प्रस्तावना.

**नहि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः ।**
**यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ॥***

—श्रीमद्भगवद्गीता: अ॰ १८, ११.

कर्मयोगावर प्रस्तावना लिहिणें हें कांहीं लहानसहान काम नव्हे. त्याला जाडी विद्वत्ता व वेदांत विषयाचें पूर्ण ज्ञान पाहिजे. मजसारख्या अल्पबुद्धि मनुष्याचे हातून हें काम पार पडणें फार कठीण आहे. वास्तविक अशा महत्वाचे विषयावर एकाद्या महापंडिताकडूनच ह्या प्रस्ताव-लेखाचें काम करून घेणें वाजवी होतें. स्वामी विवेकानंद महाराज कोठें व मजसारखा यःकश्चित् मनुष्यप्राणी कोठें! पण त्यास नाइलाज आहे. कित्येक अपरिहार्य अडचणी-मुळें हें काम स्वतःच शेवटास नेणें प्राप्त आहे! असो.

---

* अर्थ—देह धारण करणारास सर्व कर्मांचा त्याग करितां येणें शक्य नाहीं; म्हणून, जो कर्मफलाचा त्याग करितो त्यालाच 'त्यागी' असें म्हणतात.

श्रीमत्स्वामी विवेकानंद महाराजांनीं कर्मयोग, भक्ति-योग, ज्ञानयोग, राजयोग इत्यादि विषयांवर अमेरिकेंत व अन्यत्र दिलेलीं व्याख्यानें वाचून, ह्या व्याख्यानांचें महाराष्ट्र वाचकांकरितां बनेल तितक्या सोप्या भाषेंत भाषांतर करावें, अशी मनाला प्रेरणा होऊन हें काम मीं हातीं घातलें. वेदांत विषयावर संस्कृत भाषेंत नामांकित ग्रंथ आहेत; पण, ते सामान्य जनसमूहास समजण्याची आशा-च नाहीं. ज्ञानेश्वरीसारखा महाप्रासादिक व श्रीमद्भगवद्गीतेसारखा अप्रतिम ग्रंथ या विषयावर दुसरा नाहींच. पण हे ग्रंथ निव्वळ मराठी वाचकांस फार गहन आहेत. पुष्कळ महाराष्ट्र वाचक ह्या ग्रंथांचीं भाविकपणें पारायणें करितात; पण, त्यांपासून त्यांच्या अंतरंगांत पडावा तितका प्रकाश पडत नाहीं. श्रीमद्भगवद्गीता व ज्ञानेश्वरी या ग्रंथांचीं अलिकडे मराठींत भाषांतरें वगैरे होत असल्यानें वरील अडचण यद्यपि कांहीं अंशीं दूर होईल, तरी, स्वामी महाराजांसारख्या ज्या वाग्देवीकंठमणींनीं आपल्या रसाळ वाणीनें, आपल्या अगाध ज्ञानानें, अप्रतिम बुद्धिवैभवानें व अद्वितीय तेजानें सर्व जगांत श्रेष्ठपद पावलेल्या अमेरिकन लोकांस दिपवून टाकून, सन १८९३ सालीं अमेरिकेंत चिकागो येथील जंगी प्रदर्शनांत जगांतील सर्व धर्मांच्या प्रतिनिधींच्या प्रचंड सभेंत आर्यधर्म सर्व धर्मांहून श्रेष्ठ ठरविला, त्यांच्या अलौकिक संभाषणांचा महाराष्ट्र वाचकांस भाषांतररूपानें लाभ मिळणें अत्यंत

इष्ट आहे, हें कोणासही कबूल करावें लागेल. हल्लींच्या काळीं ज्या सिद्ध पुरुषानें आर्यधर्माचें अग्रेसरत्व सकल जगाकडून कबूल करविलें, अमेरिकेसारख्या अर्वाचीन सुधारणेच्या कळसास पोंचलेल्या, व शरीराचे चोंचले माजविण्यांत आणि ऐहिक सुखाची पराकाष्ठा करण्यांत गुंग झालेल्या परधर्मी देशास ज्यानें परमार्थाचा मार्ग दाखविला, इतकेंच नव्हे, तर, अमेरिकन स्त्रीपुरुषांनीं ज्याचें शिष्यत्व पत्करून आर्यधर्माच्या मठांची अटलांटिक् महासागरापलिकडे स्थापना केली, त्या प्रस्तुत कालच्या जगद्गुरु शंकराचार्यांचा महिमा काय वर्णावा! ज्या श्रीमद्रामकृष्ण परमहंसाचें चरित्र सातासमुद्रापलीकडील प्रो. मोक्षमुल्लर भट्टांनीं लिहिलें, त्यांचेच पट्टशिष्य श्रीमत्स्वामी विवेकानंद हे होत. असले गुरुशिष्य पाश्चात्य देशांत जन्मास येते तर त्यांचे तिकडील लोकांनीं किती तरी देव्हारे माजविले असते! पण कालचक्राचा महिमा असा आहे कीं, पाश्चात्य देशांत स्वामी विवेकानंद महाराजांनीं आर्यधर्माचें ध्वजारोपण केल्यावर त्यांची योग्यता इकडील लोकांस कळली! ह्या सत्पुरुषानें आपल्या भाषणांत व्यावहारिक दृष्टांत देऊन वेदांतासारखा गहन विषय सामान्य जनसमूहासही आकलन करितां येईल इतका सुगम केला आहे. त्यांपैकीं 'कर्मयोगा' वर अमेरिकेंत न्यूयॉर्क शहरीं जीं व्याख्यानें झालीं त्यांचें हें अष्टप्रकरणात्मक रूपांतर मीं महाराष्ट्र वाचकांस सादर केलें आहे. ह्यांत जो दोषयुक्त भाग असेल त्याबद्दल मींच सर्वस्वी

जबाबदार आहे. माझा हा पहिलाच प्रयत्न असल्यामुळें यांत दोषस्थलें पुष्कळ असतील. त्यांचा विवेकी वांचकांकडून हंसक्षीर न्यायानेंच विचार होईल अशी मला आशा आहे. भाषासुंदरीचे लावण्यास कमीपणा न येतां जितक्या सोप्या शब्दांची योजना करितां आली, तितकी मीं केली आहे. हा प्रयत्न कितपत सिद्धीस गेला आहे, हें ठरविण्याचें काम मीं आपल्या वाचकांवरच सोंपवितों.

आतां 'कर्मयोगा' संबंधानें थोडक्यांत लिहूं. या जगांत मनुष्यमात्राला 'कर्म' केलेंच पाहिजे. तें केल्याशिवाय कोणाचेंही क्षणभर चालावयाचें नाहीं. मथाळ्याला श्रीमद्भगवद्गीतेंतील जें अवतरण दिलें आहे, त्यांत सांगितल्याप्रमाणें मानवी प्राण्याला सर्व कर्मांचा त्याग करितां येत नाहीं. त्याला कर्माचरण अवश्य आहे. अलौकिक बुद्धिसामर्थ्याचे व प्रचंड इच्छाशक्तीचे सिद्धपुरुष मात्र या नियमास अपवाद आहेत. इतरांनीं कर्माचरण करून कर्मफलाचा सर्वस्वी त्याग करावा, ह्मणजे अहेतुक कर्माचरण करावें. फलाची अपेक्षा न करितां केवळ निष्कामबुद्धीनें आपण जें कर्म करितों, त्यापासून आपणांस सुखदुःखाचा विकार होत नाहीं. ही निष्कामता आपणांस पूर्णपणें संपादन करितां आली कीं, आपण विमुक्त बनूं. ही विमुक्त स्थिति आपल्या सर्व कर्मांची अवसानभूमि आहे. वेदांतांत मोक्षप्राप्तीचे कर्मयोग, भक्तियोग व ज्ञानयोग हे तीन मुख्य मार्ग सांगितले आहेत. भक्तीनें भक्ताला व ज्ञानानें ज्ञानी

मनुष्याला जें पद प्राप्त होतें, तेंच कर्मफलाचा त्याग करून, अर्थात् आपल्या सर्व कर्मांचीं फलें परमेश्वरास समर्पण करून, निष्कामता संपादिल्यानें कर्मयोगाच्या द्वारेंही आपणांस प्राप्त होईल.ही निष्कामता संपादणेंच फार कठिण आहे. ती संपादण्याकरितां प्रथमतः मनुष्यानें इंद्रियनिग्रह करण्यास शिकलें पाहिजे.* आरंभीं आरंभीं तर इच्छा अनावर होईल. पण विचारानें मनाला हळूहळू ताळ्यावर आणावें. असें होतां होतां कुमार्गापासून मन निवृत्त होईल. इतकें झाल्यावर, म्हणजे मन पूर्णपणें आपल्या ताब्यांत आल्यावर, स्वार्थत्यागास सुरुवात झाली पाहिजे. हें स्वत्व—हा आपलेपणा—हें मीं व माझें—सर्व दुःखास कारण आहे. हा स्वार्थ—हेतु सर्व कर्मांचे मुळाशीं आहे; त्यावांचून कार्य होणार नाहीं असें पुष्कळांचें ह्मणणें आहे. यांच्या मता-

* ह्मणून श्रीकृष्णानीं अर्जुनास उपदेश केला कीं,

तस्मात्त्वमिंद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ।
पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम्॥
श्रीमद्भगवद्गीता ३, ४१

ह्यावरील ज्ञानेश्वरींतील टीका अशी आहे:—

इयांचा पहिला कुरुठा (घरटें) इंद्रियें।
एथूनि प्रवृत्ति कर्मातें विये।
आधीं निर्दळूं घालीं तियें। सर्वथैव॥

प्रमाणें स्वार्थत्याग होणें शक्य नाहीं.† प्रत्येक गोष्टींत स्वार्थ हा आहेच. आपण आपल्या मुलांवर, पत्नीवर व मित्रांवर प्रेम करितों, त्यांतही स्वार्थ आहे. हें प्रेम कधींहीं अहेतुक नसावयाचें. ह्या प्रेमांत इतर कोणताही स्वार्थ नसला तरी आत्मसंतोषरूपी स्वार्थ आहेच. आपलीं मुलें आपणाला आवडतात, म्हणून त्यांच्या सुखाकरितां आपण झटतों. ह्या सर्वांच्या मुळाशीं आत्मसंतोष आहे. श्रीसमर्थ रामदास स्वामींसारख्या महापुरुषांनींही आत्मसंतोषरूप फळाची आशा सोडली नाहीं! तेव्हां, आपल्यासारख्या सामान्य

† या स्वार्थहेतूस अनुसरून व्यावहारिक दृष्टीनें उद्योगाचे सहा प्रकार मानण्यांत आले आहेत. ते असे:—(१) आपला व दुसऱ्याचा फायदा; (२) आपला तोटा न करितां दुसऱ्याचा फायदा; (३) आपला नफा पण दुसऱ्याचा तोटा नाहीं; (४) दुसऱ्याचा तोटा व आपला नफा; (५) आपला तोटा व दुसऱ्याचा नफा; (६) आपला व दुसऱ्याचाही तोटा. ह्यांत पहिला प्रकार उत्तम मानिला आहे. तो न साधल्यास दुसरा. तिसरा मध्यम. चवथा व पांचवा त्याज्य व सहावा अति नीच. धर्म, अर्थ व काम या तिहींनाही साधणाऱ्या लोकव्यवहारास अनुसरून सत्कीर्तिप्रद उद्योग करणें उत्तम मानिलें आहे. यापैकीं दोन साधणें मध्यम, एकावरच लक्ष ठेवणें कनिष्ठ व कांहींच न करणें अधम मानिलें आहे. परंतु परमार्थदृष्टीनें भर्तृहरीनें झटल्याप्रमाणें स्वार्थत्याग करून परहित साधणारेच खरे सत्पुरुष होत. वरील सहा प्रकारांचा भर्तृहरीनें केलेल्या चार वर्गांत समावेश होतो.

(पहा पृष्ठ ११४).

जनांची काय कथा? हा आत्मसंतोषाचा स्वार्थ शंभर नंबरी अथवा बावन्नकशी होय. ह्याच्या वरची परिपूर्ण आत्मपरित्यागाची एक पायरी आहे. ती एका बुद्धानें मात्र संपादिली. ह्मणून बुद्ध हा एकच खरा कर्मयोगी आजपर्यंत होऊन गेला. हें 'मीं व माझें,' हा स्वार्थ, समूळ नाहींसा झाला म्हणजे आपण पूर्ण अनासक्ति संपादन केली पाहिजे. सारांश, सर्व गोष्टींपासून आपण अलिप्त राहिलें पाहिजे. ही आसक्ति सुटणें फार कठिण आहे. संसारांतील मायाबंधनें शिथिल होत होत पार गळून पडलीं, ह्मणजेच आपण अनासक्त होऊं. ह्या मायाबंधनांमुळें जगद्गुरु श्रीमच्छंकराचार्यांसही आपली मातोश्री मृत्यु पावल्याची वार्ता ऐकून फार दुःख झालें व त्यांचे डोळे अश्रूंनीं भरून आले! तेव्हां हा मायापाश तोडून अनासक्त होणें ही सामान्य गोष्ट नव्हे. ही साधली कीं, आपल्या जीविताचें सार्थक होऊन आपण पूर्ण निष्काम बनलों ह्मणून समजावें. यावरून असें सिद्ध होतें कीं, इंद्रियनिग्रह, स्वार्थत्याग, अनासक्ति व निष्कामता हे कर्मयोगाचे चार आधारस्तंभ आहेत. हे आधारस्तंभ डळमळीत राहतील तोंपर्यंत कर्मयोगाची इमारत चांगल्या प्रकारें उभारली गेली असें ह्मणतां येणार नाहीं. हे स्तंभ पक्के झाले ह्मणजे आपण खरे कर्मयोगी होऊं. ह्या निष्काम पदाप्रत पोंचून विमुक्त होणें, हेंच आपलें इतिकर्तव्य होय.

वरप्रमाणें कर्मयोगाचा थोडक्यांत सारांश दिला आहे. स्वामी महाराजांच्या ह्या अष्टव्याख्यानमालिकेच्या आधा-

रानेंच सामान्य वाचकांस समजण्यासारख्या सोप्या भाषेंत सन १८९९च्या नवंबर महिन्याच्या 'बालबोध' मासिक पुस्तकांत 'कर्मयोग' या विषयावर एक छोटासा निबंध लिहिला आहे, तोही वाचनीय आहे. तरी, स्वामीजींचे विचार पूर्णपणें मनांत बिंबण्यास हीं आठही प्रकरणें मनः-पूर्वक वाचलीं पाहिजेत. त्याप्रमाणें वाचकांकडून 'कर्म' घडल्यास स्वामी महाराजांच्या विचारांचें चीज होईल.

शेवटीं, ज्या जगन्नियंत्या परमेश्वराचे कृपेनें हें काम पार पडलें त्याचे, ज्या सन्मित्रांची या कार्यास मदत झाली त्यांचें, व प्रकाशक या नात्यानें ग्रंथसंपादक व प्रसारक मंडळीचे, आभार मानून

**वेडेंवांकुडें गाईन। दास तुझा ह्मणवीन ॥**

ह्या श्रीसाधुतुकारामाच्या वचनाचें स्मरण करून जग-चालकाच्या चरणीं लीन होतों.

मुक्काम दामनगर, (काठेवाड). ता. १६ मार्च १९००, मिति फाल्गुन वद्य १ शके १८२१.

**शंकर विठ्ठल कदम**
**कातरणीकर.**

# अनुक्रमणिका.

प्रकरण.  पृष्ठ.



# कर्मयोग.

## प्रकरण १ लें.

### कर्माचा वर्तनावर परिणाम.



संस्कृत भाषेंतील 'कृ'=करणें, या धातूपासून 'कर्म' शब्दाची उत्पत्ति आहे. जें जें कांहीं आपण करतों, तें सर्व 'कर्म' होय. 'कृतींचे परिणाम' असा ह्या शब्दाचा पारिभाषिक अर्थ आहे. 'आपलीं पूर्वकालीन कृत्यें ज्यांस कारण झालीं आहेत, असे परिणाम' असा कधींकधीं अध्यात्मशास्त्रांत ह्याचा अर्थ होतो. परंतु 'कर्मयोगांत' 'कार्य' या अर्थानेंच आपणांस 'कर्म' शब्दाचा उपयोग करावयाचा आहे. मनुष्यमात्राच्या महत्वाकांक्षेची पराकाष्ठा म्हटली म्हणजे सत्यज्ञानसंपादन होय; व हीच अत्युत्कृष्ट कल्पना पूर्वात्य तत्वज्ञानानें आपणांपुढें ठेविली आहे.

मनुष्याचें इतिकर्तव्य सुख नव्हे, तर, तें ज्ञान होय. मौज व सौख्य हीं विनाशी होत. सुख हीच आपल्या कर्तव्याची परमसीमा आहे अशी कल्पना करणें, ही मनुष्याची चूक होय. सुख हीच सर्वोत्कृष्ट वस्तु असून तिच्याकरितां आपण झटावें, ही मानवी प्राण्याची भ्रामक समजूत जगांतील सर्व दुःखांच्या मुळाशीं आहे. कांहीं काळ लोटल्यावर मात्र मनुष्यास असें वाटूं लागतें कीं, आपणांस ज्या दिशेकडे जावयाचें आहे, ती सुखाची दिशा नसून ज्ञानाची आहे; सुख व दुःख हे दोन मोठे शिक्षक आहेत; व बऱ्याप्रमाणें वाईटापासूनही आपणांस सत्याचें ज्ञान करून घेतां येतें. सुखदुःखें आत्म्यासमोरून जातांना त्यांचीं भिन्न प्रतिबिंबें त्यावर उमटतात; व ह्या ठशांचे एकीकरणानें होणाऱ्या परिणामास मनुष्याचें ‘वर्तन’ असें म्हणतात. कोणत्याही मनुष्याचें वर्तन घ्या, तें त्याच्या मनःप्रवृत्तींचें एकीकरणच होय; त्याचें वर्तन बनविण्यास सुखदुःखांनीं आपली कामगिरी सारखीच बजावली आहे; वर्तनास वळण देण्यांत सुखदुःखाचे भाग समसमान असून, कित्येक प्रसंगीं तर सुखापेक्षां दुःखापासूनच अधिक शिक्षण मिळालें आहे, असें आपणांस आढळून येईल. जगांत आजपर्यंत जे थोर पुरुष होऊन गेले, त्यांच्या वर्तनाचें नीट मनन केलें तर, आपणांस असें दिसून येईल कीं, त्यांपैकीं पुष्कळांस सुखापेक्षां दुःखामुळें व संपत्तीपेक्षां दारिद्र्यामुळेंच अधिक ज्ञानप्राप्ति झाली. स्तुतीपेक्षां प्रहारांनींच त्यांचें अंतस्तेज अधिक प्रज्वलित झालें.

आणखी दुसरें असें कीं, मनुष्यमात्राचे ठायीं हें ज्ञान आनुवंशिक आहे. कोणतेंही ज्ञान बाह्यसृष्टींतून येत नाहीं; त्याचें अस्तित्व अंतरात्म्यांतच असतें. आपण ज्यास मनुष्य 'जाणतो' असें म्हणतों, त्यास खास अध्यात्मिक भाषेंत 'उमगतो' अगर 'उघडदशेस आणतो' असें म्हटलें पाहिजे. वस्तुतः मनुष्य जें 'शिकतो', तें अगम्य ज्ञानाची खाण जो आत्मा त्यावरील झांकण काढून 'उघड करतो'. न्यूटननें गुरुत्वाकर्षणाचा शोध लावला, असें आपण म्हणतों. हें गुरुत्वाकर्षण एका कोंपऱ्यांत त्याची मार्गप्रतीक्षा करीत बसलें होतें कीं काय? नाहीं. तें त्याच्या मनांतच होतें. वेळ आली तेव्हां तें त्यास आढळून आलें. आजपर्यंत जगास जें ज्ञान प्राप्त झालें आहे, तें सर्व मनापासूनच. विश्वांतील अगाध पुस्तकसंग्रहालय तुमच्या मनांत आहे. बाह्यसृष्टि ही केवळ एक सूचना अगर प्रसंग आहे. तिचेयोगानें तुम्हीं आपल्या मनाचें परिशीलन करूं लागतां. तुमचें मन हा नेहमीं तुमचा अध्ययनविषय होय. ॲपल फळाच्या पडण्यानें न्यूटनच्या मनाला प्रेरणा झाली, व त्यामुळें तो त्या गोष्टीचें मनन करूं लागला. त्यानें आपल्या मनांतील पूर्वीच्या सर्व विचारांची सांगड नीट जुळविली, व त्यांत त्यास एक नवीन सांखळी आढळून आली. हिलाच आपण गुरुत्वाकर्षणाचा नियम असें म्हणतों. हा नियम ॲपल फळांत नव्हता अगर पृथ्वीच्या केंद्रांत कोठेंही दडून राहिला नव्हता. यावरून असें सिद्ध होतें कीं, ऐहिक अगर पारमार्थिक सर्व ज्ञान मनुष्याच्या अंतरात्म्यांत आहे. त्यावर झांकण असल्यामुळें तें पुष्कळ बाबतींत कळून येत नाहीं;

पण हें झांकण हळूहळू जसजसें सारीत जावें, तसतसें 'आपणांस कळूं लागलें आहे' असें आपण म्हणतों, व हें आच्छादन नाहींसें करण्यांत जसजसें आपलें पाऊल पुढें पडत जातें, तसतसें आपलें ज्ञान वाढतें. ज्या मनुष्याच्या मनावरचें हें पटल दूर होत जातें, तो ज्ञाता होय; ज्याच्या मनावर तें घट्ट बसतें, तो अज्ञ होय; व ज्यापासून तें अगदीं नाहींसें झालें आहे, तो सर्वज्ञ होय. आजपर्यंत पुष्कळ सर्वज्ञ होऊन गेले व, मला वाटतें, यापुढेंही होतील. भावि कालचक्रांत असे लक्षावधि निपजतील. गारगोटीच्या तुकड्यांतील अग्निकणाप्रमाणें ज्ञानाचें अस्तित्व मनांत आहे. बाह्यसृष्टींतील सूचनारूपी घर्षणानें हे अग्निकण बाहेर पडतात. आपल्या सर्व मनोविकारांची व आपल्या हातून घडणाऱ्या सर्व कृत्यांची अशीच स्थिति आहे. आपण शांतपणें मनन करूं लागलों तर आपणांस असें आढळून येईल कीं, आपले आनंदाश्रु व दुःखाश्रु, आपलीं सुखदुःखें, आपलें हसणें व रडणें, आपले शाप व आशीर्वाद, आपली स्तुति व निंदा—ह्यांतील प्रत्येक गोष्ट—बाह्यसृष्टींतील आघातांनीं आपल्या अंतरात्म्यांतून बाहेर पडली आहे. ह्या आघातांमुळें आपण कोण आहों, हें निश्चित होतें. ह्या सर्व आघातांच्या समुच्चयाला 'कर्म', कार्य, असें म्हणतात. आत्म्याचें तेज प्रकट करण्याकरितां व त्याच्या प्रभावाचें आणि ज्ञानाचें आविष्करण होण्याकरितां त्याजवर जो जो शारीरिक व मानसिक प्रहार होतो, त्या प्रत्येकास व्यापक अर्थानें 'कर्म' म्हणतात. सारांश, आपण जन्मभर सर्वकाळ कर्माचरणच करीत असतों. मी तुम्हांस सांगतों हें 'कर्म'

होय. तुम्हीं ऐकतां हेंही 'कर्म' होय. आपण श्वासोच्छ्वास करतों, चालतों, बोलतों, हें सर्व 'कर्म' होय. आपण शारीरिक अगर मानसिक जें जें कांहीं करतों, तें सर्व 'कर्म'च होय. हें सर्व आपल्या मनावर कायमचा परिणाम करून ठेवीत असतें.

कित्येक कामें अशीं आहेत कीं, त्यांस पुष्कळशा लहान लहान कामांचा समुच्चय अगर एकुणात असें म्हणतां येईल. आपण समुद्रकिनाऱ्यावर उभे राहून वालुकाप्रदेशावर लाटा आदळतांना ऐकल्या म्हणजे, हा किती तरी मोठा आवाज आहे! असें आपणांस वाटतें. तरीपण आपणांस ठाऊक असतें कीं, लक्षावधि लहान लहान लाटा मिळूनच एक प्रचंड लाट बनली आहे. ह्या प्रत्येक लहान लाटेचा आवाज होत असतो, पण तो आपणांस ऐकूं येत नाहीं. जेव्हां सर्व मिळून एक जंगी लाट बनते, तेव्हांच काय तो आपणांस एक मोठा अवाज ऐकूं येतो. त्याचप्रमाणें काळजाचा एकेक ठोका मिळून एक मोठें प्रचंड कार्य होतें. कित्येक कार्यें अशीं आहेत कीं, त्यांचें ज्ञान केवळ स्पर्शानें होतें; पण हीं सर्व, लहान लहान कार्यें एकवटूनच बनलेलीं असतात. तुम्हांस जर मनुष्याच्या वर्तनाची खरी परीक्षा करणें असेल तर, त्यानें केलेल्या मोठमोठ्या कर्तबगारीच्या कामांकडे लक्ष देऊं नका. एकादा मूर्ख मनुष्य देखील कधींकाळीं योद्धा बनूं शकेल; करितां मनुष्य जेव्हां आपलीं अगदीं साधारण कामें करीत असतो, तेव्हां त्याजवर नजर ठेवा. असें केल्यानेंच थोर पुरुषाच्या खऱ्या वर्तनाची तुम्हांस परीक्षा होईल. मोठ-

मोठाल्या प्रसंगीं अति क्षुद्र मानवी प्राण्यांच्याही मनोवृत्तींचें एकादें उच्च पद संपादन करण्याकरितां उद्दीपन होतें. म्हणून ज्याचें वर्तन नेहमींच थोर असतें, मग तो कोठेंही असो, तोच खरा थोर पुरुष होय.

'कर्माचा वर्तनावर परिणाम' या दृष्टीनें पाहिलें असतां 'कर्म' ही एक प्रचंड शक्ति आहे; व ह्या शक्तीशीं मनुष्याची गांठ आहे. मनुष्य म्हणजे एक प्रकारचें केंद्रस्थान असून तें विश्वांतील सर्व शक्तींस आपल्याकडे ओढीत असतें. ह्या सर्व शक्तींचा ह्या केंद्रांत एकरस होऊन तेथून त्या एका मोठ्या प्रवाहाच्या रूपानें बाहेर पडतात. असा केंद्र म्हणजे मायातीत पुरुष होय; व हाच सर्वशक्तिमान् व सर्वज्ञ परमेश्वर असून तो सर्व विश्वाचें आकर्षण करीत असतो. बरेंवाईट, सुखदुःख, ह्या सर्वांची गति त्याजकडे असून तीं त्याचा आश्रय करितात. ह्या सर्वांपासून तो वर्तनरूपी प्रवृत्तीचा एक प्रचंड प्रवाह तयार करून त्यास बाहेर सोडून देतो. ज्याप्रमाणें वाटेल तें आपल्याकडे आकर्षून घेण्याची त्याला शक्ति आहे, त्याचप्रमाणें त्याचें कार्य होऊन तें फलप्रद होण्याकरितां दूर झुगारून देण्याचेंही सामर्थ्य त्याचे अंगीं आहे.

आतां, जगांत आपण पहातों तीं सर्व कृत्यें, मानवी समाजांतील सर्व हालचाली, आपल्या आसपासचीं सगळीं कामें, हीं केवळ मनुष्याच्या इच्छेचें आविष्करण, त्याच्या विचारशक्तीचें प्रकाशनच, होत. यंत्रें, हत्यारें, शहरें, जहाजें, मोठमोठालीं लढाऊ गलबतें वगैरे सर्व कांहीं मनु-

ष्यप्राण्याच्या इच्छाशक्तीचें व्यंजकच होय. ह्या इच्छाशक्तीस वर्तन कारण असून, वर्तनास 'कर्म' हें कारण आहे. इच्छेचें आविष्करण 'कर्मा'नुसारी आहे. ज्यांची इच्छाशक्ति दांडगी, असे पुष्कळ लोक आजपर्यंत जगांत होऊन गेले. त्या सर्वांची काम करण्याची पराकाष्ठा असे. हे शरीरानें भीमाप्रमाणें जबरे असत. यांची अफाट इच्छाशक्ति जगत्त्रयाची उलथापालथ करण्यास पुरून उरेल अशी होती. ही शक्ति त्यांस युगेंच्यायुगें सतत परिश्रम करून प्राप्त झाली. बुद्ध अगर ख्रिस्त यांच्यासारखी अफाट इच्छाशक्ति प्राप्त होणें ह्मणजे एका जन्मांतील कर्माचें फल होय असें ह्मणतां येणार नाहीं. कारण यांचे जनक कोण होते, हें आपणांस माहित आहे. मनुष्यजातीच्या कल्याणाकरितां त्यांच्या जनकांनीं एक शब्दही उच्चारल्याचें कोणास ठाऊक नाहीं. जोसेफ[1]सारखे लाखों सुतार होऊन गेले, व अद्याप हयात आहेत. बुद्धाच्या जनकाप्रमाणें लक्षावधि लहानसहान राजे जगांत होऊन गेले. तेव्हां केवळ परंपरागत जर ही गोष्ट मानिली तर, चाकरही ज्याची आज्ञा पाळीत नसतील, अशा ह्या लहानशा राजाचे पोटीं ज्याच्या सेवेंत अर्धें जग झुलत आहे असें पुत्ररत्न निपजतें, याचें बीज तरी काय असावें? जोसेफ सुतार व लक्षावधि मनुष्यप्राणी ज्याला देवाप्रमाणें भजतात असा त्याचा मुलगा, यांजमध्यें जें महदंतर आहे, त्याचा उलगडा तरी कसा होणार? वंशपरंपरेच्या उपपत्तीनें ह्या गोष्टीचा खुलासा

१ येशूख्रिस्ताचा बाप. हा सुताराचा धंदा करी; म्हणून येशूला 'सुताराचा मुलगा' (Carpenter's Son) असें म्हणतात.

होणें शक्य नाहीं. ही जी प्रचंड इच्छाशक्ति बुद्धानें जगभर पसरली व जी येशूपासून उद्भवली ती आली तरी कोठून? ह्या शक्तीच्या संचयाचें उत्पत्तिस्थान तरी कोणतें? अर्थात्, ती युगेंच्यायुगें एका ठिकाणीं सारखी वाढत राहून शेवटीं बुद्ध व येशू या रूपानें समाजावर येऊन धडकली, असेंच ह्मटलें पाहिजे. हिचा प्रभाव आजतागाईतही चालू राहिला आहे.

हें जें सर्व सांगितलें, तें 'कर्मा'नें निश्चित होतें. मनुष्य मिळवून आणीपर्यंत त्यास कांहीं मिळत नाहीं, हा सनातन नियम आहे. तें तसें नाहीं, असें कधींकधीं आपणांस वाटतें; पण परिणामीं, तें तसें असल्याचें आपल्याला कबूल करावेंच लागतें. एकादा मनुष्य श्रीमंत होण्याकरितां जन्मभर धडपड करील; हजारों लोकांस तो फसवील; पण शेवटीं त्याला असें दिसून येईल कीं, आपण श्रीमंत होण्यास पात्र नसून आपलें आयुष्य ह्मणजे एक मोठी उपाधि आहे. आपण शारीरिक सुखाकरितां कितीही वस्तु जमविल्या तरी जें कांहीं आपण खरोखर संपादन करतों, तेंच आपलें होय. एकाद्या मूर्खानें जगांतील सर्व पुस्तकें विकत घेऊन, आपल्या पुस्तकालयांत ठेविलीं तरी, जीं पुस्तकें वाचण्याची त्याची लायकी आहे, तींच त्याला वाचतां येतील. ही लायकी 'कर्मा' पासून उत्पन्न होते. आपली पात्रता काय आहे, व कोणत्या गोष्टी आपणांस आपल्याशा करून घेतां येतील, हें आपल्या 'कर्मा' नेंच निश्चित होतें. आपण जेंकांहीं आहों, त्याबद्दल आपणच जबाबदार आहों; व आपण ज्या पदाला जाण्याची इच्छा करितों, तें पद प्राप्त

करून घेण्याची आपल्या अंगीं शक्ति असते. आपण हल्लीं जें आहों, तें आपल्या पूर्वकालीन कृत्यांचा परिणाम असेल तर, असें खात्रीनें ह्मणतां येईल कीं, यापुढें जेंकांहीं होण्याची आपली इच्छा आहे, तें आपल्या प्रस्तुत कृत्यांचेंच फल असलें पाहिजे. ह्मणून, आपलें वर्तन कसें ठेवावें हें ओळखणें आपलें कर्तव्य होय. तुह्मी ह्मणाल कीं, 'काम कसें करावें हें शिकण्यापासून काय फायदा आहे? प्रत्येक मनुष्य कोणत्यातरी मार्गानें या जगांत काम करीत असतोच.' पण यांत आपल्या उत्साहाचा क्षय होत असतो, हें तुह्मीं विसरतां कामा नये. ह्या कर्मयोगासंबंधानें श्रीमद्भगवद्गीतेंत असें ह्मटलें आहे कीं, काम कसें करावयाचें हें समजून घेऊन—ह्मणजे शहाणपणानें व आपण एकाद्या शास्त्राचा अभ्यास करीत आहों असें जाणून—जर एकादें काम केलें, तर त्यापासून अत्युत्कृष्ट फलप्राप्ति होईल. तुह्मीं इतकें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, मनांत ज्या शक्तीचें वास्तव्य आहे त्या शक्तीला बाहेर आणण्याचा, ह्मणजे आत्म्याला जागृत करण्याचाच, सर्व कार्यांचा हेतु आहे. प्रत्येक मनुष्याच्या अंतर्यामीं ही शक्ति असून तेथेंच ज्ञानहि असतें; व हीं नानाविध कार्यें ह्मटलीं ह्मणजे, ज्ञान बाह्यसृष्टींत आणणारे, अर्थात् ज्ञानरूपी धिप्पाड पुरुषास जागे करणारे, प्रहारच होत.

कार्य करण्यांत मनुष्याचे विविध हेतू असतात; कारणाशिवाय कार्य शक्यच नाहीं. कित्येक लोक कीर्तीच्या अपेक्षेनें कार्य करतात; कित्येक द्रव्यार्जनार्थ करितात; कित्येक सत्तेकरितां व कोणीकोणी मोक्षपद प्राप्त होण्याकरितां.

मरणोत्तर आपलें नांव रहावें अशी चीन देशांतील लोकांप्रमाणें, कित्येकांची इच्छा असते. चीन देशांत कोणाही मनुष्यास तो मेरेपर्यंत कोणतीच पदवी मिळत नाहीं; व एकंदरीनें पहातां आपल्यापेक्षां हाच मार्ग अधिक श्रेयस्कर आहे. एकाद्या मनुष्यानें जर त्या देशांत फार चांगलें कृत्य केलें, तर त्याच्या मृत पित्याला अगर पितामहाला सरदारीची पदवी मिळते. ह्या आशेनें कांहीं लोक खपत असतात. कित्येक महंमदी धर्मपंथाचे कांहीं अनुयायी सर्व जन्मभर, मरणोत्तर जंगी थडगें मिळावें ह्मणून, सारखे झटत असतात. मला कित्येक पंथ असे माहित आहेत कीं, त्यांमध्यें मूल जन्मास येण्याचा उशीर, कीं त्याच्या थडग्याच्या तयारीस लागतात! ह्या पंथाच्या लोकांत मनुष्याचें हें अत्यंत महत्वाचें कर्तव्य गणलें असून, थडगें जितकें मोठें व सुंदर असेल, त्या मानानें तो मनुष्य धनवान् कल्पिला जातो. कित्येक तपाच्या रूपानें सत्कार्य करतात; असे लोक सर्व प्रकारचीं दुष्ट कृत्यें करून मग एक देऊळ बांधितात, किंवा उपाध्यायांना वश करून घेण्याकरितां त्यांना द्रव्य वगैरे देतात व स्वर्गाला जाण्याकरितां त्यांजवळून एक परवाना घेऊन ठेवतात. त्यांना वाटतें कीं, अशा प्रकारच्या परोपकारानें आपल्या पापांचें क्षाळन होऊन, आपण कितीही पापें केलीं असलीं तरी आपल्या केंसालाही धक्का न लागतां आपण मुक्त होऊं. कार्य करण्याच्या विविध हेतूंपैकीं कांहीं अशा प्रकारचे आहेत.

कर्माकरितांच कर्माचरण करा. मनुष्याच्या जीवनाला ज्याप्रमाणें मीठ आवश्यक आहे, तद्वतच प्रत्येक देशांत ज्यांची खरोखर आवश्यकता आहे, असे लोक केवळ कर्माकरितांच कर्माचरण करतात. हे नांवाची, कीर्तीची अगर स्वर्गाची देखील परवा करीत नाहींत. आपल्या कृत्यांचा चांगला परिणाम होईल, ह्मणूनच ते उद्योग करितात. कित्येक लोक तर यापेक्षांही अधिक उन्नत विचार करून गरिबांचें कल्याण, व मनुष्यजातीस मदत, करितात; कारण दुसऱ्याचें बरें करणें हें सत्कार्य आहे असें ते मानितात, व जेवढें ह्मणून चांगलें असेल त्या सर्वांवर त्यांची प्रीति असते. आतां आपण हेतुविषयक गोष्टी—नांव व कीर्ति—यांजकडे वळूं. ह्या हेतूंपासून तात्कालिक फलप्राप्ति क्वचित् होते. नांव आणि कीर्ति हीं सामान्यतः, आपण वृद्ध झालों व आयुष्याशीं आपला बहुतेक संबंध संपला ह्मणजे आपणांस प्राप्त होतात. मीं जन्मभर कीर्तीकरितां झटून श्रम केले तर, सामान्येंकरून मला असें दिसून येतें कीं, अगदीं शेवटीं ती थोडीशी प्राप्त होते; नांव मिळविण्याकरितां मीं जर आजन्म झगडत राहिलों तर, परिणामीं मला त्याचा अल्पांश काय तो मिळतो; तद्वतच मला जर आधिभौतिक असें कांहीं पाहिजे असेल, तर तें मला सुदीर्घ कालानें प्राप्त होईल व तेथेंच त्याची गति खुंटेल. पण एकादा मनुष्य स्वार्थबुद्धीचा त्याग करून, काम करूं लागला, तर, त्याचें काय बरें होईल? त्याला कांहींच प्राप्ति होणार नाहीं का? अर्थात् झालीच पाहिजे; व तीही सर्वांहून जास्त. निरपेक्षबुद्धि अधिक फलप्रद असते; पण लोकांस मात्र ती नित्य अम-

ळांत आणण्याचा धीर नसतो. शारीरिक महत्वाच्या दृष्टी-नेंही ती अधिक फलद्रूप आहे. नीति, सत्य आणि निर-पेक्षबुद्धि हीं केवळ, नीतितत्वांची अलंकारिक रूपें नाहींत. हीं सर्व मिळून आपली एक अत्युच्च कल्पनासृष्टिच बनली आहे; कारण त्यांमध्यें शक्तीचें आविष्करण तसेंच आहे. प्रथमतः कोणीही मनुष्य पांच दिवस अथवा पांच मिनिटें का होईना, स्वार्थाचे हेतूंस अजिबात फांटा देऊन, पुढचे विचार मनांत न आणतां, व स्वर्ग, शिक्षा, अगर तसल्या दुसऱ्या कोणत्याही गोष्टींची पर्वा न करितां जर आपलें काम करूं शकेल, तर, त्याचे अंगीं नीतिमान् असा प्रबल व धिप्पाड पुरुष बनण्याची धमक आहे असें ह्मणतां येईल. असें करणें दुष्कर आहे; परंतु त्यापासून किती फायदे आहेत व त्याचें मोल किती आहे, हें आपल्या अंतरात्म्यास चांगलें कळतें. हें शक्तीचें फार मोठें आविष्करण आहे— हा प्रचंड निरोध, हें आत्मसंयमन, यामध्यें इतर सर्व वरचढ कृत्यांपेक्षां अधिक शक्ति प्रकट झाली आहे. चार घोड्यांची गाडी जर एकाद्या टेंकडीवरून खालीं सोडली, तर, गाडीवाला घोडे आंवरूं शकेल अगर गाडी तशी-च तळाशीं जाईल. तेव्हां, घोड्यांना आंवरून धरणें अगर त्यांना मोकळें सोडणें या दोन कृत्यांपैकीं कोणतें कृत्य शक्तीचें अधिक द्योतक ह्मणतां येईल? वातावरणांत उडणारा चेंडू लांब अंतरावर जाऊन खालीं पडेल. दुसरा भिंतीला लागून त्याची गति खुंटेल, व त्यामुळें त्यांत प्रखर उष्णता उत्पन्न होईल. सारांश, स्वार्थबुद्धीमुळें हा सर्व व्यय होऊन तो केव्हांतरी नाहींसा होईल. त्यांत खर्च झालेली शक्ति

आपणांस परत मिळणार नाहीं; परंतु आत्म्याचें संयमन केलें तर मात्र, शक्तीचा विकास होईल. अशा प्रकारच्या संयमनापासून अफाट इच्छाशक्तीचा प्रादुर्भाव होतो; ह्मणजे ख्रिस्त अगर बुद्ध यांसारखी व्यक्ति बनते. मूर्ख लोकांना हें गूढ कळत नाहीं; तरी मनुष्यजातीवर अंमल करण्याची त्यांची इच्छा असते. मूर्ख मनुष्यांला एवढें कळत नाहीं कीं, धीर धरून काम केलें तर, आपल्यालाही सर्व जग ताब्यांत आणतां येईल. कांहीं वर्षे दम धरा; सत्ता चालविण्याच्या मूर्ख कल्पनेला आळा घाला; व ही कल्पना सर्वतोपरी नाहींशी झाली ह्मणजे तुमची इच्छाशक्ति सर्व जग आपल्या ताब्यांत आणील. लोक थोडेसे डॉलॅर[1] मिळविण्याकरितां धडपडत असतात व तसें करण्याकरितां ते आपल्या सजातीयास फसविण्याला मागेंपुढें पाहत नाहींत; त्यांनीं आपल्या वर्तनावर दाब ठेविला; तर, कांहीं वर्षांनंतर त्यांचें वर्तन इतकें उत्तम होईल कीं, त्यांची मर्जी असल्यास त्यांस लाखों डॉलर्स मिळवितां येतील. पण आपण सर्व एकाच माळेचे मणि आहों! कित्येक जनावरांना ज्याप्रमाणें कांहीं पावलांपलीकडे दिसत नाहीं तद्वतच आपणांपैकीं बहुतेकांची दृष्टि कांहीं वर्षांपलीकडे जात नाहीं. आपलें जग ह्मणजे एक लहानसें वर्तुळच बनतें. त्यापलीकडे दृष्टि फेंकण्यास

---

१ हें अमेरिकेंतील एक नाणें आहे. ह्याची किंमत जवळ जवळ ४ शिलींग म्हणजे हल्लींच्या हुंडणावळीप्रमाणें ३ रुपये होईल. हीं व्याख्यानें अमेरिकेंत न्यूयॉर्क शहरीं दिलेलीं आहेत, म्हणून स्वामींनीं तिकडील नाण्याचा निर्देश केला आहे.

आपल्याला धीर नसतो व ह्मणूनच आपण नीतिभ्रष्ट व दुष्ट बनतों. हा आपला कमकुवतपणा आहे.

अगदीं हलक्या प्रतीचीं कामें असलीं तरी त्यांचा तिट-कारा करूं नका. ज्या मनुष्याचें ज्ञान बेताचेंच आहे त्याला स्वार्थाकरितां—नांव व कीर्ति मिळविण्याकरितां—कर्मा-चरण करूं द्या; परंतु उच्च प्रतीचे हेतू कोणकोणते आहेत तें समजून घेऊन, त्यांकडे आपल्या मनाची प्रवृत्ति ठेवण्याचा प्रत्येकानें नेहमीं प्रयत्न करावा, हें त्याचें कर्तव्य आहे. कर्माचरण करण्याला आपण अधिकारी आहों, पण तज्जन्य फलाचे नाहीं. कर्माचें फल अगर परिणाम काय होतील ते होऊं द्या; तिकडे लक्ष पुरवूं नका.* एकाद्या मनु-ष्यास मदत करण्याची तुमची इच्छा असेल, तर, त्या मनु-ष्यानें तुमच्याशीं कशा रीतीनें वागावें, याबद्दल तुमच्या मनांत कधींही विचार येऊं नयेत. फल काय होईल हें समजून घेण्याची अगर त्याच्या गुणावगुणांचें विवेचन करण्याची अपेक्षाच धरूं नका. तुम्हांस एकादें मोठें व चांगलें कृत्य करावयाचें असेल, तर त्याच्या परिणामासंबंधानें तुम्हीं आपल्या जिवाला त्रास करून घेऊं नका.

कार्य करण्याची ही जी अत्युत्कृष्ट कल्पना आहे, ति-च्यासंबंधानें एक प्रश्न उद्भवतो. ह्या प्रश्नाचा विचार करणें

---

* श्रीमद्भगवद्गीतेंत असाच उपदेश केलेला आहे:—

कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।
मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते संगोऽस्त्वकर्मणि ॥

(अ० २, ४७.)

फार कठिण आहे. प्रबल क्रियाशक्ति अवश्य आहे. आपल्याला काम हें नेहमीं केलेंच पाहिजे. व्यवसाय केल्याशिवाय आपलें एक पळभरही चालावयाचें नाहीं. तेव्हां परमविश्रांतीची वाट काय? एक चित्र असें आहे कीं, त्यांत जीविताकरितां धडपड—उद्योग—चालूच आहे. यामध्यें आपण समाजांतील आयुष्यक्रमाभोंवतीं भोंवऱ्याप्रमाणें गरगर फिरत असतों. दुसरें चित्र शांत व एकांतसेवी सर्वसंगपरित्यागाचें आहे. यांत तुम्हांसभोंवतीं सर्व कांहीं शांततेनें भरलेलें असून गलबला व भपका यांचें नांव नाहीं, म्हटलें तरी चालेल. सृष्टिसौंदर्य, प्राणी, पुष्पें व पर्वत यांनींच सर्व व्यापून टाकिलेलें आहे. पण दोहोंपैकीं एकही चित्र निर्दोष असें नाहीं. एकादा नालायक मनुष्य सर्वसंगपरित्यागाच्या उत्कृष्टकल्पनेप्रमाणें वागूं लागला तर, या जगांतील कल्लोळाच्या भोंवऱ्याशीं त्याचें संघट्टन होतांच, त्याचा चुराडा होऊन जाईल. माशाचें जीवित त्याजवरील पाण्याच्या वजनावर अवलंबून आहे. म्हणून खोल समुद्रांतील मासा पृष्ठभागावर येतांक्षणींच त्याचे जसे शतशः तुकडे होतात, तद्वतच जे लोक नेहमीं एकांतवासांत राहून काम करण्याचा कधींही प्रयत्न करीत नाहींत त्यांचे, जगाशीं संबंध येतांच, तुकडे तुकडे होतात. याचप्रमाणें ज्या मनुष्यास संसारांतील धडपडींची संवय होऊन गेलेली असते तो शांत जागेंत जगेल तरी का? तो जर तेथें जिवंत राहिलाच तर त्याला. वेड्याच्या इस्पितळांत पाठविल्याशिवाय गत्यंतर नाहीं. म्हणून, ज्यांला मोठ्या शांततेच्या जागीं व एकांतवासांत प्रबल क्रियाशक्ति दिसते, व ज्यां

ठिकाणीं क्रियाशक्ति प्रबल झाली आहे त्या ठिकाणीं अरण्यांतील शांतता व एकांतवास आहेसें वाटतें, तोच परमपुरुष* होय. त्याला संयमनाचें इंगित कळलें व त्यानेंच आत्मसंयमन केलें असें ह्मटलें पाहिजे. असा मनुष्य व्यापारधंद्यानें गजबजलेल्या मोठ्या शहराच्या रस्त्यांतून फिरतो; पण त्याचें मन, कसलाही ध्वनि जेथें ऐकूं जावयाचा नाहीं अशा गुहेंत असतांना जितकें शांत असतें, तितकेंच येथेंही असून, सर्वकाळ त्याचें काम झपाट्यानें चालू असतें. हीच **'कर्मयोगा'** ची अत्युत्कृष्ट कल्पना आहे. ह्या कल्पनेपर्यंत तुम्हीं मजल मारली, म्हणजे काम करण्याची गुरुकिल्ली खरोखरच तुमच्या हस्तगत झाली, असें समजा.

असो. आपल्याला आरंभापासून सुरुवात करावयाची आहे; नानाप्रकारचीं कामें जसजशीं आपणांकडे येतील तसतशीं तीं हातीं घेऊन, हळूहळू प्रत्यहीं अधिकाधिक निरिच्छ बनत गेलें पाहिजे. आपल्या वांट्यास जें काम आलें आहे, तें आपल्यास केलेंच पाहिजे; व काम करण्यास उत्तेजन देणारी कोणती प्रवर्त्तकशक्ति त्या कामामागें दडून राहिली आहे, हें आपणांस हुडकून काढिलें पाहिजे. म्हणजे, पहिलीं वर्षें जातील त्यांत, प्रायः अपवाद न सांपडतां आपणांस असें दिसून येईल कीं, आपले हेतू नेहमीं स्वार्थपर असतात; पण हळूहळू ही स्वार्थपरता आपल्या निर्बंधानें वितळून जाईल, व शेवटीं अशी वेळ येईल कीं, आपणांस निदान मधूनमधून तरी खरोखरच निरिच्छपणें

* Ideal man.

काम करितां येईल. असें झालें म्हणजे, आयुष्यरूपी नदीच्या प्रवाहाबरोबर वाहत असतांना, कधींकाळीं तरी असा दिवस येईल कीं, आपण पूर्णपणें निरिच्छ बनूं. आपण असे होतांक्षणींच आपल्या सर्व शक्ती केंद्रप्रवण होऊन, आपलेंसें झालेलें सत्यज्ञान एकदम प्रकट होईल.



# प्रकरण २ रें.

## 'जो तो आपापल्या ठिकाणीं मोठा आहे.'



सांख्य[1]मताप्रमाणें सृष्टींत तीन प्रकारच्या शक्ती आहेत; **सत्व, रज,** आणि **तम.** जड सृष्टीमध्यें यांचीं जीं रूपें दृष्टीस पडतात, त्यांवरून यांस आकर्षणशक्ति, प्रति सारशक्ति, व या दोन शक्तींस दाबांत ठेवणारी शक्ति, अशीं नांवें देतां येतील. 'सत्व' ह्मणजे आकर्षक व प्रतिसारक शक्तींवर दाब ठेवणारी शक्ति; 'रज', प्रतिसारशक्ति व 'तम', आकर्षणशक्ति होय. 'तम', अंधःकार व आळस यांचें दर्शक आहे; 'रज', क्रियाशक्तीचें द्योतक आहे. यांमध्यें प्रत्येक परमाणु आकर्षक केंद्रापासून दूर जाण्याचा प्रयत्न करीत असतो; आणि 'सत्व' दोहोंस समतोल ठेवितें.

---

१ सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, मीमांसा व वेदांत ह्या षड्दर्शनांपैकीं हें एक आहे. कपिल महामुनि सांख्यमताचा संस्थापक आहे, असें ह्मणतात. ह्या मताप्रमाणें एकंदर तत्वांची 'संख्या' २५ आहे, ह्मणून यास 'सांख्य' मत ह्मणतात. पहिल्या २४ तत्वांचें चांगलें ज्ञान करून देऊन व आत्मा (पुरुष)–२५ वें तत्व–त्यांपासून भिन्न आहे असें दाखवून, आत्म्याची ह्या जगांतील अस्तित्वाच्या बंधनापासून शेवटची सुटका करणें, हा ह्या मताचा मुख्य उद्देश आहे. ह्या मतांत व वेदांतांत मुख्य फरक असा आहे कीं, यांतील दोन तत्वें वेदांतास मान्य नाहींत, व परमेश्वर जगाचा उत्पत्तिकर्ता व नियंता आहे हें जें वेदांताचें मत, तें सांख्यमतास असंमत आहे.

प्रत्येक मनुष्याचेठायीं या तिन्ही शक्ती आहेत. आपणांपैकीं प्रत्येकामध्यें कधींकधीं तमोगुणाचें प्राबल्य होतें. आपण आळशी बनतों; आपल्याला हालचाल करतां येत नाहीं; कित्येक कल्पनातरंगांनीं अगर केवळ सुस्तीनें जखडून टाकल्यामुळें आपणांस शिथिलता येते. कित्येक वेळां चंचलतेचें व कितीकदां तर दोहोंच्या शांत समतोलपणाचें–सत्वाचें–प्राबल्य होतें. भिन्न प्रवृत्तींच्या लोकांत भिन्न शक्तींचें वर्चस्व असतें. एका मनुष्याचा विशेष, आळस, सुस्ती व शिथिलता यांत असला तर, दुसऱ्याचा, चळवळ, सामर्थ्य व उत्साहाचें आविष्करण यांत असतो; व कर्तृत्व आणि निरुद्योगिता या दोहोंच्या समभागानें बनलेले, मधुरिमा, शांतपणा व सौम्यभाव हे तीन विशिष्ट गुण तिसऱ्याच मनुष्यांत आढळून येतात. सारांश, सर्व सृष्टींत–प्राणी, वृक्ष व मनुष्यें यांमध्यें–ह्या सर्व भिन्न प्रवृत्तींचें अथवा शक्तींचें कमजास्त मासलेवाईक आविष्करण झालेलें आपल्यास आढळून येतें.

'कर्मयोगांत' मुख्यत्वेंकरून सृष्टींतील ह्या तीन तत्वांचा अथवा प्रवृत्तींचा विचार करावयाचा असतो. हीं तत्वें काय आहेत व यांचा आपण कसा उपयोग करावा, हें कर्मयोगाच्या परिशीलनानें आपणांस कळतें, व त्यामुळें आयुष्यांतील आपलें कर्तव्य अधिक चांगल्या रीतीनें करण्यास आपल्याला मदत होते. मानवी समाज ही एक, पायरी पायरीनें बनलेली विशिष्ट रचना आहे. ह्या रचनेंत भिन्न प्रकारच्या अवस्था व परंपरा आहेत. नीति व कर्तव्य यसंबंधानें आपणांसर्वांस माहिती असते; तरीपण निरनिरा-

ल्या देशांत ' नीति ' या शब्दाच्या अर्थाविषयीं पुष्कळ फरक दृष्टीस पडतो. एका देशांत जें नीतीला धरून आहे असें वाटतें, तें दुसऱ्या देशांत नीतीला अगदीं सोडून आहेसें वाटणें संभवनीय दिसतें. उदाहरणार्थ, एका देशांत चुलत मामे-आते-बहीणभावांचीं लग्नें होऊं शकतात; पण दुसऱ्या देशांत असें करणें फार मोठें पाप समजतात. एका देशांत मेहुणीशीं लग्न लावतात, पण दुसऱ्या देशांत हें दुराचरण मानितात; एकाद्या देशांत लग्न एकदांच करतां येतें; कित्येक देशांत तें वाटेल तितके वेळां करतां येतें; इत्यादि पुष्कळ उदाहरणें आहेत. त्याचप्रमाणें नीतिशास्त्राच्या इतर सर्व शाखांमध्यें नीतीचें प्रमाण फार भिन्न असल्याचें दिसून येतें; तथापि नीतीची सर्वत्र लागू पडणारी इयत्ता असली पाहिजे, असें आपणांस वाटतें.

कर्तव्यासंबंधानें असाच प्रकार आहे. निरनिराळ्या राष्ट्रांत कर्तव्याची कल्पना फार भिन्न आहे. एका देशांत, मनुष्यानें कित्येक गोष्टी केल्या नाहींत, तर त्याचें वर्तन चुकीचें आहे असें लोक ह्मणतात; आणि त्याच गोष्टी त्यानें दुसऱ्या एकाद्या देशांत केल्या तरीही त्याचें करणें योग्य नाहीं, असें लोक ह्मणतात. असें आहे तरी, कर्तव्यासंबंधानें सार्वत्रिक अशी कांहीं कल्पना असली पाहिजे एवढें आपणांस कळतें. त्याचप्रमाणें समाजांतील एका वर्गाला कित्येक गोष्टी आपल्या कर्तव्यापैकीं आहेत, असें वाटतें; दुसऱ्या वर्गाची समजूत अगदीं उलट असते. दुसऱ्या वर्गांतील लोकांस ह्या गोष्टी करण्याची वेळ आली ह्मणजे त्यांच्या अंगावर शहारे येतात. आपणांला दोन मार्ग खुले

आहेत. ज्यांना वाटतें कीं, सत्याची दिशा काय ती एकच असून बाकीचे सर्व मार्ग खोटे आहेत, अशा अज्ञ जनांचा एक मार्ग; अथवा ज्यांचें असें मत आहे कीं, आपल्या मनाच्या अवस्थेप्रमाणें अगर आपल्या अस्तित्वाच्या भिन्न परिस्थितीप्रमाणें आपलें कर्तव्य व नीति हीं भिन्न असू शकतील, अशा सुज्ञ जनांचा दुसरा मार्ग. सारांश, कर्तव्य व नीति यांच्या पायऱ्या आहेत—ह्मणजे आयुष्यांतील एका प्रकारच्या विशिष्ट स्थितींत जें कर्तव्य असतें, तें इतर प्रसंगीं असणार नाहीं व असणें शक्यही नाहीं—हें समजून घेणें फार महत्वाचें आहे.

खालीं दिलेल्या दृष्टांतावरून ह्या सिद्धांताचें चांगलें स्पष्टीकरण होईल:—आजपर्यंत जे जे नामांकित गुरुवर्य होऊन गेले, त्या सर्वांनीं 'संकटाच्या आड येऊं नका' ह्या तत्वाचा उपदेश केला; संकटाच्या आड न येणें ही नीतितत्वाची अत्युच्च कल्पना आहे, असें त्यांनीं सांगितलें. आपण सर्व जाणून आहों कीं, ह्या देशांत राहणारा आपल्यापैकीं प्रत्येक मनुष्य हें वचन पूर्णपणें अंमलांत आणण्याचा प्रयत्न करील, तर, सर्व समाजमंदिराचे तुकडे तुकडे होऊन जातील, समाज रसातळास जाईल, दुष्ट व जुलमी लोक आपल्या जीविताचे व मालमत्तेचे धनी होऊन बसतील व त्यांच्या इच्छेनुरूप ते आपली वाट लावतील. एकच दिवस असा क्रम अप्रतिबंधपणें चालू राहिल्यास समाजाचा अगदीं विध्वंस होऊन जाईल. असें आहे तरी, 'संकटाच्या आड येऊं नका', या उपदेशाची सत्यता आपणांस हृदयाभ्यंतरीं भासते. ह्याच अत्युच्च कल्पनेकडे आपली

प्रवृत्ति असावी, हें खरें; तथापि ह्या मताचा उपदेश करणें ह्मणजे केवळ, मानवी जातीचा एक मोठा भाग अपराधी ठरवून त्यास शिक्षा करण्यासारखें आहे; इतकेंच नव्हे तर, त्यायोगानें आपण नेहमीं चूक करीत आहों असें मनुष्यांस वाटेल व त्यांच्या सर्व कृत्यांबद्दल त्यांची सदसद्विवेकबुद्धि त्यांच्या मनांत किंतु उत्पन्न करील; ते कमकुवत होतील व स्वतःच्या कृत्यांविषयीं त्यांना नेहमीं जी एक प्रकारची नापसंती वाटेल त्यामुळें, इतर मानसिक दुर्बलतेपेक्षां, त्यांना अधिक दुर्गुण जडतील. मनुष्य एकदां स्वतःचाच द्वेष करूं लागला ह्मणजे, निकृष्टावस्थेचें प्रवेशद्वार त्याला खुलें झालें ह्मणून समजावें; व हीच गोष्ट राष्ट्रांसही लागू पडते.

आपण आपला तिटकारा न करणें हें आपलें पहिलें कर्तव्य आहे; कारण आपलें पाऊल पुढें पडण्याकरितां आधीं आपल्यावर व नंतर ईश्वराचे ठिकाणीं आपला विश्वास असला पाहिजे. ज्याला स्वतःविषयीं भक्ति नाहीं, त्याची ईश्वरावर कधींही श्रद्धा बसणार नाहीं. ह्मणून भिन्नप्रकारच्या अवस्थांमध्यें कर्तव्य व नीति हीं भिन्न असतात हें ओळखणें, हाच काय तो एक मार्ग आपणांस उरला आहे; ह्मणजे, अरिष्टाचा प्रतिकार करणारा मनुष्य नेहमीं वाईटच कृत्य करीत असतो असें ह्मणतां येणार नाहीं, इतकेंच नव्हे तर, ज्या निरनिराळ्या स्थितींत तो असेल त्यांमध्यें संकटाचा प्रतिकार करणें, हें त्याचें कर्तव्यही होईल.

तुह्मांपैकीं कांहीं जणांनीं 'भगवद्गीता' वाचली असेल, व पाश्चात्य देशांतील तुह्मी पुष्कळ लोक पहिला अध्याय वाचून

चकित झालां असाल. ह्या अध्यायांत अर्जुनाला श्रीकृष्णानें दांभिक व भित्रा ह्मटलें आहे; कारण विरुद्धपक्षांतील लोक अर्जुनाचे आप्तस्वकीय व इष्टमित्र असल्यामुळें, प्रीतीची अत्युच्च कल्पना ह्मणजे प्रतिकार न करणें ही होय असा बहाणा करून, त्यांशीं सामना करण्याचें अगर त्यांचा प्रतिकार करण्याचें तो नाकारतो. सर्व गोष्टींत दोन्ही परमावधी सारख्याच असतात,हा एक मोठा धडा आपणां सर्वांस शिकावयाचा आहे. दृढसंकल्पाची परमावधि व निषेधाची परमावधि हीं दोन्हीं सारखींच असावयाचीं. प्रकाशाचें आंदोलन फारच मंद अगर अत्यंत शीघ्र असलें ह्मणजे तें आपणांस दिसत नाहीं. त्याचप्रमाणें ध्वनीचीही स्थिति आहे; आवाज फार खोल गेला ह्मणजे तो आपणांस ऐकूं येत नाहीं व त्याची पराकाष्ठा झाली ह्मणजेही तो ऐकूं येत नाहीं. प्रतिकार व अप्रतिकार या दोहोंतला भेद अशाच प्रकारचा आहे. एक मनुष्य दुर्बल व आळशी असून त्याचे अंगीं प्रतिकार करण्याचें सामर्थ्य नसतें ह्मणून तो प्रतिकार करीत नाहीं; त्याची इच्छा नसते असें नाहीं. दुसऱ्या मनुष्याची खात्री असते कीं, आपण मनांत आणलें तर अनिवार्य प्रहार करूं; पण तो प्रहार करीत नाहीं इतकेंच नव्हे तर, आपल्या शत्रूंचें अभीष्ट चिंतन करितो. जो मनुष्य दुर्बलतेमुळें प्रतिकार करीत नाहीं, तो पापी होय; व अशाप्रकारें अप्रतिकारापासून फायदा होण्याची त्याला मुळींच आशा नको. आतां, दुसरा मनुष्य प्रतिकार करील तर त्याच्या हातून पाप घडेल. बुद्धानें गादीची आशा न ठेवितां राज्यपदाचा त्याग केला. हाच खरा संन्यास—परित्याग—होय. पण ज्याचे जवळ त्याग कर-

ण्याला कांहीं नाहीं अशा भिकाऱ्यासंबंधानें सर्वसंगपरि-त्यागाचा प्रश्नच उरत नाहीं. ह्मणून अप्रतिकार व परमप्रेम यांविषयीं आपण बोलतों तेव्हां आपल्या मनांतील खरोखर अर्थ काय आहे याबद्दल आपणांला नेहमीं खबरदारी ठेविली पाहिजे. प्रतिकार करण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं आहे किंवा नाहीं हें प्रथमतः आपण नीट समजून घेतलें पाहिजे. मग आपल्या अंगीं सामर्थ्य असून, आपण त्याचा त्याग करून प्रतिकार केला नाहीं, तर तें प्रेमातिशयाचें द्योतक होईल; पण प्रतिकार करण्याचें सामर्थ्य नसूनही, अत्युच्च प्रेमबंधनामुळें आह्मांस तसें प्रोत्साहन मिळतें, असा आपला खोटा समज करून घेण्याचा आपण प्रयत्न करूं लागलों तर आपलें वर्तन अगदींच उलट आहे, असें ह्मणावें लागेल. याप्रमाणेंच, प्रतिपक्षाचें सज्ज झालेलें प्रचंड सैन्य पाहून अर्जुनाची गाळण झाली. 'प्रीती'मुळें त्याला आपल्या राजाविषयींच्या व स्वदेशासंबंधाच्या कर्तव्याचा विसर पडला. ह्मणूनच श्रीकृष्णानें त्याला ह्मटलें कीं, 'तूं दांभिक आहेस. तूं शहाण्याप्रमाणें बोलतोस, पण तुझ्या कृतीवरून तूं भित्रा आहेस हें उघड दिसतें; करितां सज्ज होऊन लढूं लाग.'

अशी 'कर्मयोगा'ची प्रधान कल्पना आहे. अप्रतिकार ही अत्युच्च कल्पना असून, वास्तविक आपल्या ताब्यांत असलेल्या शक्ति व्यक्त करण्याची ती परमसीमा आहे; व संकटाचें निवारण म्हणजे केवळ, ही अत्युच्च शक्ती—अप्रतिकार—प्रकट करण्याच्या मार्गावरील एक पायरी आहे; असें जो समजतो तो 'कर्मयोगी' होय. योग्य मार्गानें

या अत्युच्च मनःसृष्टीप्रत पोंचण्यापूर्वी, संकटाचें निवारण करणें हें मनुष्याचें कर्तव्य होय. त्याला काम केलें पाहिजे; लढलें पाहिजे; व नेटानें तडक प्रहार केले पाहिजेत. असें केलें ह्मणजे प्रतिकारशक्ति प्राप्त होईल व मग मात्र अप्रतिकाराला सद्गुण ह्मणतां येईल.

मला आपल्या देशांत एकदां एक मनुष्य भेटला. हा मनुष्य फार मूर्ख, आळशी व ढ असून, याला कसलेंही ज्ञान करून घेण्याची इच्छा नाहीं आणि याचें जीवित केवळ पशूप्रमाणें आहे, हें मी पूर्वीपासून ओळखून होतों. ह्या इसमानें मला विचारलें कीं, 'मोक्षप्राप्ति कशी होईल व ईश्वराचें ज्ञान करून घेण्यास काय केलें पाहिजे?' 'तुला खोटें बोलतां येतें का?' असा मीं त्यास प्रश्न केला. तो ह्मणाला, 'नाहीं.' मग मीं त्याला सांगितलें, 'असें आहे तर, तूं तें शीक. एकादा पशु अगर लांकडाचा ठोकळा बनून राहण्यापेक्षां खोटें बोलणें पुष्कळ बरें. तूं आळशी आहेस. सर्वकर्मातीत, शांत व गंभीर अशा अत्युच्च स्थितींतला तूं खरोखरच नाहींस. तूं इतका मंद आहेस कीं, तुझ्या हातून एकादें दुष्ट कृत्य देखील घडणार नाहीं.' अर्थात् ही माझ्या सांगण्याची परमावधि झाली; पण मी हें थट्टेंत बोललों. माझ्या मनांतील भाव असा होता कीं, उद्योगांतून सुटून पूर्ण शांततेचा लाभ घेण्याकरितां मनुष्यानें सतत काम केलें पाहिजे.

हरप्रयत्न करून शिथिलता टाळली पाहिजे. प्रतिकार या अर्थानेंच नेहमीं उद्योग हा शब्द वापरतात. मानसिक व शारीरिक सर्व संकटांचें निवारण करा. हें काम तुमच्या हातून पार पडलें, ह्मणजे शांतता प्राप्त होईल. 'कोणाचाही द्वेष करूं नका व कोणत्याही संकटाचें निवारण करूं नका' असें ह्मणणें फार सोपें आहे; पण व्यवहारांत ह्याचा सामान्यतः काय अर्थ होतो, हें आपणांस चांगलें कळतें. समाजाचें लक्ष आपल्याकडे वेधलेलें असलें ह्मणजे आपणांस अप्रतिकाराचा आविर्भाव आणतां येतो; पण अंतरंगीं तो सर्वकाळ शल्याप्रमाणें डंवचीत असतो. अप्रतिकारजन्य शांततेचा आपल्याठायीं पूर्ण अभाव असतो. प्रतिकार करणें हें आपणांस अधिक श्रेयस्कर वाटतें. तुम्हांस द्रव्याची अपेक्षा आहे, पण तुम्हांस असेंही माहित आहे कीं, धनार्थी फार दुष्ट मनुष्य असतो असें सर्व जगाचें मत आहे, तर, कदाचित् द्रव्य मिळविण्याच्या खटपटींत पडण्याचें तुम्हांस धैर्य होणार नाहीं; तरीपण अहोरात्र तुमचें मन द्रव्याकरितां तळमळत राहील. हें प्रत्यक्ष दंभ होय. याचा कांहीं उपयोग नाहीं. जगांतील खटाटोपींत मन घाला व कालांतरानें त्यांतील सर्व सुखदुःखांचा अनुभव आल्यावर त्याचा परित्याग करा; म्हणजे तुह्मांस शांतपणा प्राप्त होईल. ह्मणून, सत्ता व इतर जें कांहीं असेल त्यासंबंधानें तुमची इच्छा तृप्त करून घ्या. ती तृप्त झाल्यावर अशी वेळ येईल कीं, या सर्व गोष्टी क्षुद्र

आहेत असें तुम्हांस वाटूं लागेल; परंतु ही तुमची इच्छा जोंपर्यंत तृप्त झाली नाहीं, ह्या चळवळींतून जोंपर्यंत तुह्मी पार पडलां नाहीं, तोंपर्यंत शांतता, गांभीर्य व आत्मपरित्याग या त्रयीनें युक्त अशा स्थितीप्रत पोंचणें तुह्मांस अशक्य आहे. आज हजारों वर्षे गांभीर्य व आत्मपरित्याग यांविषयींचे हे विचार उपदेशाच्या द्वारें आपल्यापुढें मांडण्यांत येत आहेत. जन्मास आलेल्या प्रत्येक प्राण्यानें लहानपणापासून हे विचार ऐकले असतील, तरीपण आयुष्यांतील त्या शांत अवस्थेप्रत खरोखर पोंचले आहेत, असे लोक या जगांत फारच थोडे सांपडतील. खरोखरच शांत व प्रतिकार करण्याकडे ज्यांची प्रवृत्ति नाहीं, असे वीस लोक तरी मीं आपल्या जन्मांत अर्धे जग फिरूनही पाहिले असतील कीं नाहीं याबद्दल मला शंका आहे.

प्रत्येक मनुष्यानें एक विशिष्ट हेतु मनांत धरून तो तडीस नेण्याचा प्रयत्न करावा. आपणांस कधींही साध्य न होणाऱ्या दुसऱ्याच्या मनांतील विशिष्ट हेतूंची हांव धरण्यापेक्षां आपली प्रगति करून घेण्याचा हा अधिक खात्रीलायक मार्ग आहे. उदाहरणार्थ आपण एक मूल घेऊन त्याला २० मैल चालण्याचें काम एकदम सांगितल्यास, एक तर मूल मरेल, अगर हजारांत एकादें जगलेंच तर तें २० मैलपर्यंत रांगत रांगत जाऊन, अगदीं क्षीण व अर्धमेलें होत्सातें नेमलेल्या ठिकाणीं जाऊन पोंचेल. जगाशीं आपलें वर्तन बहुतकरून अशाच प्रकारचें असतें. कोण-

त्याही समाजांतील सर्व स्त्रीपुरुषांचें मन, आक्रमशक्ति, व काम करण्याचें सामर्थ्य हीं सारखीं नसतात. त्यांचे विशिष्ट हेतू निरनिराळे असले पाहिजेत, व त्यांचा उपहास करण्याचा आपल्याला मुळींच अधिकार नाहीं. प्रत्येक मनुष्यानें आपला विशिष्ट हेतु साधण्याकरितां पराकाष्ठा करावी. तुमच्या विशिष्ट हेतूवरून माझ्याविषयीं व माझ्या विशिष्ट हेतूवरून तुमच्याविषयीं अनुमान करणें बरोबर नाहीं. ॲपल वृक्षाची योग्यता ओक वृक्षाच्या योग्यतेवरून, अगर ओक वृक्षाची योग्यता ॲपल वृक्षाच्या प्रमाणानें ठरविणें योग्य होणार नाहीं. ॲपल वृक्षाचें एक प्रमाण घेऊन त्या अनुरोधानेंच ॲपल वृक्षाची परीक्षा केली पाहिजे. ओक वृक्षालाही त्याचेंच प्रमाण असलें पाहिजे; हीच गोष्ट आपणां सर्वांस लागू आहे.

विविधतेच्या ठिकाणीं ऐक्यभाव असणें, ही सृष्टीची योजना आहे. व्यक्तिशः स्त्रीपुरुषांत कितीही भेद असला, तरी अव्यक्त स्थानीं ऐक्यभाव खात्रीनें आहे. तथापि निरनिराळ्या व्यक्तींत व स्त्रीपुरुषांत नैसर्गिक भेद असणें हा सृष्टिनियम आहे. ह्मणून, त्या सर्वांना एकाच तराजूनें जोखूं नये अगर एकच विशिष्ट हेतु त्यांचेपुढें ठेवूं नये. तसें केल्यापासून कृत्रिम धडपड सुरू होऊन परिणाम असा होतो कीं, मनुष्य आपलाच द्वेष करूं लागतो व खरोखर धार्मिक व सदाचरणी बनण्यास त्याला अडकाठी

येते. प्रत्येक मनुष्य आपल्या अत्युच्च कल्पनेप्रमाणें आयुष्य घालविण्याकरितां झगडत असतो. ह्या त्याच्या कृत्यास उत्तेजन देणें व त्याचवेळीं ही अत्युच्च कल्पना होईल तितकी सत्याच्या निकट नेण्याचा प्रयत्न करणें हें आपलें कर्तव्य आहे.

हिंदूंच्या नीतिशास्त्रांत हें तत्व फार प्राचीन काळापासून मान्य झालेलें आहे, असें आपणांस दिसून येतें. त्यांच्या धर्मग्रंथांत व नीतिशास्त्रावरील पुस्तकांत भिन्न वर्गांचे लोकांकरितां—गृहस्थ, संन्यासी व विद्यार्थी यांकरितां—निरनिराळे नियम लिहून ठेविले आहेत.

कर्माचरण करणाऱ्या प्रत्येक व्यक्तीच्या आयुष्यक्रमांत हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें मनुष्यजातीच्या सर्वसाधारण कर्तव्यांशिवाय इतर विशिष्ट कर्तव्यें असतात. हिंदू मनुष्याच्या आयुष्यक्रमास 'विद्यार्थी' पणापासून सुरवात होते. नंतर तो लग्न करून 'गृहस्थ' बनतो. म्हातारा झाल्यावर तो निवृत्तिमार्गाचें अवलंबन करतो व शेवटीं जगाचा परित्याग करून तो 'संन्यासी' बनतो. आयुष्याच्या ह्या प्रत्येक अवस्थेला कित्येक कर्तव्यें लावून दिलेलीं आहेत. हीं कर्तव्यें त्या त्या अवस्थेच्या स्वरूपावरून निश्चित झालेलीं आहेत. ह्यांपैकीं कोणतीही एक अवस्था दुसरीपेक्षां सरस नाहीं. आपलें आयुष्य धार्मिक कृत्यांस वाहिलेल्या अविवाहित मनुष्याच्या आयुष्याइतकेंच,

विवाहित मनुष्याचें आयुष्य महत्वाचें असतें. सिंहासनावरील राजा रस्त्यांतील झाडूवाल्याइतकाच थोर व वैभवशाली आहे. त्याला सिंहासनावरून दूर करून झाडूवाल्याचें काम द्या म्हणजे त्याची काय स्थिति होते ती पहा. त्याप्रमाणें झाडूवाल्याचे हातीं राज्यसूत्रें दिलीं म्हणजे त्याची कशी त्रेधा उडते ती पहा. संसारांत राहणारा मनुष्य संसाराचा त्याग करणाऱ्या मनुष्यापेक्षां अधिक मोठा आहे, असें म्हणणें व्यर्थ आहे. जगाचा त्याग करून स्वतंत्रपणें व सुखानें कालक्रमणा करण्यापेक्षां जगांत राहून ईश्वराची आराधना करणें फार कठिण आहे. हिंदुस्थानांत संसारांतील विविध अवस्थांपैकीं आतां दोनच अवस्था उरल्या आहेत; एक गृहस्थाची व त्यानंतरची उपदेशकाची. गृहस्थ लग्न करून नागरिकांप्रमाणें आपलीं कर्तव्यें करतो. निवृत्तिमार्गाचें अवलंबन करणाऱ्या मनुष्याचीं कर्तव्यें म्हटलीं म्हणजे, आपली कर्तृत्वशक्ति धर्मास सर्वस्वी समर्पण करणें, उपदेश व परमेश्वराची भक्ति करणें हीं होत. यावरून तुम्हांस कळून येईल कीं, कोणाचा आयुष्यक्रम अधिक दुष्कर आहे. ह्या विषयाचा ज्यांत विचार केला आहे, अशा 'महा—निर्वाणतंत्र' नांवाच्या पुस्तकांतील कांहीं सुंदर वेंचे मी आतां तुम्हांस वाचून दाखवितों. त्यांवरून, गृहस्थ या नात्यानें मनुष्यास आपलीं कर्तव्यें पूर्णपणें बजावितां येणें किती कठिण आहे, हें तुम्हांस कळून येईल:—

"गृहस्थाची ईश्वरावर भक्ति असावी. ईश्वराचें ज्ञान करून घेणें, ही त्याच्या आयुष्यक्रमाची अवसानभूमि* असावी. तथापि त्यानें सतत काम करून आपलीं कर्तव्यें बजाविलीं पाहिजेत. तो जें जें करील तें त्यानें ईश्वरचरणीं अर्पण केलें पाहिजे."

फलाची आशा न धरितां काम करणें, कोणा मनुष्यास मदत केल्याबद्दल त्यानें कृतज्ञता दाखवावी असें कधींही मनांत न आणणें, एकादें चांगलें काम केल्यापासून आपलें नांव वाढेल किंवा कीर्ति होईल अगर कांहींच फळ मिळणार नाहीं, इकडे मुळींच लक्ष न देणें, ह्या गोष्टी जगामध्यें आपल्या हातून घडणें फार दुर्घट आहे. जग स्तुति करूं लागलें म्हणजे अतिशय भित्रा मनुष्यही शूर बनतो. समाजानें पाठ थोपटली म्हणजे एकादा मूर्ख मनुष्यही शौर्याचीं कामें करूं लागतो. परंतु आपल्या स्वजातीयांच्या शाबासकीबद्दल आर्जव अगर पर्वा न करितां सतत सत्कार्यें करणें म्हणजे मनुष्याच्या स्वार्थत्यागाची सीमाच होय. गृहस्थाचें मोठें कर्तव्य म्हटलें म्हणजे उपजीविकेकरितां द्रव्यार्जन करणें हें होय; पण खोटें बोलून, दुसऱ्यास फसवून, अगर चोरी करून पैसा मिळवावयाचा नाहीं, हें त्यानें लक्षांत ठेविलें पाहिजे, व आपलें आयुष्य अनाथ व गरजू लोकांच्या उपयोगी पडण्याकरितां व ईश्वराचे सेवेंत घालविण्याकरितां आहे, हें त्यानें विसरतां कामा नये.

* पराकाष्ठा, परमसीमा (goal.)

"आईबाप दृश्यरूपानें ईश्वराचे ठिकाणीं आहेत हें लक्षांत ठेवून गृहस्थानें त्यांस नेहमीं व सर्वप्रकारें संतुष्ट ठेविलें पाहिजे. आईबाप संतुष्ट असले ह्मणजे ईश्वरालाही संतोष होईल. जें मूल आपल्या आईबापांस कठोर शब्द बोलत नाहीं, तें खरोखरच चांगलें मूल म्हटलें पाहिजे."

"आईबापांसमक्ष थट्टा करूं नये, अस्वस्थ असूं नये, व रागावूं नये. त्यांच्यासमक्ष नमून वागावें, उभें रहावें, व ते 'बैस' म्हणतील तोंपर्यंत बसूं नये."

"आईबाप, मुलें, गृहिणी व अनाथ लोक यांस अन्नवस्त्र पुरविल्याशिवाय जो गृहस्थ खाणें, पिणें, व कपडेलत्ते यांत चैन करतो, तो पापी होय. या देहाला आईबाप कारण आहेत; ह्मणून, त्यांना सुखी ठेवण्याकरितां हजारों संकटें भोगिलीं पाहिजेत."

"गृहिणीसंबंधानेंही अशाच प्रकारचें कर्तव्य आहे. कोणीही मनुष्यानें आपल्या पत्नीवर शब्दप्रहार करूं नयेत. तिला आईप्रमाणेंच पाळलें पाहिजे. तो मोठ्या संकटांत व अडचणींत असला, तरी, त्यानें गृहिणीवर रागावूं नये."

"जो मनुष्य स्वस्त्रीवांचून इतर स्त्रीविषयीं मनांत विचार आणतो, त्यानें तिला अल्पस्वल्प मानसिक स्पर्श केला तर तो घोर नरकांत जाईल, एकांतांत देखील परस्त्रीला अगर तिच्या वस्त्राला स्पर्श करूं नये. परस्त्रीच्या पश्चातही तिच्या वस्त्राला स्पर्श करतां कामा नये."

"स्त्रियांसमक्ष त्यानें अयोग्य भाषण करूं नये. 'मी अमुक केलें, तमुक केलें,' असें म्हणून आपली बढाई सांगूं नये."

"गृहस्थानें द्रव्य, वस्त्र, प्रेम, विश्वास व अमृतमय शब्द यांहींकरून आपल्या गृहिणीस संतुष्ट ठेविलें पाहिजे. तिला त्रास होईल असें कांहीं करूं नये. ज्या मनुष्यास आपल्या साध्वी स्त्रीचें प्रेम संपादन करतां आलें त्यानें आपलें धर्मसंबंधीं कर्तव्य बजावलें असें ह्मणण्यास मुळींच प्रत्यवाय नाहीं. त्या मनुष्याचे अंगीं सर्व सद्गुण असावयाचेच."

मुलांसंबंधीं कर्तव्यें खालीं लिहिल्याप्रमाणें आहेत:—

"मुलगा चार वर्षांचा होईपर्यंत त्याची काळजी घ्यावी. नंतर त्यास शिक्षण द्यावें. तो वीस वर्षांचा झाला म्हणजे बापानें त्यास कहान मुलाप्रमाणें मानूं नये; कारण ह्या वयाला तो स्वतः गृहस्थ बनून बापाच्या बरोबरीचा होतो. अशाच रीतीनें मुलीला वाढवून, तिच्या शिक्षणाची फार काळजी घेतली पाहिजे; आणि तिचें लग्न झाल्यावर बापानें तिला द्रव्य व अलंकार द्यावे."

"यानंतर मनुष्याचें कर्तव्य, आपले बंधु, भगिनी व तीं गरीब असल्यास त्यांचीं अपत्यें आणि आपले इतर आप्तस्वकीय, इष्टमित्र व नोकरचाकर यांसंबंधीं होय. तदनंतर त्याच गांवचे लोक, अनाथजन व मदत मागण्याकरितां येणारा कोणीही इसम यांसंबंधाचें कर्तव्य राहतें.

चांगली अनुकूलता असून, जो गृहस्थ आपल्या आप्तांना व गरिबांना द्रव्यद्वारें मदत करीत नाहीं, तो पशुच होय. त्याला मनुष्यप्राणी म्हणतां येणार नाहीं."

"अन्न, वस्त्र, व आत्मप्रीति यांसंबंधांत फाजील काळजी घेणें, त्याचप्रमाणें शरीराला शोभा आणण्याविषयीं व भांग पाडण्याविषयीं अत्यंत जपणें, ह्या गोष्टी त्याज्य आहेत. गृहस्थाचें मन शुद्ध असून शरीर स्वच्छ असावें. त्यानें काम करण्याविषयीं नेहमीं उद्युक्त असून सदासर्वकाळ उद्योग करीत असावें."

"गृहस्थ ह्मटला ह्मणजे आपल्या शत्रूंना शूर योद्ध्याप्रमाणें वाटला पाहिजे. शत्रूंचें निवारण करणें, हें त्याचें कर्तव्य आहे. त्यानें कोंपऱ्यांत अश्रू ढाळीत बसूं नये व अप्रतिकारासंबंधानें कांहीं तरी बरळूं नये. तो आपल्या शत्रूंशीं शूर पुरुषाप्रमाणें न लढला तर, त्यानें आपलें कर्तव्य बजावलें नाहीं, असें ह्मटलें पाहिजे. त्यानें आपल्या आप्तांशीं व मित्रांशीं कोंकराप्रमाणें सौम्यपणें वागलें पाहिजे."

"दुष्ट मनुष्याविषयीं पूज्यबुद्धि न बाळगणें, हें गृहस्थाचें कर्तव्य आहे. कारण, त्यानें जगांतील दुष्ट लोकांस पूज्य मानणें ह्मणजे दुष्टपणास उत्तेजन देण्यासारखें आहे. सन्माननीय अशा चांगल्या लोकांचा अनादर करणें, ही मोठी चूक आहे. त्यानें मैत्री करण्याविषयीं वेगानें प्रवृत्त होऊं

नये. प्रत्येक ठिकाणीं मैत्री करूं नये. ज्यांच्याशीं त्याला मैत्री करावयाची आहे, त्यांचीं कृत्यें व लोकांशीं त्यांचा व्यवहार या गोष्टींवर नीट नजर ठेवावी, व त्यांवर विचार करून मैत्री संपादन करावी."

"त्यानें तीन गोष्टींविषयीं बोलूं नये. त्यानें आपली कीर्ति, नांव व सामर्थ्य यांबद्दल चार लोकांत बढाई करूं नये. संपत्ति व खाजगत गोष्टी यांसंबंधीं त्यानें ग्रही उच्चारूं नये."

"त्याच्या हातून एकादी चूक झाली असेल, व ज्या-कामांत हटकून अपयश येणार असें एकादें लहान मोठें काम त्यानें हातीं घेतलें असेल, तर, त्याबद्दल त्यानें कांहीं बोलूं नये व त्याचा गवगवा करूं नये. आपल्या चुका ज्या-च्या त्याच्याजवळ सांगण्यांत काय अर्थ आहे? कारण, झालेल्या चुका कांहीं परत येत नाहींत. कृतकर्मांचे परि-णाम त्याला भोगले पाहिजेत. आपल्या चुका सुधारण्याचा प्रयत्न करणें हें गृहस्थाचें कर्तव्य आहे. सशक्त व सत्ताधी-श यांच्याबद्दलच जग फार कळकळ दाखवितें."

"मनुष्यानें मी गरीब आहें, अगर श्रीमंत आहें असें ह्मणूं नये. त्यानें आपल्या संपत्तीचा गर्व वाहूं नये. त्यानें आपली गोष्ट आपल्या मनांतच ठेवावी. हें त्याचें धर्मसंबं-धीं कर्तव्य आहे. हें केवळ व्यवहारांतील शहाणपण नव्हे; तो जर ह्याप्रमाणें वागणार नाहीं, तर लोक त्याला नीतिभ्रष्ट समजतील."

गृहस्थ हा सर्व समाजमंदिराचा पाया—आधारस्तंभ—आहे. तो मुख्य कमावता पुरुष होय. गरीब, अपंग, मुलें व काम न करणाऱ्या स्त्रिया या सर्वांचें जीवित गृहस्थावर अवलंबून असतें; करितां त्याचीं कित्येक कर्तव्यें असलीं पाहिजेत. हीं कर्तव्यें करण्यास आपण समर्थ आहों व आपल्या विशिष्ट हेतूप्रमाणें आपण आपलीं कर्तव्यें बजावीत आहों, असें या कर्तव्यांवरून त्यास वाटलें पाहिजे. म्हणून, त्याच्या हातून एकादें काम बरोबर झालें नाहीं, अगर त्याजकडून एकादी चूक घडली, तरी, त्याबद्दल त्यानें चार लोकांत बभ्रा करूं नये; व एकादें साहसाचें काम त्यानें पत्करलें असून त्यांत अपयश येईल, अशी त्याची खात्री असेल, तर, त्याबद्दल त्यानें एक शब्दही उच्चारूं नये. अशा रीतीनें आपण होऊनच आपल्या चुका उजेडांत आणणें, हें अनाहूत आहे, इतकेंच नव्हे, तर, त्यापासून मनुष्य कमजोर होऊन आयुष्यांतील आपलीं वाजवी कर्तव्यें बजावण्यासही नालायक ठरतो. असो. मनुष्यानें प्रथमतः ज्ञान व नंतर धन मिळविण्याबद्दल आपली पराकाष्ठा केली पाहिजे. हें त्याचें कर्तव्य आहे, व तें तो न करील तर कुचकामाचा ठरेल. गृहस्थ असून संपत्ति मिळविण्याकरितां जो झटत नाहीं, तो अनीतिमान् होय. तो आळशी असून आळसांतच त्यास समाधान वाटत असलें, तर, तो नीतिभ्रष्ट म्हटला पाहिजे; कारण, त्याजवर शेंकडों लोकांचें पोट अवलंबून आहे. त्यानें द्रव्य संपादन केलें तर, इतर शेंकडों लोकांचें त्यामुळें संरक्षण होईल.

ह्या शहरीं संपत्ति मिळवून श्रीमान् झालेले शेंकडों लोक नसते, तर, ही सर्व सुधारणा, हीं धर्मगृहें व हे मोठमोठे वाडे आज दिसले असते काय ?

अशा दृष्टीनें संपत्ति मिळविणें वाईट नाहीं; कारण हें द्रव्य वांटून द्यावयाचें असतें. गृहस्थ हा समाजाचा व संसाराचा केंद्र आहे. संपत्ति मिळवून तिचा उदारबुद्धीनें व्यय करणें, हें त्यास मोठें भूषण आहे; कारण, जो गृहस्थ 'सन्मार्गानें' व 'सत्कार्या'करितां श्रीमंत होण्याची खटपट करितो, तो, परमेश्वराची प्रार्थना करणारा संन्यासी एकाद्या खोपटांत बसून मोक्षपदास पोंचण्याकरितां जें करितो तेंच व्यावहारिक दृष्टीनें करीत असतो. ह्या दोघांची ईश्वरावर व ईश्वरी म्हणून जें जें आहे, त्या सर्वांवर दृढभक्ति असते. ह्या दृढ भक्तीच्यायोगानें त्यांचे मनांत प्रेरणा होऊन, आत्मपरित्याग व स्वार्थत्याग ह्याच सद्गुणांचीं भिन्न स्वरूपें त्यांचेठायीं दृष्टीस पडतात.

"त्यानें (गृहस्थानें) सर्व प्रकारें चांगलें नांव मिळविण्याकरितां झटावें. त्यानें जुगार खेळूं नये, दुष्टांचे संगतीनें असूं नये, खोटें बोलूं नये, व इतरांस त्रास होईल अशा रीतीनें वागूं नये."

पुष्कळ वेळां असें होतें कीं, ज्या गोष्टी साध्य होण्यास साधनें नसतात, त्यांत आपण पडतों व परिणामीं आपले हेतू तडीस नेण्याकरितां आपण इतरांस फसवितों. दुसरें असें कीं, प्रत्येक गोष्टींत 'वेळ अगर प्रसंग' ही बाब लक्षांत घेतली पाहिजे; एका प्रसंगीं ज्या गोष्टींत अपयश येईल, त्याच गोष्टींत अन्य प्रसंगीं यश येण्याचा संभव आहे.

"गृहस्थानें खरें बोलावें; जें लोकांस रुचेल व ज्यापासून त्यांचें कल्याण होईल, असें भाषण सौम्यपणानें करावें; आपल्या कृत्यांबद्दल त्यानें फुशारकी मारूं नये, व इतरांच्या कामांबद्दल कांहीं बोलूं नये."

"जलाशयें बांधून, रस्त्याचे बाजूंस झाडें लावून, मनुष्यें व इतर प्राणी यांजकरितां धर्मसंस्था स्थापून, आणि रस्ते व पूल यांसारखीं लोकोपयोगी कामें करून, गृहस्थ हा अत्यंत मोठ्या योग्याच्या पदाला पोंचतो."

उद्योगशीलता हें गृहस्थाचें कर्तव्य आहे, हा 'कर्मयोगा' च्या सिद्धांताचा एक भाग झाला. यापुढें आणखी एक पायरी आहे; त्याठिकाणीं असें सांगितलें आहे कीं, "योग्याला समाधीच्या योगानें जें पद प्राप्त होतें, तेंच पद स्वदेश व स्वधर्म यांसाठीं लढून, आपला देह धारातीर्थी ठेवणाऱ्या गृहस्थाला मिळतें." यावरून असें सिद्ध होतें कीं, एकाचें जें कर्तव्य तेंच दुसऱ्याचें कर्तव्य नव्हे; शिवाय अमुक कर्तव्य हलकें व अमुक भारी असेंही नाहीं. ज्या त्या कर्तव्यास आपापलें स्थल व लायकी हीं आहेत; म्हणून आपल्या स्थितीस अनुलक्षून आपण आपलीं कर्तव्यें करावीं.

ह्या सर्व गोष्टींपासून एक सिद्धांत निघतो; तो हा कीं, आपण सर्व प्रकारची दुर्बलता झुगारून द्यावी. तत्वज्ञान, धर्म, अगर व्यवसाय यांपैकीं कोणत्याही गोष्टींत, आपल्या सर्व उपदेशांतील हा विशिष्ट सिद्धांत मला फार आवडतो. कशाचीही भीति बाळगूं नका. 'निर्भयता' ह्या शब्दाचें वेदांत वारंवार उच्चारण केलें आहे. भीति ही दुर्बलतेची खूण आहे. लोकांच्या नाक मुरडण्याकडे अगर उपहासा-

कडे लक्ष न देतां मनुष्यानें नेहमीं आपलें कर्तव्य केलें पाहिजे.

जगाच्याबाहेर राहून जो मनुष्य परमेश्वराची आराधना करितो त्यानें असें समजूं नये कीं, जगांत राहून जे जगाच्या कल्याणार्थ झटतात, ते ईश्वराची उपासना करीत नाहींत. त्याचप्रमाणें जे कुटुंबसौख्याकरितां जगांत राहतात, त्यांनीं असें मानूं नये कीं, जग सोडून ज्यांनीं संन्यास घेतला ते अगदीं भटके आहेत. जो तो आपल्या ठिकाणीं मोठा आहे. हा विचार मनांत ठसावा म्हणून मी दृष्टांतरूपानें एक गोष्ट सांगतों:—

एक राजा होता. तो जे जे संन्यासी त्याचे देशांत येत त्यांना विचारी, 'सर्वसंगपरित्याग करणारा संन्यासी मोठा, कीं जगांत राहून आपलीं कर्तव्यें करणारा गृहस्थ मोठा?' पुष्कळ सुज्ञ लोकांनीं या प्रश्नाचा उलगडा करण्याचा प्रयत्न केला. कित्येक म्हणाले संन्यासी मोठा. त्यावर राजा म्हणाला, ही गोष्ट सिद्ध करून द्या. त्यांना तसें करतां येईना, तेव्हां राजानें त्यांस लग्न करून गृहस्थाश्रम स्वीकारण्याचा हुकूम केला. नंतर इतर लोक म्हणाले कीं, 'आपलीं कर्तव्यें करणारा गृहस्थ मोठा.' ह्यांनाही राजानें हें सिद्ध करून देण्यास सांगितलें; पण त्यांजकडून तें होईना. तेव्हां त्यांनाही गृहस्थाप्रमाणें राहण्यास राजानें फर्माविलें.

शेवटीं, एक तरुण संन्यासी तेथें आला. त्यालाही राजानें तसाच प्रश्न केला. तेव्हां संन्यासी म्हणाला, 'हे राजा, जो तो आपापल्या ठिकाणीं सारखाच मोठा आहे.' राजानें हें सिद्ध करून देण्यास सांगितलें. नंतर संन्यासी

म्हणाला, 'मी हें सिद्ध करून देईन, पण कांहीं दिवस तुम्ही मजबरोबर राहून माझ्याप्रमाणें दिनचर्या ठेविली पाहिजे.' ही गोष्ट राजानें मान्य केली, व तो आपलें राज्य सोडून संन्याशासहवर्तमान निघाला. वाटेंत त्यांस पुष्कळ देश लागले. शेवटीं ते एका राज्यांत येऊन दाखल झाले. ह्या देशाचे राजधानींत एक मोठा उत्सव सुरू होता. राजा व संन्यासी या दोघांनीं वाद्यादिकांचे आवाज ऐकले, व भालदार, चोपदार ललकारतांना त्यांनीं पाहिले. भपकेदार पोषाक केलेल्या लोकांच्या झुंडी रस्त्यावर दिसत होत्या, व जिकडे तिकडे मोठ्यानें द्वाही फिरत होती. हा काय प्रकार आहे, हें पाहण्याकरितां राजा व संन्यासी त्या ठिकाणीं उभे राहिले. इतक्यांत, 'या देशच्या राजाची मुलगी तिच्या-समोर सभास्थानीं विराजमान झालेल्या पुरुषांतून वर निवडणार आहे' अशी मोठ्यानें दवंडी पिटविण्यांत आली.

राजकन्यांनीं स्वयंवर करण्याची ही चाल हिंदुस्थानांत प्राचीन काळीं होती. आपल्याला वर कसा असावा, याविषयीं प्रत्येक राजकन्येचीं स्वाभाविकपणें कांहीं ठाममतें असत. कित्येकांना सुंदर, तर, कित्येकांस विद्वान् व कांहींना श्रीमान् पति आवडे. राजकन्येला सिंहासनावर बसवून मोठ्या थाटामाटानें तिला एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं नेत; व अमुक अमुक राजकन्येचें स्वयंवर होणार आहे, असें चोपदार ललकारून सांगत. जवळचे सर्व राजपुत्र शौर्यदर्शक उत्तमोत्तम पोषाक करून राजकन्येसमोर सभेंत जाऊन बसत. कित्येक वेळां तर ह्या राजबिंड्यांबरोबरचे

चोपदार त्यांच्या अंगचे विशेष गुण वर्णन करून ज्याचीं त्याचीं राजकन्येस वरण्याचीं कारणें सांगत. नंतर राजकन्येला एकेका राजपुत्राकडे घेऊन जात. ती प्रत्येकाला नीट पाही व त्याचें ह्मणणें ऐकून घेई; पण त्यापैकीं तिला कांहींच रुचलें नाहीं, तर, ती आपल्या परिचारकांना 'पुढें चला' असें सांगे व एकदां ज्याचा त्याग करी त्याजकडे पुन्हां ढुंकूनही पहात नसे. जो तिला पसंत पडे, त्याला मात्र ती पुष्पहार घाली व तो तिचा पति होई.

असो. आपला राजा व संन्यासी हे ज्या ठिकाणीं आले तेथील राजकन्येचा, वर सांगितल्याप्रमाणें मनोरम स्वयंवरविधि सुरू होता. तिचें लावण्य जगांतील सर्व स्त्रियांस लाजविणारें असून तिच्या पित्याच्या पश्चात् तिचा पति राज्याचा मालक होणार होता. ह्या राजकन्येच्या मनांतून अत्यंत सुंदर पुरुषास वरण्याचें होतें; पण पुष्कळ वेळपर्यंत तिच्या मनाप्रमाणें तिला एकही वर आढळून येईना. कित्येक वेळां स्वयंवराच्या सभा झाल्या, तरी तिच्या पसंतीस कोणी उतरेना. ह्या वेळची सभा मात्र पूर्वीच्या सर्व सभांस मागें टाकणारी होती. पूर्वीपेक्षां अधिक लोक ह्या प्रसंगीं सभास्थानीं विराजमान झाले होते, व एकंदर देखावा फार भपकेदार होता. राजकन्या सिंहासनारूढ झाल्यावर परिचारकांनीं तिला एकेका राजपुत्राकडे नेलें. पण तिच्या मनास कोणीच येईना; व पूर्वीप्रमाणेंच आज सर्व प्रकार घडून येणार, असे निराशेचे उद्गार जो तो काढूं लागला! इतक्यांत एक तरुण पुरुष, हा काय प्रकार आहे हें पाहण्याकरितां, सभामंडपाच्या कोपऱ्यांत जाऊन उभा राहिला.

म्हणाला, 'मी हें सिद्ध करून देईन, पण कांहीं दिवस तुम्ही मजबरोबर राहून माझ्याप्रमाणें दिनचर्या ठेविली पाहिजे.' ही गोष्ट राजानें मान्य केली, व तो आपलें राज्य सोडून संन्याशासहवर्तमान निघाला. वाटेंत त्यांस पुष्कळ देश लागले. शेवटीं ते एका राज्यांत येऊन दाखल झाले. ह्या देशाचे राजधानींत एक मोठा उत्सव सुरू होता. राजा व संन्यासी या दोघांनीं वाद्यादिकांचे आवाज ऐकले, व भालदार, चोपदार ललकारतांना त्यांनीं पाहिले. भपकेदार पोषाक केलेल्या लोकांच्या झुंडी रस्त्यावर दिसत होत्या, व जिकडे तिकडे मोठ्यानें द्वाही फिरत होती. हा काय प्रकार आहे, हें पाहण्याकरितां राजा व संन्यासी त्या ठिकाणीं उभे राहिले. इतक्यांत, 'या देशच्या राजाची मुलगी तिच्या-समोर सभास्थानीं विराजमान झालेल्या पुरुषांतून वर निवडणार आहे' अशी मोठ्यानें दवंडी पिटविण्यांत आली.

राजकन्यांनीं स्वयंवर करण्याची ही चाल हिंदुस्थानांत प्राचीन काळीं होती. आपल्याला वर कसा असावा, याविषयीं प्रत्येक राजकन्येचीं स्वाभाविकपणें कांहीं ठाममतें असत. कित्येकांना सुंदर, तर, कित्येकांस विद्वान् व कांहींना श्रीमान् पति आवडे. राजकन्येला सिंहासनावर बसवून मोठ्या थाटामाटानें तिला एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं नेत; व अमुक अमुक राजकन्येचें स्वयंवर होणार आहे, असें चोपदार ललकारून सांगत. जवळचे सर्व राजपुत्र शौर्य-दर्शक उत्तमोत्तम पोषाक करून राजकन्येसमोर सभेंत जाऊन बसत. कित्येक वेळां तर ह्या राजबिंड्यांबरोबरचे

चोपदार त्यांच्या अंगचे विशेष गुण वर्णन करून ज्याचीं त्याचीं राजकन्येस वरण्याचीं कारणें सांगत. नंतर राजकन्येला एकेका राजपुत्राकडे घेऊन जात. ती प्रत्येकाला नीट पाही व त्याचें म्हणणें ऐकून घेई; पण त्यापैकीं तिला कांहींच रुचलें नाहीं, तर, ती आपल्या परिचारकांना 'पुढें चला' असें सांगे व एकदां ज्याचा त्याग करी त्याजकडे पुन्हां ढुंकूनही पहात नसे. जो तिला पसंत पडे, त्याला मात्र ती पुष्पहार घाली व तो तिचा पति होई.

असो. आपला राजा व संन्यासी हे ज्या ठिकाणीं आले तेथील राजकन्येचा, वर सांगितल्याप्रमाणें मनोरम स्वयंवरविधि सुरू होता. तिचें लावण्य जगांतील सर्व स्त्रियांस लाजविणारें असून तिच्या पित्याच्या पश्चात् तिचा पति राज्याचा मालक होणार होता. ह्या राजकन्येच्या मनांतून अत्यंत सुंदर पुरुषास वरण्याचें होतें; पण पुष्कळ वेळपर्यंत तिच्या मनाप्रमाणें तिला एकही वर आढळून येईना. कित्येक वेळां स्वयंवराच्या सभा झाल्या, तरी तिच्या पसंतीस कोणी उतरेना. ह्या वेळची सभा मात्र पूर्वीच्या सर्व सभांस मागें टाकणारी होती. पूर्वीपेक्षां अधिक लोक ह्या प्रसंगीं सभास्थानीं विराजमान झाले होते, व एकंदर देखावा फार भपकेदार होता. राजकन्या सिंहासनारूढ झाल्यावर परिचारकांनीं तिला एकेका राजपुत्राकडे नेलें. पण तिच्या मनास कोणीच येईना; व पूर्वीप्रमाणेंच आज सर्व प्रकार घडून येणार, असे निराशेचे उद्गार जो तो काढूं लागला! इतक्यांत एक तरुण पुरुष, हा काय प्रकार आहे हें पाहण्याकरितां, सभामंडपाच्या कोंपऱ्यांत जाऊन उभा राहिला.

हा संन्यासी होता व याच्या सौंदर्यकांतीवरून, पृथ्वीवर हा सूर्यच अवतरला आहे कीं काय असें वाटत होतें! सिंहासनाधिष्ठित राजकन्या त्याजजवळ आली व त्या मदनमूर्तीस पाहतांच तिनें त्याचे गळ्यांत माळ घातली! संन्याशानें ती माळ फेंकून दिली व तो म्हणाला, "हा काय मूर्खपणा! मी संन्यासी आहें, लग्नाशीं मला काय कर्तव्य आहे?" हें ऐकून त्या देशच्या राजाला वाटलें कीं, हा मनुष्य गरीब असावा व म्हणूनच राजकन्येस वरण्याचा त्याचा धीर होत नाहीं; करितां त्यानें संन्याशास म्हटलें, 'माझ्या मुलीबरोबर तुम्हांस अर्धे राज्य मिळेल, व मी मेल्यावर तुम्ही सगळ्या राज्याचे मालक व्हाल!' राजानें असें म्हणून पुन्हां संन्याशाचे गळ्यांत माळ घातली. संन्याशानें ती पुन्हां टाकून दिली व 'मला लग्न कर्तव्य नसून, हा काय वेडेपणा मांडला आहे' असें म्हणून तो तडक चालता झाला.

राजकन्येचें ह्या तरुण पुरुषावर फारच प्रेम जडलें. 'वरीन तर ह्यालाच वरीन, नाहीं तर मी आपला देह ठेवीन', असें म्हणून ती त्याला परत आणण्याच्या हेतूनें त्याच्या शोधार्थ निघाली. नंतर ज्या संन्याशानें आपल्या राजास तेथें आणलें होतें, तो राजास म्हणाला, 'महाराज, आपणही या दंपत्याच्या मागोमाग जाऊं.' याप्रमाणें ते त्यांजपासून बरेच लांब राहून त्यांच्या मागोमाग जाऊं लागले. ज्या तरुण संन्याशानें राजकन्येशीं लग्न करण्याचें नाकारिलें होतें, तो कित्येक मैलपर्यंत सारखा चालत होता. शेवटीं तो एका रानांत शिरला. राजकन्या व दुसरे दोघेही

त्याच्या मागोमाग त्याच दिशेनें गेले. ह्या तरुण संन्याशास अरण्यांतील थगदीं अवघड मार्गही उत्तम प्रकारें अवगत असल्यामुळें तो चटूदिशीं एका मार्गाकडे वळून अकस्मात् नाहींसा झाला! राजकन्येनें त्याचा पुष्कळ शोध केला, पण कांहींच पत्ता लागेना! शेवटीं ती एका झाडाखालीं बसून रडूं लागली; कारण, अरण्याच्या बाहेर पडण्याचा मार्ग तिला माहित नव्हता. नंतर आपला राजा व संन्याशी हे तिजजवळ जाऊन म्हणाले, 'मुली, रडूं नको. आतां काळोख फार पडला आहे, तेव्हां रात्रभर आपण ह्या जवळच्या मोठ्या झाडाखालीं मुक्काम करूं. पहाट होतांच आम्ही तुला ह्या अरण्यांतून बाहेर पडण्याची वाट दाखवूं.'

ह्या झाडावर एका लहानशा पक्ष्याचें घरटें होतें. त्यांत तो, आपली मादी व तीन पिलें यांसह राहत असे. खालीं बसलेल्या ह्या तिघांजणांस पाहून तो आपल्या मादीस ह्मणाला, 'प्रिये! काय करावें? आपल्याकडे पाहुणे आले आहेत; व हे थंडीचे दिवस आहेत, पण आपल्यापाशीं विस्तव नाहीं.' असें ह्मणून तो उडत उडत एके ठिकाणीं गेला व तेथून एक जळतें लांकूड त्यानें आपल्या चोंचींत धरून आणून पाहुण्यांपुढें टाकिलें. त्यांनीं त्याच्या साह्यानें धगधगित विस्तव तयार केला. पण एवढ्यानें त्या चिमुकल्या पक्ष्याचें समाधान झालें नाहीं. तो आपल्या गृहिणीस पुन्हां ह्मणाला 'लाडके! आतां काय बरें करावें? हे तिघेजण फार भुकेले आहेत, पण आपणांपाशीं त्यांना खावयास देण्याकरितां कांहीं नाहीं. आपण गृहस्थ आहों; तेव्हां

अभ्यागताला अन्न देणें आपलें कर्तव्य आहे. मला या बाबतींत शक्य तो प्रयत्न केला पाहिजे. मी आपलें शरीर त्यांना देतों.' असें म्हणून त्यानें विस्तवांत उडी घालून आपल्या प्राणाची आहुति दिली. पाहुण्यांनीं त्याला झाडावरून पडतांना पाहून त्याचा जीव वांचविण्याचा प्रयत्न केला, पण तो त्यांच्या हातीं लागला नाहीं!

आपल्या पतीची अशी अवस्था पाहून मादी म्हणाली. 'पाहुणे तीन आहेत; त्यांना एक पक्षी पुरणार नाहीं, आपल्या पतीचे प्रयत्न निष्फळ न होऊं देणें हें माझें गृहिणी या नात्यानें कर्तव्य आहे. म्हणून मींही आपलें शरीर त्यांना देतें.' असें बोलून तिनें विस्तवांत उडी घातली व ती जळून मेली.

त्या तिघां पिलांनीं हा सर्व प्रकार पाहिला, तेव्हां पाहुण्यांना अजूनही पुरेसें अन्न मिळालें नाहीं असें त्यांस दिसून आलें. ते म्हणाले, 'आमच्या आईबापांनीं शक्य होतें तें सर्व केलें, तरी पाहुण्यांस अद्याप पुरेसें अन्न मिळालें नाहीं. आपल्या मातापितरांचें अनुकरण करणें हें आपलें कर्तव्य आहे. म्हणून आपणहीं आपलीं शरीरें अग्निदेवतेस अर्पण करूं.' इतकें बोलून त्यांनींही 'अग्नये स्वाहा' करून घेतलें.

त्या तिघांना ह्या पक्ष्यांचा क्षुधाशांत्यर्थ उपयोग करणें शक्य नव्हतें, म्हणून ते हा प्रकार पाहून फार विस्मित झाले. त्यांनीं अन्नावांचून रात्र कशीतरी घालविली. पहाट होतांच राजा व संन्यासी यांनीं राजकन्येस मार्ग दाखविला व ती आपल्या बापाकडे परत गेली.

नंतर संन्यासी राजाला म्हणाला, "राजा, तूं आतां पाहिलेंस कीं, जो तो आपापल्या ठिकाणीं मोठा आहे. तुला जगांत रहावयाचें असेल तर त्या पक्ष्यांप्रमाणें दुसऱ्याकरितां कोणत्याही प्रसंगीं आपल्या प्राणाची आहुति देण्यास तूं तयार असलें पाहिजे. जगाचा परित्याग करावयाचा असेल तर, रतीप्रमाणें सुंदर अशा स्त्रीस व राज्यास तृणवत् मानणाऱ्या त्या तरुण संन्याशाप्रमाणें वाग. तुला गृहस्थ बनावयाचें असेल तर आपलें जीवित परोपकारार्थ आहे, असें समज; व सर्वसंगपरित्याग हावा असेल तर सौंदर्य, द्रव्य व सत्ता यांकडे ढुंकूनही पाहूं नको. जो तो आपापल्या ठिकाणीं मोठा आहे; पण एकाचें कर्तव्य तेंच दुसऱ्याचें कर्तव्य नव्हे."



## प्रकरण ३ रें.

## निष्काम परोपकारबुद्धि ही काम वांच-विण्याची गुरुकिल्ली आहे.



लोकांच्या शारीरिक गरजा भागवून, त्यांस शरीरद्वारा मदत करणें, हें खरोखरच महत्कृत्य आहे; परंतु गरज जितकी निकडीची असेल व मदत जितकी मोठी असेल, त्या मानानें मदतीचें महत्व आहे. एकाद्याची गरज एक तासभर भागविली, तरी, त्यास आपण मदत केली हें खरें; पण एक वर्षभर त्यास मदत केली, तर तिचें महत्व याहून अधिक आहे; व त्याच्या गरजा अजिबात नाहींशा करणें, हें अत्यंत मोठें साहाय्य आहे. ज्याच्या योगानें आपलीं दुःखें कायमचीं नाहींशी होतील, असें काय तें पारमार्थिक ज्ञानच आहे; इतर कोणतेंही ज्ञान तात्पुरतें आहे, कारण अशा ज्ञानानें तेवढ्या वेळेपुरती मात्र मदत होते. मनुष्याच्या स्वभावांत बदल झाल्याखेरीज, त्यांच्या गरजा अजिबात नाहींशा होणार नाहींत. परमार्थज्ञानानेंच ही गोष्ट सिद्धीस जाईल; ह्मणून पारमार्थिक साहाय्य हें सर्वोत्कृष्ट साहाय्य होय. जो मनुष्य दुसऱ्यास परमार्थज्ञानामृत पाजितो, त्याचे मानवी प्राण्यांवर अवर्णनीय उपकार आहेत; आणि म्हणू-

नच नेहमीं आपल्या दृष्टीस असें पडतें कीं, ज्यांनीं लोकांच्या पारमार्थिक गरजा भागविल्या, ते फारच सामर्थ्यवान् पुरुष होऊन गेले. सारांश, संसारांतील आपल्या सर्व प्रयत्नांचा खरा पाया ह्मटला ह्मणजे परमार्थज्ञान होय. ज्याचें परमार्थज्ञान वर्णनीय आहे, तो मनुष्य मनांत आणील तर इतर कोणत्याही बाबतींत प्राविण्य मिळवूं शकेल; परंतु जोंपर्यंत परमार्थज्ञानरूपी सामर्थ्य मनुष्याचे अंगीं नाहीं, तोंपर्यंत त्याच्या शारीरिक गरजा कधींही भागणार नाहींत. पारमार्थिक साहाय्याच्या खालोखाल, बुद्धिविषयक (ज्ञानदानाचें) साहाय्य होय. अन्नवस्त्राच्या दानापेक्षां ज्ञानदानाचें महत्व फारच मोठें आहे. मनुष्याला जीवदान देण्यापेक्षांही त्याचें महत्व अधिक आहे; कारण मनुष्याचें खरें जीवित सत्यज्ञान संपादण्यांतच आहे. अज्ञान हें केवळ मरण आहे; ज्ञान हें जीवन आहे. अज्ञानांधःकारांत गुरफटलेलें—अज्ञान व संकटें यांत सांपडल्यामुळें अंधवत् चांचपडणारें—आयुष्य, असून नसून सारखेंच. ज्ञानदानाच्या खालची पायरी अर्थात्च, शारीरिक साहाय्याची होय. ह्मणून, दुसऱ्यास मदत करण्याच्या प्रश्नाचा विचार करितांना, शारीरिक मदत हीच काय ती एकानें दुसऱ्यास करण्याची मदत होय, असा चुकीचा समज न होऊं देण्याबद्दल प्रत्येकानें खबरदारी ठेविली पाहिजे. शारीरिक साहाय्य हें अगदीं शेवटचें व कनिष्ठ प्रतीचें आहे; कारण ह्यापासून कायमची तृप्ति होत नाहीं. भुकेनें जें दुःख होतें, तें जेवल्यानें मिटतें; पण भूक ही पुन्हां दत्त म्हणून पुढें

उभी आहेच! सारांश, पूर्ण समाधान झाल्याशिवाय आपल्या गरजा भागत नाहींत. असें झालें म्हणजे, भुकेनें जीव व्याकुळ होणार नाहीं; त्रास, संकट आणि दुःख यांचा मनावर परिणाम होणार नाहीं. म्हणून, ज्याच्या योगानें परमार्थसाधनाला मदत होते तें अर्थात्च सर्वोत्कृष्ट सहाय्य समजलें पाहिजे. ह्याहून उतरत्या पायऱ्या म्हणजे ज्ञानदान व शारीरिक सहाय ह्या होत.

केवळ शारीरिक सहाय्यानेंच जगांतील सर्व दुःखांचा लय होणार नाहीं. मनुष्याच्या स्वभावांत बदल होईपर्यंत, ह्या शारीरिक गरजा संपावयाच्या नाहींत. या जगांतील सर्व संकटांच्या व दुःखांच्या प्रश्नाचा उलगडा, मनुष्यप्राण्यांची चित्तशुद्धि झाल्यानेंच होणार आहे. सर्व दुष्कृत्यांची व संकटांची अज्ञान ही जननी आहे. मनुष्याचे अंतःकरणांत ज्ञानाचा प्रकाश पडला ह्मणजे, त्याचे अंगीं परमार्थज्ञानरूपी सामर्थ्य आलें ह्मणजे, सारांश, सर्व मानवी प्राण्यांस पारमार्थिक शिक्षण मिळून त्यांचें मन सुसंस्कृत झालें म्हणजेच, जगांतील दुःखें विलायास जातील. तोंपर्यंत आहे ही स्थिति कायमच राहील. प्रत्येक राहतें घर जरी परोपकारगृह बनविलें, व चोहोंकडे दवाखानेच दवाखाने झाले, तरी, मनुष्याचे वर्तनांत फरक होईपर्यंत, मनुष्याच्या संकटांचें निवारण होणार नाहीं.

श्रीमद्भगवद्गीतेंत वारंवार आपल्या असें वाचण्यांत येतें कीं, मनुष्य मात्रानें सतत 'कर्म' करीत असावें. सर्व प्रका-

रचीं कर्में स्वभावतःच चांगल्या वाईटाच्या मिश्रणानें बनलेलीं आहेत. असें कोणतेंही काम नाहीं कीं, ज्यांत थोडाबहुत चांगल्याचा अंश नाहीं. असें कोणतेंही कृत्य नाहीं कीं, ज्यापासून थोडाबहुतही अपकार होणार नाहीं. जें जें काम आपल्यास करावें लागतें त्यांत बऱ्या वाईटाचें मिश्रण आहेच; तरी आपण सतत उद्योग करीत असावें, अशी आपणांस बजावणी आहे. चांगलें आणि वाईट या दोहोंचा आपापल्या परी परिणाम होईलच; त्या दोहोंपासून **कर्मा**ची उत्पत्ति होईल. चांगल्याचा परिणाम चांगला होईल, व वाईटाचा परिणाम वाईट होईल. चांगलें आणि वाईट हीं दोन्हीं आत्म्याचीं बंधनें होत. ह्या दास्यजनक कर्माविषयीं **श्रीमद्भगवद्गीतें**त असा उलगडा केला आहे कीं, जें जें कर्म आपण आचरितों त्या त्या कर्मापासून आपलें मन अलिप्त ठेविलें तर आत्म्याला तें कदापिही बंधनकारक होणार नाहीं. आतां कोणत्याही कृत्याविषयीं 'अनासक्ति' ह्मणजे काय हें समजून घेण्याचा आपण प्रयत्न करूं.

सतत कार्यव्यापृत असणें, परंतु त्या कार्यापासून किंवा तज्जन्य फलापासून आपलें मन अलिप्त ठेवणें, ही **श्रीमद्भगवद्गीतें**तील एक प्रधान कल्पना आहे. 'संस्कार' ह्मणजे 'आनुवंशिक मनःप्रवृत्ति' असें ह्मणण्यास हरकत नाहीं. मनास सरोवराची उपमा देऊन, आपणांस असें ह्मणतां येईल कीं, मनांत ज्या ज्या लाटा अगर जे जे तरंग उसळतात त्यांचा जोर कमी झाला ह्मणजे त्या पूर्णपणें नाश पावत नाहींत. त्यांचा ठसा मनावर उमटलेला असतोच, आणि ह्मणूनच त्या लाटा पुनः उद्भवण्याचा संभव असतो. त्यांचा फिरून

दृश्यमान होण्याचा प्रकार कसाही असला तरी, ह्या प्रतिमेस च 'संस्कार' असें ह्मणतात. आपण करितों तें प्रत्येक काम, शरीराचें चलनवलन, आपला प्रत्येक विचार ह्या सर्वांचा मनःपटावर असाच ठसा उमटतो; आणि असें प्रतिबिंब पृष्ठभागावर जेव्हां दिसत नाहीं तेव्हांही पृष्ठभागाखालीं बरेच चांगले रीतीनें तें आपलें कार्य करीत असतें. अशा प्रकारें प्रथमतः मनावर जे ठसे उमटतात, त्या सर्वांची मिळवणी केली ह्मणजे प्रत्येक क्षणास आपण काय करीत आहों, हें निश्चित होतें. ह्या क्षणास मी जो कांहीं आहें तो सर्व भूतकालीन मनःप्रतिबिंबाचा परिणाम आहे; व ह्या परिणामासच वर्तन असें ह्मणतात. पूर्वजन्माचे व विचाराचे मनावर जे ठसे उमटतात, त्या सर्वांच्या एकीकरणानें प्रत्येक मनुष्याचें वर्तन निश्चित होतें. चांगल्या प्रतिबिंबाचें प्राबल्य असलें तर, वर्तन चांगलें होतें; वाईटाचें प्राबल्य असलें तर तें वाईट होतें. एकादा मनुष्य जर एकसारखा वाईट शब्द ऐकेल, वाईट विचार मनांत आणील व वाईट कृत्यें करीत बसेल, तर त्याच्या मनावर जिकडे तिकडे वाईटाचेंच प्रतिबिंब पडेल. ह्या सर्वांचा न कळत त्याच्या कृत्यांवर व विचारांवर पगडा बसल्यावांचून राहणार नाहीं. सारांश, मनावर जें हें वाईट प्रकारचें प्रतिबिंब उमटतें, त्याच्या दुष्परिणामानें तो मनुष्य वाईटच बनेल. ह्या गोष्टीस त्याचा कांहीं इलाज नसतो. अशा वाईट प्रतिबिंबांच्या एकीकरणामुळें वाईट कृत्यें करण्याविषयीं त्याच्या मनांत प्रबळ इच्छा उत्पन्न होते. ह्या प्रतिबिंबांच्या हातीं तो मनुष्य एकाद्या यंत्रा-

प्रमाणें ( अगर बाहुल्याप्रमाणें ) असतो, व तीं त्यास वाईट कृत्यें करण्यास लावतात. त्याचप्रमाणें एकादा मनुष्य जर चांगले विचार मनांत आणील व चांगलीं कृत्यें करील तर त्याच्या इच्छाप्रवर्तक मानसिक प्रतिबिंबांचें एकीकरण चांगलें होईल; व हीं प्रतिबिंबें, वर सांगितल्याप्रमाणें, त्याच्या मनांत नसलें तरी, त्याजकडून चांगलीं कृत्यें करवितील. जेव्हां एकाद्या मनुष्याचे मनांत इतके चांगले विचार येतील व इतकीं चांगलीं कृत्यें त्याच्या हातून होतील कीं, चांगलीं कृत्यें करण्याविषयीं त्याच्या मनाची प्रवृत्ति अनिवार होईल, तेव्हां वाईट कृत्य करण्याची त्याची इच्छा असली तरी, त्याचें मन, त्यावर झालेल्या परिणामांच्या योगानें, त्यास तसें करूं देणार नाहीं; त्याच्या मनाची प्रवृत्ति त्यास वाईट कृत्यापासून परावृत्त करील. चांगल्या प्रवृत्तींचा त्याच्या मनावर खात्रीनें दाब राहील. असें झालें ह्मणजे, मनुष्याचें सद्वर्तन ठाम झालें ह्मणून समजावें.

कांसवानें आपल्या कवचींत आपले पाय व डोकें खुपसल्यावर, त्यास तुम्ही कितीही मार दिला व त्याचे तुकडे तुकडे केले तरी, तो पुन्हा जसा बाहेर निवत नाहीं, त्याचप्रमाणें ज्या मनुष्याचा आपल्या इच्छाप्रवर्तक प्रधानस्थानांवर व इंद्रियांवर ताबा आहे, त्याचें वर्तन कधींही बदलणार नाहीं. तो आपल्या अंतर्गत शक्तींचें नियमन करितो, यामुळें कांहीं केलें तरी त्याच्या मर्जीविरुद्ध कोणतीही गोष्ट त्याजकडून करवितां येणें शक्य नाहीं. मनाच्या पृष्ठभागावर संचार करणाऱ्या ह्या सुप्रतिबिंबांचें व सुविचारांचें एकसारखें प्रतिबिंबन होत असल्यामुळें, चांगलें कृत्य





करण्याविषयींची आपली प्रवृत्ति दृढ होते, व त्यामुळें आपणांस इंद्रियदमन करितां येतें. अशाच रीतीनें वर्तनक्रम कायम होतो, व असें झालें म्हणजेच आपणांस सत्याचें ज्ञान होतें. अशा मनुष्यास कधींही कोणत्याही प्रकारची भीति नसते; त्याच्याहातून वाईट गोष्ट घडून येणें शक्य नाहीं. त्यास तुम्ही वाटेल तेथें टाका, वाटेल त्या मंडळींत ठेवा, तो आपला भयातीत आहे. चांगलें कृत्य करण्याविषयींच्या प्रवृत्तीपलीकडची आणखी एक पायरी आहे. ती पायरी म्हणजे मोक्षाची इच्छा. हिंदुस्थानांतील सर्व योगांचें पर्यवसान म्हणजे आत्म्याची मुक्ति हें होय, हें तुम्हांस ध्यानांत ठेविलें पाहिजे. प्रत्येकाची फलनिष्पत्ति सारखीच आहे. बुद्ध पुष्कळ अंशीं आपल्या समाधीच्या योगानें, व ख्रिस्त प्रार्थनेनें, ज्या स्थानाप्रत पोंचले, तेंच स्थान कर्माच्या योगानेंही मनुष्यास प्राप्त होईल. बुद्ध हा 'ज्ञानी' असून कर्माचरण करीत असे; ख्रिस्त हा 'भक्त' होता. तरी, दोघांसही तेंच परमधाम प्राप्त झालें; यांतच कायती मख्खी आहे. मोक्ष म्हणजे पूर्ण स्वतंत्रता; चांगलें व वाईट अशा दोन्ही बंधनांतून मुक्तता. सुवर्णाची झाली काय, आणि लोखंडाची झाली काय, शृंखला ती शृंखलाच. माझ्या बोटांतील कांटा काढून टाकण्याकरितां मी दुसऱ्या एका कांट्याचा उपयोग करितों, व बोटांतला कांटा निघतांच दोन्हीही फेंकून देतो. दुसरा कांटा ठेवण्याची मला अवश्यकता नसते; कारण दोन्हीही कांटेच. याप्रमाणेंच वाईट प्रवृत्तींचें चांगल्या प्रवृत्तींनीं आकलन करावें, व मनावरचे वाईट परिणाम, सुप्रतिबिंबांच्या ताज्या लाटांनीं दूर करावे. हें काम

इतकें बेमालूम करावें कीं, वाईट तेवढें सर्व नाहींसें होऊन जावें, अगर मनाच्या एका कोंपऱ्यांत दाबांत रहावें. पण हें काम आटोपलें म्हणजे चांगल्या प्रवृत्तींनाही जिंकलें पाहिजे. असें झालें म्हणजे 'आसक्त' मनुष्य 'अनासक्त' होतो. कर्म करा; पण कोणत्याही कृत्याचा अगर विचाराचा मनावर दृढ परिणाम होऊं देऊं नका. विचारलहरी जशा उद्भवतात, तशाच त्या नाहींशा होऊं द्याव्या. स्नायू व मेंदू यांजकरवीं मोठमोठीं कृत्यें करवा, पण त्यांपासून मनावर कायमचें प्रतिबिंब उमटूं देऊं नका. हें व्हावें कसें, हा मोठा प्रश्न आहे; कारण साहजिकपणें आपणांस असें दिसून येतें कीं, ज्या कृत्यावर आपली आसक्ति असते त्या कृत्याचें प्रतिबिंब मनावर कायमचें उमटतें.

कल्पना करा कीं, दिवसां मला शेंकडों लोक भेटले; त्यांमध्यें माझ्या प्रेमाची एक व्यक्ति आहे. आतां, रात्रीं निजण्याचे वेळीं मी जरी, दिवसां पाहिलेल्या सर्व चेहऱ्यांविषयीं विचार करूं लागलों तरी माझ्या प्रीतींतला व क्षणभरच माझ्या दृष्टीस पडलेला, असा एकच चेहरा माझ्या मनासमोर उभा राहतो, व बाकीचे सर्व नाहींसे होतात. ह्या विशिष्ट व्यक्तीवर माझें प्रेम असल्यामुळें इतर व्यक्तींपेक्षां तिचेंच प्रतिबिंब माझ्या मनावर अधिक खोल उमटलें. प्राणिगुणधर्मशास्त्राप्रमाणें सर्व प्रतिबिंबें सारखींच होतीं. मीं पाहिलेल्या प्रत्येक चेहऱ्याचें चित्र माझ्या नेत्रदर्पणावर उमटलें, व तें मेंदूनें ग्रहण केलें, तरी, त्याचा मनावर झालेला परिणाम अगदीं निरनिराळा होता. पण ज्या व्यक्तीस मीं अगदीं ओझरतें पाहिलें, त्या व्यक्तीचें



प्रतिबिंब माझ्या मनावर अधिक स्पष्ट उमटलें; कारण माझ्या मनाशीं ह्या चेहऱ्याप्रमाणें इतर चेहऱ्यांचा अनुकूल संबंध मुळीच नव्हता. त्यांपैकीं बहुतेक चेहरे अगदींच नवीन असून, त्यासंबंधानें माझ्या मनांत कधींही विचार आले नसाव. जो एकच चेहरा मीं ओझरता पाहिला, त्याचा मात्र माझ्या मनावर चांगलाच परिणाम झाला. कदाचित् त्याचें चित्र कित्येक वर्षें माझ्या मनःपटावर असेल, त्यासंबंधानें शेंकडोंशा गोष्टी मला माहित असतील, व ह्या नूतन डोळभेटीनें सजातीय अशा शेंकडों गोष्टाचा माझ्या मनावर परिणाम झाला असेल; त्यामुळेच ह्या सर्व पूर्वसमागमास एक प्रकारची चेतना आली. माझ्या मानसिक दृष्टीवर ह्या चेहऱ्याच्या दर्शनानें जें प्रतिबिंब उमटलें, तें इतर सर्व भिन्न चेहरे एकत्र पाहून होणाऱ्या परिणामाहून शतपटीनें अधिक असल्यामुळें त्याचा मनावर साहजिकच व तावडतोब विलक्षण परिणाम झाला.

ह्मणून 'अनासक्त' व्हा. वस्तुमात्रांना आपापलीं कामें करूं द्या. मदघ्या केंद्रस्थानाकडे विचारांची मजल जाऊं द्या. सतत उद्योग करा, पण एखाद्या लहानशा खळबळीनेंही मन चलबिचल होऊं देऊं नका. आपण भूतलावर परदेशस्थ किंवा अल्पकाळवासी आहों, असें समजून कार्य करीत रहा. सतत कार्यव्यापृत असा, पण या जगांतील वस्तूंचें बंधन करून घेऊं नका. बंधन फार भयंकर आहे. हें जग आपलें वसतिस्थान नव्हे. ज्या पुष्कळ अवस्थांतून आपणांस पार पडावयाचें आहे, त्यां-

पैकीं ही काय ती एक अवस्था आहे. 'निसर्ग आत्म्याकरितां आहे, आत्मा निसर्गाकरितां नव्हे,' हें सांख्याचें महद्वचन ध्यानांत ठेवा. आत्म्यास शिक्षण मिळावें हाच काय तो निसर्गाच्या अस्तित्वाचा हेतु आहे. ह्या शिवाय दुसरा कोणताही हेतु नाहीं. आत्म्याला ज्ञानप्राप्ति व्हावी व ज्ञानसंपादनानें मोक्षपद मिळावें, ह्याकरितांच निसर्गाचें वास्तव्य आहे, येवढें जर आपण नेहमीं लक्षांत ठेवलें, तर आपण कधींही मायासक्त होणार नाहीं; व आपणांस असें कळून येईल कीं, निसर्ग एक पुस्तक आहे, तें आपण वाचावें, व इष्टज्ञानप्राप्ति झाल्यावर तें बाजूला ठेवून द्यावें; कारण नंतर त्याची आपणांस कांहींच किंमत नाहीं. पण तसें न होतां, उलट, मायेशीं अगर निसर्गाशीं आपलें तादात्म्य आहे, असें आपणांस वाटतें. आत्मा निसर्गाकरितां आहे, जीव शरीरावरील मांसवृद्धि करितां आहे, व नेहमींच्या ह्मणीप्रमाणें, 'मनुष्य खाण्यापिण्याकरितां जगतो,' 'जगण्याकरतां खात नाहीं' ही चूक आपल्या हातून नेहमीं घडत असते. आपण निसर्गास आपल्याशीं एकरूप मानून मायासक्त होतों. ह्या आसक्तीचा आपल्यावर पगडा बसला ह्मणजे, आत्म्यावर तिचें चांगलेंच प्रतिबिंब उमटतें, व तें आपणांस जखडून टाकून गुलामांप्रमाणें राबवितें; मोक्षसाधनाला त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं.

ह्या सर्व उपदेशाचें तात्पर्य असें आहे कीं, आपण **यजमाना**प्रमाणें कर्माचरण करावें; **गुलाम** बनून करूं नये. सतत उद्योग करावा, पण उद्योग म्हणजे गुलामगिरी नव्हे. प्रत्येक मनुष्य कशा रीतीनें काम करतो, हें

आपण पहात नाहीं काय ? अगदीं रिकामा असा कोणीही मनुष्य नाहीं. शेंकडा ९९ लोक गुलामाप्रमाणें काम करितात, व त्याचा परिणाम दुःखमय होतो. हें सर्व काम आपलपोटेपणाचें—स्वार्थाचें—होय. ह्मणून भक्तीनें व मोक्षसंपादनार्थ कर्माचरण करा. प्रेम किंवा भक्ति या शब्दाचा अर्थ चांगल्या रीतीनें कळणें फार कठिण आहे. स्वतंत्रता असल्याशिवाय प्रेम कधींही उत्पन्न होणार नाहीं. गुलामाचें ( आपल्या धन्यावर ) खरें प्रेम असणें कधींही संभवनीय नाहीं. आपण एक गुलाम विकत घेऊन, त्याला शृंखलाबद्ध करून जर त्याजकडून काम घेतलें, तर तो हाडें झिजवून काबाडकष्ट करील, पण त्याच्या मनांत प्रेमाचा लेशही असूं शकणार नाहीं. त्याचप्रमाणें या जगांतील वस्तूंकरितां आपण गुलाम बनून राबतों तेव्हां, आपल्या मनांत प्रेम नसतें. ह्मणूनच आपलें कर्म हें खरें कर्म नव्हे. तीच गोष्ट आपल्या आप्तस्वकीयांसंबंधानें, मित्रासाठीं व त्याहून अधिक स्वतःकरितां, आपण जें काम करतों त्यास लागू पडते. स्वार्थाकरितां काम करणें ह्मणजे केवळ गुलामगिरी होय. अमुक काम स्वार्थैकदृष्टीनें केलेलें आहे किंवा नाहीं याचें प्रत्यंतर असें आहेः—प्रेमपूर्वक कोणतेंही काम केलें ह्मणजे त्यापासून सुखनिष्पत्ति होते. शांतता व सौख्य या रूपानें ज्याचा आपणांस मोबदला मिळत नाहीं असें प्रेमाचें खरें काम एकही नाहीं. खरें अस्तित्व, खरें ज्ञान, व खरी प्रीति या त्रयीचा एकमेकाशीं अक्षय संबंध आहे, आणि वस्तुतः एकांत तिहींचा समावेश होतो. ज्या ठिकाणीं एक आहे, त्या ठिकाणीं बाकीचीं दोन्हीं

असावयाचींच. अनन्यविषयक एकाचीं हीं तीन रूपें आहेत. हें एक म्हणजे 'अस्तित्व–ज्ञान–सौख्य' होय. अस्तित्व सापेक्ष झालें ह्मणजे आपण त्यास 'जग' ह्मणून ओळखतों. ज्ञानाची तीच वाट झाली ह्मणजे तें जगांतील वस्तूंचें ज्ञान बनतें व त्याचप्रमाणें सौख्य हें मनुष्याच्या अंतःकरणास ज्ञात अशा सर्व खऱ्या प्रेमाचें आदिस्थान मानिलें जातें. ह्मणून खऱ्या प्रीतीनें प्रीतिविषयक वस्तूला अगर त्या वस्तूवर प्रेम करणाराला कदापिही दुःख होणार नाहीं. कल्पना करा कीं, एका पुरुषाचें एका स्त्रीवर प्रेम आहे. त्याची अशी इच्छा आहे कीं, त्या स्त्रीनें सर्वस्वी आपलें होऊन राहवें. तिच्या प्रत्येक हालचालीसंबंधानें त्याचें मन साशंक आहे. त्याला वाटतें कीं, ह्या स्त्रीनें नेहमीं आपल्याजवळ बसावें, आपणासन्निध उभें रहावें, व आपण सांगूं त्याप्रमाणें खानपान करावें व वर्तावें. सारांश, तो तिचा गुलाम बनतो, व तिनें आपलें गुलाम होऊन रहावें असें त्यास वाटतें. असें करणें ह्मणजे 'प्रीति' नव्हे. ही गुलामाच्या ममतेप्रमाणें जुलमाची ममता आहे. तिला प्रेम हें खोटेंच नांव देण्यांत आलें आहे. तिला प्रीति ह्मणतां येणार नाहीं, कारण ती दुःखदायी आहे. पुरुषाच्या मर्जीप्रमाणें ती स्त्री वागली नाहीं कीं, त्यास दुःख झालेंच. खऱ्या प्रीतीचा असा मोबदला कधींच मिळणार नाहीं. प्रीतीचें फल सौख्य होय. तें फल नसेल, तर, ती प्रीतीच नव्हे; दुसऱ्या एकाद्या वस्तुसंबंधानें प्रीतीचा भास आहे. ह्मणून जेव्हां तुह्मी आपल्या पतीवर, पत्नीवर, अपत्यांवर, सर्व जगावर, व अखिल विश्वावर अशा रीतीनें प्रीति क-

ाल कीं, त्यामुळें तुम्हांस दुःख होणार नाहीं, तुमचें मन प्रीतिविषयक वस्तूविषयीं संशयित होणार नाहीं, व तुमच्या मनांत स्वार्थाचा लेशही उरणार नाहीं, तेव्हांच तुम्ही 'अनासक्त' होण्यास लायक व्हाल.

श्रीकृष्ण ह्मणतात—"अर्जुना! पहा, मीं एक क्षणभर जर कर्माचरण केलें नाहीं, तर सर्व विश्व नाहींसें होईल. बरें, विश्वापासून मला कांहीं लभ्यांश नाहीं. मी सर्वांचा शास्ता आहे. कर्माचरणापासून मला कांहीं फलप्राप्ति करून घ्यावयाची नाहीं. पण मी तें कां करितों? तर, सर्व जगावर माझें प्रेम आहे ह्मणून."* परमात्मा 'अनासक्त' आहे, कारण त्याचें वस्तुजातावर खरें प्रेम आहे. अशा प्रकारच्या खऱ्या प्रेमाच्या योगानेंच आपण अनासक्त होऊं. ज्या ज्या ठिकाणीं केवळ ऐहिक प्रेम व जगांतील वस्तूंविषयीं विलक्षण आसक्ति आहे त्या त्या ठिकाणीं तें सर्व शारीरिक आहे. त्यास पदार्थांच्या सूक्ष्म घटकावयांमधील आकर्षण ह्मणतां येईल, किंवा दोन वस्तूंस सदैव एकमेकांकडे ओढणारी शक्ति असें ह्मणतां येईल; ह्या दोन वस्तूंचें परस्पर सान्निध्य झालें नाहीं, तर त्याचा शेवट दुःखांत होतो. पण खऱ्या प्रीतींत शारीरिक ममतेचा कांहींच संबंध नसतो. प्रीतीतलीं माणसें एकमेकांपासून हजारों मैल दूर असलीं तरी, खरें प्रेम कधींही ढळणार नाहीं. तें कायम राहील. त्यापासून कधींही दुःख होणार नाहीं.

ही अनासक्ति संपादणें हें सगळ्या आयुष्याचें काम आहे; पण ती एकदां संपादिली कीं, आपल्या प्रेमाची इति-

* श्रीमद्भगवद्गीता, अ० ३, श्लो० २२, २३ व २४ पहा.

कर्तव्यता होऊन, आपण मुक्त होतों. आपलें निसर्गबंधन गळून पडतें, व निसर्गाच्या खऱ्या स्वरूपाची आपणांस ओळख होते. निसर्ग आपणांकरितां पुनः शृंखला बनवीत नाहीं. आपण त्यापासून अगदीं अलिप्त असतों, व कर्माचें फल मुळींच लक्षांत घेत नाहीं. मग अमुक फळ होईल, कीं, तमुक फल होईल, याविषयीं विचार दूरच राहिला. जो मनुष्य प्रेमानें व मोक्षाचा हेतु मनांत धरून कर्म करतो, त्यास फलाची काळजी करण्याची जरूर नाहीं; कारण तो स्वतः स्वार्थपरायण नसून त्याच्या कृत्यापासून कोठेंही दुःख होणें शक्य नाहीं.

तुह्मी आपल्या मुलांबाळांस जें कांहीं देतां, त्याचा मोबदला ह्मणून त्यांजपाशीं कांहीं मागतां काय ? त्याजकरितां उद्योग करणें हें तुमचें कर्तव्य आहे, व ह्यांतच त्याचा शेवट आहे. कोणत्याही एकाद्या विशिष्ट व्यक्तीसाठीं, एकाद्या शहराकरितां अगर एकाद्या संस्थानाकरितां तुह्मांस जें कांहीं कर्तव्य असेल, तें तुह्मी सर्वतोपरी करा; पण ह्या बाबतींत, तुमचें आपल्या मुलांबाळांशीं जसें वर्तन असतें, तसेंच वर्तन असूं द्या; ह्मणजे कोणत्याही प्रकारच्या मोबदल्याची इच्छा धरूं नका. तुह्मी नेहमीं दाते बनून जगास जें कांहीं द्यावयाचें असेल तें निरिच्छपणानें द्याल तेव्हां हें तमच कृत्य तुह्मांस मायाबंधनांतून सोडवील. जें जें कांहीं आपण करता, त्याचा मोबदला मिळण्याची आपण इच्छा केली कीं, तेथें मायेनें आपलें स्वरूप प्रकट केलें ह्मणून समजावें.

जर गुलामांप्रमाणें काम करण्याचा परिणाम स्वार्थ व फलप्राप्तीची इच्छा असा आहे, तर आपल्या मनोदेवतेचे धनी होऊन काम केल्यास अनासक्तीच्या सुखाचा लाभ

झालाच पाहिजे. हक्क व न्याय यांसंबंधानें आपण पुष्कळ वेळां मोठमोठ्या गप्पा मारतों, पण जगामध्यें या दोहोंची लहान मुलाच्या बडबडण्यापेक्षां जास्त किंमत नसते असें आपल्या प्रत्ययास येतें. मनुष्याच्या वर्तनाची दिशा बदलण्यास दोनच वस्तू चांगल्या कारणीभूत होतात; ह्या वस्तू ह्मटल्या ह्मणजे सक्ति व दया ह्या होत. सक्ति चालविणें ह्मणजे स्वार्थ साधण्यावांचून दुसरें कांहीं नाहीं. आपल्या सामर्थ्याचा व सवलतीचा होईल, तितक्या उत्तम रीतीनें स्वार्थसिद्धीकडे उपयोग करून घेण्याविषयीं सर्व स्त्रीपुरुषांचा प्रयत्न असतो. दया म्हणजे प्रत्यक्ष स्वर्ग आहे, आणि म्हणूनच सत्कृत्य करण्यासाठीं आपणां सर्वांस दयाशील बनलें पाहिजे. दया हा न्याय, हक्क व प्राबल्य ह्या तिहींचाही आधारस्तंभ आहे. केलेल्या कामाबद्दल कसलाही मोबदला मिळण्याविषयींचे सर्व विचार आपल्या पारमार्थिक प्रगतीच्या आड येतात, इतकेंच नव्हे तर, त्यांबरोबर शेवटीं पुष्कळ संकटेंही ओढवतात. भूतदयेस व निसर्गास स्वेच्छेनें अर्पण करण्याच्या हेतूनें केलेलें काम कोणत्याही प्रकारच्या बंधनास कारण होत नाहीं. दयेच्या व निरपेक्ष परोपकारबुद्धीच्या ह्या कल्पनेचा व्यावहारिक उपयोग होण्यास आणखी एक मार्ग आहे. तो मार्ग म्हटला म्हणजे कर्म 'पूज्य' मानणें, हा होय. अशी समजूत होण्यास साकार परमेश्वरावर आपली श्रद्धा असली पाहिजे. एकदां मनाची अशी समजूत झाली म्हणजे आपल्या कर्माचीं सर्व फलें आपण परमेश्वरास अर्पण करितों. परमेश्वरासंबंधानें असा

प्रकार असला म्हणजे, केलेल्या कामांबद्दल मनुष्यांपासून कांहीं एक घेण्याचा आपला हक्क नाहीं. परमेश्वर स्वतः अबाधितपणें सर्व कामें करितो व तो सदैव अनासक्त आहे. जलबिंदूंनीं कमलपत्र जसें भिजत नाहीं, तद्वत् निरिच्छ मनुष्य फलासक्तीनें कर्मबद्ध होत नाहीं. स्वार्थास फांटा देऊन अनासक्त झालेला मनुष्य एकाद्या गजबजलेल्या व दुराचरणी शहराच्या भरवस्तींत गेला, तरी, तो दुराचरणापासून अलिप्त राहील.

स्वार्थत्यागाच्या ह्या सर्वश्रेष्ठ कल्पनेचें चित्र खालीं दिलेल्या गोष्टींत आहे. ती गोष्ट अशीः—कुरुक्षेत्राच्या युद्धानंतर पांच पांडवांनीं एक मोठा यज्ञ करून गोरगुरीबांस मोठमोठाल्या देणग्या दिल्या. सर्व लोकांस ह्या प्रचंड यज्ञाचें व अलौकिक देणग्यांचें फार आश्चर्य वाटलें. ते ह्मणाले, जगांत हा अपूर्व यज्ञ आहे. यज्ञविधि आटोपल्यावर, एक लहान मुंगूस तेथें आलें. त्याचें अर्धें अंग सुवर्णाचें असून अर्धें तपकिरी होतें. हें मुंगूस तेथें येतांक्षणींच यज्ञस्थलावर लोळूं लागलें, व म्हणालें 'तुम्ही सगळे लबाड आहां; हा यज्ञ नव्हे.' लोक आश्चर्यचकित होऊन म्हणाले—"काय! हा यज्ञ नव्हे असें तूं म्हणतेस? गोरगुरीबांस द्रव्य व आभरणें देऊन त्या सर्वांस पांडवांनीं श्रीमान् व सुखी करून सोडलें, हें तुला माहीत नाहीं काय? असा अत्यंत आश्चर्यजनक यज्ञ आजपर्यंत कधींच झाला नाहीं!" हें ऐकून मुंगूस म्हणालें:—"एका लहानशा खेड्यांत ब्राह्मणाचें एक गरीब कुटुंब राहत असे. कुटुंबांत आई, बाप, मुलगा व सून अशीं चार माणसें

होतीं. ह्या कुटुंबास भिक्षुकीवर जें थोडें बहुत मिळे, त्यावरच निर्वाह करावा लागे. लोकांस उपदेश करून व शिक्षण देऊन भिक्षुकीचा धंदा चाले. त्या ठिकाणीं एकदां तीन वर्षांचा दुष्काळ पडला. अशा वेळीं त्या गरीब ब्राह्मणाची स्थिति काय वर्णावी! कांहीं दिवस अन्नपाण्यावांचून काढण्याचा प्रसंग आला! पण सुदैवानें सहावे दिवशीं बापानें थोडेसें जवाचें पीठ मिळवून आणिलें व तें समभागानें चौघांस वांटून दिलें. तें शिजवून मंडळी भोजनाच्या तयारीस लागणार इतक्यांत कोणीतरी दार ठोठावलें! बापानें दार उघडतांच, एक पाहुणा दत्त म्हणून उभा राहिला! हिंदुस्थानांत पाहुण्यास परमेश्वराप्रमाणें पूज्य मानतात, व त्याचें आदरातिथ्यही उत्तम प्रकारें करण्यांत येतें; ह्मणून ब्राह्मणानें त्यास, अशा स्थितींतही, मोठ्या संतोषानें आंत घेतलें, व आपला भाग त्यास अर्पण केला. पण त्यामुळें पाहुण्याची क्षुधा शांत न होतां ती अधिक प्रजव्लित झाली. तो म्हणाला 'मी दहा दिवस उपाशी आहें, व ह्या थोडक्याशा अन्नानें माझी क्षुधा अनावर झाली आहे.' हें ऐकून ब्राह्मण-पत्नीनें आपला भाग पाहुण्यास देण्याबद्दल पतीचीं विनंती केली. पण ब्राह्मणास तसें करणें बरोबर वाटलें नाहीं. तरी तिनें आग्रहानें म्हटलें कीं, 'गृहस्थाश्रमी या नात्यानें आपण, आलेल्या पाहुण्यास पोटभर जेऊं घातलें पाहिजे; व ज्या अर्थीं आपला भाग संपला आहे, त्या अर्थीं मला आपली पत्नी म्हणून माझा भाग पाहुण्यास दिला पाहिजे.' असें म्हणून तिनें आपला भाग पाहुण्यास दिला. तरीही अतिथीबोवांची

क्षुधा शांत होईना. तेव्हां मुलगा म्हणाला 'आईबापांच्या उपकारांबद्दल पुत्राचें कर्तव्य म्हणून, मी आपला भाग पाहुण्यास देतों.' ह्या तिसऱ्या भागानेंही पाहुण्याची तृप्ति होईना; म्हणून सुनेनें आपलाही भाग दिला. तो भक्षण केल्यानंतर पाहुणा तृप्त झाला व त्या सर्व कुटुंबास आशीर्वाद देऊन निघून गेला. त्या रात्रीं हीं चारही मनुष्यें उपासमारामुळें मृत्युमुखीं पडलीं! जमीनीवर अन्नाचे कांहीं कण पडले होते, त्यांवर मीं लोळलों; तेव्हां हल्लीं दिसतें आहे त्याप्रमाणें माझें शरीर सुवर्णमय झालें. तेव्हांपासून मी सर्व पृथ्वीवर असा एकादा यज्ञ दृष्टीस पडावा या आशेनें फिरत आहें, पण माझी आशा अद्याप सफल झाली नाहीं. अजून माझ्या शरीराचा द्वितीयार्ध कोठेंही सुवर्णाचा होत नाहीं. म्हणून हा यज्ञ नव्हे असें मी म्हणतों."

ही उदात्त धर्मकल्पना हिंदुस्थानांतून नाहींशी होत चालली आहे. धर्मात्मे कमी होऊं लागले आहेत. मी प्रथमतः इंग्रजी शिकूं लागलों तेव्हां त्या भाषेंत मीं एक गोष्टीचें पुस्तक पाहिलें. त्यांत पहिलीच गोष्ट एका कर्तव्यदक्ष मुलासंबंधीं होती. हा मुलगा एका कामाला गेला होता, व त्याला मिळालेले कांहीं पैसे त्यानें आपल्या म्हाताऱ्या आईस दिले होते. ह्याबद्दल तीन चार पानांत त्या मुलाची स्तुति होती. या गोष्टीचें तात्पर्य काय? कोणाही हिंदु मुलाला ह्या गोष्टींतील तथ्य कधींही समजणार नाहीं. 'प्रत्येक मनुष्यानें आपल्यापुरतें बघावें' ही पाश्चिमात्य कल्पना मला कळली तेव्हां त्या गोष्टींतील खरें इंगित मला कळूं लागलें. कित्येक लोक आपल्या आईबापांस व बा-

यकापोरांस टाकून देऊन, सर्व कांहीं स्वतःच स्वाहा करितात. गृहस्थ म्हणविणारानें अशी नीच कल्पना कधींही व कोठेंही मनांत आणूं नये.

कांहींएक प्रश्न न करितां कोणाही मनुष्यास तो मरणोन्मुख असला तरी, मदत करणें, ही कर्मयोगाची उदात्त कल्पना होय, असें आतां तुम्हांस कळूं लागलें असेल. लक्षावधि वेळां फसलां तरी, एक प्रश्नही विचारूं नका; व आपण काय करीत आहों, हें ध्यानींमनींही आणूं नका. गरीबांस दिलेल्या देणग्यांबद्दल त्यांनीं कृतज्ञताबुद्धि प्रकट करावी, अशी इच्छा बाळगूं नका; व आपल्या देणग्यांबद्दल टेंभा मिरवूं नका; पण उलट त्यांना धर्म करण्याची संधि तुम्हांस प्राप्त झाली म्हणून त्यांचे आभार माना. ह्यावरून हें उघड आहे कीं, उत्कृष्ट संन्यासी होण्यापेक्षां उत्कृष्ट गृहस्थ बनणें हें कर्म फारच कठिण आहे. खऱ्या संन्याशाच्या आयुष्यक्रमापेक्षांही कर्माचरण करणाराचें खरें कर्तव्यकर्म खरोखरच फार दुर्घट आहे.



## प्रकरण ४ थें.

### कर्तव्य ह्मणजे काय?



कर्मयोगाचा अभ्यास करतांना कर्म ह्मणजे काय हें समजून घेणें आवश्यक असून त्याबरोबरच कर्तव्य कशास म्हणावें हा प्रश्नही साहजिक उद्भवतो. मला कोणतेंही काम करावयाचें असलें तर त्यासंबंधानें माझें कर्तव्य काय, हें मला प्रथमतः कळलें पाहिजे, ह्मणजे तें काम मला चांगल्या प्रकारें करतां येईल. पूर्वी सांगितल्याप्रमाणें, कर्तव्यासंबंधानें निरनिराळ्या देशांत भिन्न कल्पना आहेत. यवनांस असें वाटतें कीं कुराणांत जें लिहलें आहे, तें आपलें कर्तव्य होय. खिस्ती लोकांस त्यांच्या बायबलांत (पवित्र धर्मशास्त्रांत) जें लिहिलें आहे, तें कर्तव्य आहे, असें वाटतें. हिंदूंस वेदांत जें जें लिहिलें आहे, तें तें कर्तव्य वाटतें. ह्यावरून आपल्या लक्षांत असें येतें कीं, आयुष्यांतील निरनिराळ्या अवस्थांप्रमाणें, निरनिराळ्या ऐतिहासिक कालांस व वेगवेगळ्या राष्ट्रांस अनुलक्षून भिन्नभिन्न कर्तव्यें आहेत, व तीं तशीं असलीं पाहिजेत. दुसऱ्या कोणत्याही सर्वत्र लागू पडणाऱ्या भाववाचक नामाप्रमाणें, 'कर्तव्य' शब्दाचीही स्पष्टपणें व्याख्या करणें अशक्य आहे. 'कर्तव्या'च्या परिस्थितीचें वर्णन करून, व तत्संबंधीं व्यावहारिक क्रियांचें व परिणामांचें ज्ञान संपादन करून, आपणांस

त्यासंबंधानें कल्पना मात्र होते. कित्येक गोष्टी आपण प्रत्यक्ष घडलेल्या पाहिल्या ह्मणजे आपल्या नैसर्गिक अथवा शिष्ट स्फूर्तीमुळें आपणांस असें वाटतें कीं, त्यासंबंधानें आपलें वर्तन अमुक प्रकारचें असावें. ही स्फूर्ति प्राप्त झाली कीं, मन एकंदर स्थितीसंबंधानें विचार करूं लागतें; कधीं कधीं खास असें वाटतें कीं, अमुक प्रकारच्या स्थितींत कांहीं विशिष्ट रीतीनें वर्तन करणें चांगलें; दुसऱ्या प्रसंगीं त्याच स्थितीमध्यें त्याच मार्गाचें अवलंबन करणें हें त्यास चुकीचें वाटतें. कर्तव्याची सामान्य कल्पना सर्वत्र अशी आहे कीं, प्रत्येक सद्गृहस्थ आपल्या मनाच्या (ह्यासच पुष्कळ वेळां 'सदसद्विवेकबुद्धि' ह्मणतात) आज्ञेबर-हुकुम वागतो. पण ज्यामुळें आपलें कृत्य कर्तव्य बनतें तें काय आहे? एकाद्या खिस्ती मनुष्यानें गोमांसाचा तुकडा पाहिला व तो खाऊन त्यानें आपला जीव वांचविला नाहीं अगर तो दुसऱ्यास जीवितसंरक्षणार्थ दिला नाहीं, तर, त्याला वाटेल कीं, आपण आपलें कर्तव्य बजाविलें नाहीं; पण तोच तुकडा एकाद्या हिंदूनें खाल्ला व दुसऱ्यास दिला, तर, त्यालाहीं आपण आपलें कर्तव्य केलें नाहीं असें खास वाटेल. हिंदु धर्मांतील मनुष्यास जें शिक्षण मिळतें व जो संस्कार होतो त्यामुळें त्याला असें वाटतें, यांत नवल नाहीं. गेल्या शतकांत हिंदुस्थानामध्यें 'ठग' या नांवानें प्रसिद्ध असलेल्या दरवडेखोरांच्या टोळ्या होत्या. त्यांना वाटे कीं, आपल्या तावडींत जो मनुष्य सांपडेल त्याचा प्राण घेऊन त्याचें द्रव्य हरण करणें, हें आपलें कर्तव्य होय. अशा प्रकारें जितके जास्त लोक ते मारीत,

तितकें त्यांना अधिक बरें वाटे. नेहमींच्या व्यवहारांत एकाद्या मनुष्यानें रस्त्यांत जाऊन दुसऱ्यास गोळी घालून मारलें, तर त्याला हें दुष्कृत्य केल्याबद्दल फार वाईट वाटेल, व आपण आपलें कर्तव्य मुळींच बजाविलें नाहीं, असें तो समजेल; परंतु त्याच मनुष्यानें, लढाऊ शिपायाप्रमाणें फौजेच्या रांगेंत उभें राहून, एक काय पण वीस मनुष्यांवरही बंदुक झाडून त्यांचे प्राण घेतले तर त्याला खात्रीनें आनंद होईल, व आपण आपलें कर्तव्य उत्तम प्रकारें बजावलें असें त्यांस वाटेल. यावरून हें उघड दिसतें कीं, आपण जें कृत्य करतों त्यावरून कर्तव्याची व्याख्या ठरवितां येत नाहीं. सारांश, कोणत्याही एका विषयाला धरून कर्तव्याची व्याख्या करणें अशक्य आहे. अशी वस्तुच नाहीं कीं, जिच्या संबंधानें अमुक एक निश्चित कर्तव्य आहे. तत्रापि व्यापक दृष्टीनें पाहतां,कर्तव्य आहे असें ठरतें. ज्याचे योगानें आपण ईश्वराकडे जातों, तें सत्कृत्य होय; व तेंच आपलें कर्तव्य. ज्यामुळें आपण अधःपात पावतों, तें दुष्कृत्य होय व तें आपलें कर्तव्य नव्हे. मनाशीं विचार केला तर आपणांस असें दिसून येईल कीं, कित्येक कृत्यांमुळें आपणांस उच्चपद प्राप्त होऊन आपला उत्कर्ष होतो; व कित्येक कृत्यें करून आपली अवनति होते व आपण पशूंप्रमाणें बनतों. परंतु सर्व अवस्थांतील विविध प्रकारच्या सर्व लोकांसंबंधानें, त्यांनीं अमुक कृत्य केलें ह्मणजे अमुक (बरा अगर वाईट परिणाम) होईल, असें खात्रीपूर्वक सांगणें अशक्य आहे. तत्रापि कर्तव्यासंबंधानें एक कल्पना आहे, ती सर्व देशांतील, सर्व पंथातील व सर्व काळच्या

लोकांस सर्वमान्य झाली आहे. ती एका संस्कृत सूत्रांत अशी सांगितली आहे:—'कोणत्याही प्राण्याला पीडा करूं नका. त्याला पीडा न करणें हा सद्गुण आहे व पीडा करणें हा दुर्गुण आहे.' हीच काय ती कर्तव्याची वस्तु-विषयक व सार्वत्रिक व्याख्या आपल्याला सांपडते. मानसिक दृष्टीनें कर्तव्यासंबंधानें इतकेंच सांगतां येईल कीं, अमुक एका उद्देशानें आपण कित्येक कृत्यें केलीं तर त्यापासून आपली उन्नति होते; व इतर कांहीं कृत्यांत आपल्या मनां-तील हेतूमुळें आपणच आपली किंमत कमी करून घेतों.

कुलांतील जन्म व आयुष्यांतील स्थिति यांवर अवलंबून असणाऱ्या कर्तव्यांविषयीं **श्रीमद्भगवद्गीतेंत** पुष्कळ ठि-काणीं उल्लेख केलेला आहे. कुलजन्म व समाजांतील आणि आयुष्यांतील स्थिति यांवरून, व्यक्तिमात्राची जीवितक्रमां-तील विविध चळवळींकडे असणारी मानसिक व नैतिक प्रवृत्ति पुष्कळ अंशीं निश्चित होते; ह्मणून, ज्या समाजांत आपला जन्म झाला त्या समाजांतील आवडत्या कल्पना व चळवळी यांस अनुसरून ज्या कृत्याच्या योगानें आपणांस उच्चपद प्राप्त होऊन आपण सन्माननीय होऊं तें कृत्य करणें, हें आपलें कर्तव्य होय. परंतु विशेषतः हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, सर्व राष्ट्रांच्या व सर्व समाजांच्या आवड-त्या कल्पना व चळवळी सारख्याच नसतात. एका राष्ट्रा-चा दुसऱ्या राष्ट्राविषयीं जो द्वेषभाव असतो, त्यापैकीं पुष्कळ भागाला ह्या गोष्टीचें अज्ञान हें मुख्य कारण होय. अमेरिकेंतील मनुष्याला वाटतें कीं, अमेरिकन मनुष्य आ-पल्या देशांतील रीतीभातीप्रमाणें जें कांहीं करतो तेंच काय

तें उत्तम कृत्य होय; जो मनुष्य ह्याप्रमाणें वागत नाहीं त्याला तो दुष्ट समजतो. हिंदू गृहस्थाला वाटतें कीं, आपल्या रीतीभातीच बरोबर असून सर्व जगांतील रीतीभातीहून त्या श्रेष्ठ आहेत; जो कोणी त्या पाळीत नाहीं त्यासारखा या जगांत दुष्ट मनुष्यच नाहीं. मी ह्या देशांत (अमेरिकेंत) येऊन शिकागो प्रदर्शनांतून* जात असतां, एकदां एका मनुष्यानें माझ्या मागून येऊन माझ्या पटक्याचा शेडा जोरानें ओढला. मी मागें फिरून पाहूं लागलों, तों ह्या मनुष्याचा पोषाक नीटनेटका असून तो चांगल्या सभ्य गृहस्थाप्रमाणें दिसत आहे असें मला आढळून आलें. त्याच्याशीं मी इंग्रजींत बोलूं लागलों. हें पाहतांच तो गृहस्थ ओशाळला; कारण त्याला प्रथम वाटलें होतें कीं, मला इंग्रजीचें ज्ञान नसेल. दुसरे एके प्रसंगीं ह्याच प्रदर्शनांत मला एका मनुष्यानें धक्का दिला. 'अशी गोष्ट आपल्या हातून कां घडली ?' असा प्रश्न मी त्यास करतांच तो ओशाळून अडखळत अडखळत माफी मागूं लागला, व ह्मणाला 'आपण अशा तऱ्हेचा पोषाक कां करितां ?' अशा लोकांची कळकळ त्यांच्या पद्धतीनें पोषाक करणाऱ्या व त्यांची भाषा बोलणाऱ्या लोकांच्या अकुंचित मर्यादेंतच असते. मीं त्याच्यासारखा पोषाक कां केला नाहीं, ह्मणून ज्या गृहस्थानें मला विचारलें, तोच गृहस्थ बहुशः फार सज्जन असावा; तो सर्व प्रकारें चांगला पिता व नागरिक

* हें जंगी प्रदर्शन सन १८९३ मध्यें भरलें होतें. त्यांत जगांतील सर्व धर्मांच्या प्रतिनिधींच्या टोलेजंग सभेंत स्वामी विवेकानंद यांनीं हिंदुधर्म सर्व धर्मांहून श्रेष्ठ ठरविला.

असेल; परंतु त्याचा स्वाभाविक चांगुलपणा भिन्न पोषाक केलेला मनुष्य पाहतांच लुप्त झाला! सर्व देशांतील लोकांचा परकीयांवर पगडा बसतो, कारण त्यांना आपल्या नवीन परिस्थितींत स्वतःची बाजू कशी संभाळावी हें सामान्यतः कळत नाहीं; ह्मणून जे जे लोक त्यांच्या पाहण्यांत येतात, त्याजविषयीं त्यांचे खोटेनाटे ग्रह बनतात व हेच ग्रह ते स्वदेशीं परत जातांना आपल्या बरोबर नेतात. खलाशी, फौजेंतील शिपाई व व्यापारी लोक हे परदेशांत अशा विचित्र रीतीनें वागतात कीं, तशी गोष्ट स्वदेशांत कालत्रयीं त्यांच्या स्वप्नींही यावयाची नाहीं; कदाचित् अशा विचित्र कृत्यांमुळेंच चिनी लोक युरोपियन व अमेरिकन लोकांस "परकीं भूतें" असें ह्मणत असतील.

ह्मणून एक मुख्य मुद्दा आपण ध्यानांत ठेवला पाहिजे. तो हा कीं, इतरांचीं कर्तव्यें त्यांच्या दृष्टीनें आपण नेहमीं पहाण्याचा प्रयत्न करावा; आपली जी इयत्ता अगर प्रमाण ठरलें असेल तें आधारभूत मानून परजातीच्या किंवा परकीयांच्या रीतीभाती संबंधानें आपण कधींही अनुमान करण्याचें मनांत आणूं नये. 'मीं सर्व विश्वाला प्रमाणभूत नाहीं,' हा एक मोठा धडा आपणांस शिकण्यासारखा आहे. आपल्याला जगाप्रमाणें बनलें पाहिजे; जग आपल्या प्रमाणें बनणार नाहीं. यावरून आपल्या असें लक्षांत येईल कीं, भिन्न परिस्थितींस अनुसरून आपलीं कर्तव्यें बदलतात, व विशिष्ट प्रसंगीं जें आपलें कर्तव्य असेल तें उत्कृष्ट रीतीनें बजावणें, हीच कायती एक उत्तम गोष्ट या जगांत आपणांस करतां येतें. कुलजन्मामुळें जें आपलें कर्तव्य

असेल तें आपणांस प्रथम केलें पाहिजे; नंतर आयुष्यांतील व समाजांतील आपल्या स्थितीस अनुरूप असें आपलें कर्तव्य बजावलें पाहिजे. मनुष्य जन्मांत प्रत्येकाला कोणती तरी एक स्थिति प्राप्त होते. ह्या स्थितीस अनुसरून त्यानें आपलें कर्तव्य केलें पाहिजे. परंतु मनुष्य स्वभावांत एक मोठा दोष आहे. तो असा कीं, मनुष्य कधींही स्वतःकडे डोळे उघडून बघत नाहीं. त्याला वाटतें कीं, आपण राजाप्रमाणेंच सिंहासनारूढ होण्याला लायक आहों. तो तसा असला तरी, ज्या स्थितींत तो असेल त्या स्थितीस अनुरूप असें कर्तव्य त्यानें पूर्णपणें बजावलें असें त्यानें आधीं दाखविलें पाहिजे. असें झाल्यावर जास्त महत्वाचीं कर्तव्यें त्याजकडे येतील. आपणांकडे जें लहानसें काम सोंपण्यांत येईल तें चांगल्या रीतीनें पार पाडण्यास आपण समर्थ आहों, असें मनुष्यानें जगाच्या प्रत्ययास आणून दिलें पाहिजे. हें काम त्यानें उत्तम रीतीनें केलें ह्मणजे त्याला दुसरें अधिक महत्वाचें काम सोंपण्यांत येईल. जगांत आपण मनापासून काम करूं लागलों ह्मणजे, आपणांस चोहोंकडून निसर्गाचे प्रहार सहन करावे लागतात व त्यामुळें आपली खरी स्थिति आपणांस कळून येते. ज्या जागेला अगर ज्या स्थितीला जो मनुष्य लायक नाहीं त्या जागेवर अगर त्या स्थितींत त्यास समाधानकारक रीतीनें फार दिवस राहतां येणार नाहीं. सृष्टिनियमांविरुद्ध[1] कुरकुर करण्यांत कांहीं अर्थ नाहीं; ह्मणून जो हल-

१ सृष्टिनियमाचे.

ऱ्या प्रतीचें काम करतो तो हलका मनुष्य नव्हे. कर्तव्याच्या प्रकारावरूनच मनुष्याची किंमत करतां कामा नये; तर, ज्या रीतीनें व ज्या आवेशानें मनुष्य आपलीं कर्तव्यें बजावतात त्यावरून त्या सर्वांची किंमत ठरविली पाहिजे.

एथवर मजल येऊन ठेपल्यानंतर कांहीं कालानें आपणास असें आढळून येईल कीं, कर्तव्यासंबंधाची ही कल्पनाही आपल्यास बदलावी लागेल, व कोणताही हेतु मनांत न धरतां जें काम होईल तेंच काय तें अत्यंत मोठें व उदात्त कार्य ह्मणतां येईल. तत्रापि, कर्तव्य स्मरून आपण कोणतेंही कार्य करूं लागलों ह्मणजे संवयीनें कर्तव्याची कल्पनाही आपल्या मनांत न येतां अनायासेंच तें कार्य आपल्या हातून घडूं लागतें. जेव्हां कर्म आपलें दैवत बनतें, इतकेंच नव्हे, तर, त्याहीपेक्षां तें अधिक पूज्य होतें, तेव्हां कर्माकरितांच कर्म केलें असें होईल; पण ही फार उच्च कल्पना आहे व तिजप्रत पोंचण्याला, कर्तव्य करणें हाच मार्ग आहे. आपणांस असें आढळून येईल कीं, प्रत्येक '**योगां**'त जें तत्वज्ञान सांगितलें आहे, तें कर्तव्यासंबंधाच्या सर्व कल्पनांस सारखेंच लागू पडतें; मग तें नीतीच्या रूपानें असो कीं प्रेमाच्या रूपानें असो. खऱ्या उन्नतात्म्याच्या वैभवाचें तेज पडण्याकरितां नीचात्म्यास दडपून टाकणें व अस्तित्वाच्या उच्च व भव्य मैदानांत आत्म्याची शक्ति प्रकट होण्याकरितां, खालच्या दरजाच्या सपाटीवर कर्तृत्वशक्तीचे जे तुकडे होऊन पडत आहेत त्यांस आळा घालणें, हा ह्या तत्वज्ञानाचा उद्देश आहे.

हा हेतु साध्य होण्यास आपण आपल्या नीचमनोवृत्तींचा एकसारखा निषेध केला पाहिजे. आपलें कर्तव्य नीट करावयाचें ह्मटलें ह्मणजे हा निषेध कडकपणानें अंमलांत आणलाच पाहिजे. असें झाल्यावर, सर्व समाजरचना ज्या कर्मरूप भूमींत व अनुभवरूप क्षेत्रांत कळत अगर न कळत वाढीस लागली आहे, त्याठिकाणीं स्वार्थपर नीच मनोवृत्तींस आळा घालून, आपण मनुष्यस्वभावांतील खऱ्या उच्च मनोवृत्तींचा यथेच्छ विकास होण्यास मार्ग खुला करून ठेवतों. आपण आपल्या मनाशीं नीट विचार केला ह्मणजे कर्तव्याच्या एका सुनिश्चित नियमाप्रमाणें आपणांस असें दिसून येईल कीं, स्वार्थपरायणता व विषयासक्ति यांचा शेवट दुष्टपणा व दुराचरण यांत होतो, व निरपेक्ष प्रेम व आत्मसंयमन यांपासून सद्गुणांची वाढ होते.

कर्तव्य हें क्वचित्‌च सुखावह असतें. कर्तव्यरूप रथाच्या चक्रांस प्रेमाचें ओंगण मिळालें तरच, तो रथ सुरळित चालेल; तसें न झालें तर, सारखी घासाघीस होईल. ह्या प्रेमाच्या अभावीं कोणतीं आईबापें आपल्या मुलांसंबंधीं व मुलें आईबापांसंबंधीं आपलीं कर्तव्यें बजावूं शकतील ? पतीला आपल्या पत्नीविषयीं व पत्नीला आपल्या पतीविषयीं आपलें कर्तव्य कसें बजावितां येईल ? आपल्या आयुष्यांत, स्त्री व पुरुष आणि आईबाप व मुलें यांजमधील बेबनावाच्या गोष्टी दररोज आपल्या पाहण्यांत येत नाहींत काय ? म्हणून, प्रेमामुळेंच कर्तव्य सुखावह होतें व स्वतंत्रतेंतच प्रेमाचें तेज पडतें. असें आहे तरी, आपल्या इंद्रियांचें गुलाम बनणें,

व मनुष्याच्या जीवनक्रमांत दररोज अवश्य घडणाऱ्या राग, मत्सर आणि अशाच शेंकडोंशा क्षुल्लक बाबतींचे दास बनणें ह्याला स्वतंत्रता ह्मणतां येईल काय? अशा ल्हानसहान सर्व घासाघिसींत सत्ता व स्वातंत्र्य हीं क्षमेच्या रूपानेंच पूर्णपणें व्यक्त होतील. स्त्रिया आपल्या रागीट व मत्सरी स्वभावास वश होऊन, पुष्कळ वेळां आपल्या पतीच्या मस्तकावर दोषाचें खापर फोडण्यास तयार होतात व मग त्यांच्या समजुतीप्रमाणें त्या आपलें स्वातंत्र्य गाजवितात; पण त्यांना असें कळत नाहीं कीं, अशा कृतीनें आपण उलटें आपल्या मनोवृत्तींचे व इंद्रियांचे गुलामच बनतों. जे नेहमीं आपल्या बायकांचे दोष काढण्यास तत्पर असतात त्या पुरुषांचीही स्थिति अशीच असते.

पुरुषांमध्यें एकपत्नीव्रत व स्त्रियांत पातिव्रत्य हा पहिला सद्गुण होय. एकाद्या मनुष्याचें वर्तन कितीही स्वैर झालें असलें तरी, शांत, प्रेमळ व साध्वी अशा पत्नीकडून तो ताळ्यावर येणार नाहीं, असें फारच क्वचित् घडेल. हें जग अद्यापि इतकें वाईट झालें नाहीं. सर्व जगभर पशुतुल्य व घाणेरड्या आचरणाचे पुरुष आहेत अशाबद्दल पुष्कळ गोष्टी माझ्या ऐकिवांत आहेत; पण अशा प्रकारच्या स्त्रियाही पुरुषांइतक्याच असतात असाही माझा अनुभव आहे. अमेरिकन स्त्रियांच्या नेहमींच्या प्रतिज्ञेवरून परदेशस्थास त्या जितक्या सुशील व शुद्धाचरणी भासतात, तितक्या त्या असतील तर, माझी पूर्ण खात्री आहे कीं, ह्या देशांत एकही अपवित्र मनुष्य दिसणार नाहीं; कारण

मनुष्यास अपवित्र बनण्याला जागाच उरणार नाहीं. असा कोणता पशुपणा आहे कीं, जो शुद्धाचरण व पातिव्रत्य यांचा गुलाम बनून राहणार नाहीं ! सुशील व साध्वी स्त्रीस आपल्या पतीखेरीज दुसरा कोणीही मनुष्य आपल्या मुलाप्रमाणें वाटतो. आईच्या नात्यानें ती त्याच्याशीं वर्तन ठेविते. अशा साध्वी स्त्रीच्या शुद्धाचरणाचें इतकें सामर्थ्य असतें कीं, त्याचे योगानें त्या साध्वीसमोर येणाऱ्या प्रत्येक इसमाचें मन पवित्र विचारांनीं भरून जातें; मग त्याचें वर्तन कितीही पशुतुल्य असलें तरी हरकत नाहीं. प्रत्येक मनुष्य आपल्या गृहिणीखेरिज इतर सर्व स्त्रियांस आई, मुलगी अगर बहीण यांप्रमाणें मानील, तर, त्याचाही असाच सुपरिणाम होईल. शिवाय, ज्या मनुष्यास धर्मोपदेशक बनावयाचें आहे त्यानें प्रत्येक स्त्रीस मातेसमान मानिलें पाहिजे, व तिच्याशीं नेहमीं मुलाप्रमाणें वर्तन ठेविलें पाहिजे.

जगांत आईची योग्यता सर्वांहून श्रेष्ठ आहे; कारण, अगदीं पराकाष्ठेचा असा निरिच्छपणा शिकून तो अमलांत आणण्यास हेंच काय तें एक स्थान आहे. मातृप्रेमाहून अधिक असें काय तें एका परमेश्वराचेंच प्रेम आहे; इतर प्रकारची प्रीति याहून कमी योग्यतेची आहे. आपल्या मुलांसंबंधानें आधीं विचार करून नंतर स्वतःविषयीं बघणें, हें आईचें कर्तव्य आहे. पण, असें न करितां, उलट, आई-बाप नेहमीं आपल्याविषयीं आधीं विचार करून, खाण्या-पिण्याच्या क्षुल्लक बाबतींतही उत्तम असेल तें स्वतः घेऊन, शेष मुलांस देतील, तर, पक्ष्यांचीं पिलें ज्याप्रमाणें

पंख फुटतांच उडून जाऊन आईबापांस ओळखेनाशीं हो-तात, तद्वतच अशा आईबापांचा व मुलांचा संबंध राहील. स्त्री जाती ह्मणजे ईश्वराच्या मातृत्वाचें स्वरूप आहे, असें मानणारा पुरुष खरोखरच धन्य समजला पाहिजे. त्याचप्रमाणें जी स्त्री पुरुषवर्गास ईश्वरी पितृत्वाचें स्वरूप मानिते तीही धन्य होय. जीं मुलें, आपले आईबाप इहलोकींचे ईश्वरी अवतार आहेत असें मानितात, त्यांचेही खरोखर धन्यवाद गाइले पाहिजेत.

ज्या ज्या वेळीं आपलें जें जें कर्तव्य असेल तें तें त्या त्या वेळीं बजावणें हाच काय तो आपल्या उन्नतीचा मार्ग आहे. अशाच रीतीनें आपणांस दिवसेंदिवस बळकटी येई-ल; व होता होतां आपण अत्युच्च पदाप्रत जाऊन पोहोंचूं. कोणत्याही प्रकारच्या कर्तव्याचा तिटकारा करूं नये. मी पुनः सांगतों कीं, हलकें काम करणारा मनुष्य भारी काम करणारापेक्षां कमी दरजाचा ह्मणतां येणार नाहीं. कर्तव्या-च्या स्वरूपावरून मनुष्याची किंमत न करितां, तो ज्या री-तीनें तें बजावील त्यावरून त्याची किंमत करावी. कर्तव्य करण्याची त्याची पद्धति व सामर्थ्य हींच त्यास कसास लावतील. फार थोडया वेळांत मजबूत व सुंदर जोडा तयार करणारा चांभार आपल्या कामाच्या व धंद्याच्या दृष्टीनें, आयुष्याचा प्रत्येक दिवस कांहीं तरी बरळण्यांत घालविणाऱ्या अध्यापकापेक्षां अधिक चांगला ह्मटला पाहिजे.

एका तरुण संन्याशानें अरण्यांत जाऊन तेथें पुष्कळ दिवस योगाभ्यास केला. ह्या खडतर तपश्चर्येचीं १२ वर्षे परिपूर्ण झाल्यावर, एके दिवशीं तो झाडाखालीं बसला असतां, झाडाचीं कांहीं वाळलेलीं पानें त्याचे मस्तकावर

पडलीं. त्यानें वर पाहिलें, तों एक कावळा व सारसपक्षी एकमेकांशीं भांडत आहेत, असें त्याच्या दृष्टीस पडलें. हें पाहून तो फार रागावला, व ह्मणाला ' नीचांनों ! तुह्मी माझ्या मस्तकावर तीं सुकीं पानें टाकिलीं काय ! ' योग्याचें सामर्थ्य इतकें होतें कीं, रागानें संतप्त झालेल्या त्याच्या मस्तकांतून जें अग्नितेज बाहेर आलें, त्यामुळें ते दोन्ही पक्षी निजधामास गेले ! हा एकंदर प्रकार पाहून त्याला फार आनंद झाला. एका नेत्रविक्षेपानें काक व सारस यांस दग्ध करण्याइतका आपल्या शक्तीचा विकास झालेला पाहून त्याचा आनंद गगनांत मावेनासा झाला. असो. कांहीं वेळानें त्यास 'पुढी' घेण्याकरितां शहरांत जावें लागलें. तो एका घराजवळ जाऊन उभा राहिला व ह्मणाला ' माते, अन्न दे. ' घरांतील बाईनें सांगितलें कीं, ' मुला, थोडा वेळ थांब. ' तो तरुण पुरुष मनांत ह्मणाला, ' ही दरिद्री स्त्री मला थांब ह्मणते काय ! माझें सामर्थ्य इला अद्याप माहित नाहींसें दिसतें ! ' अशा रीतीनें तो आपल्या मनाशीं विचार करीत असतां घरांतून खालीं लिहिलेले शब्द त्याच्या कानीं पडले—' मुला, तूं आपल्या सामर्थ्याचा गर्व वाहूं नको. येथें काक व सारसपक्षी नाहींत. ' हें ऐकून तो तरुण संन्यासी आश्चर्यचकित झाला. त्याला आणखी कांहीं वेळ थांबावें लागलें. शेवटीं घरांतील बाई बाहेर आली. तो संन्यासी तिच्या पायां पडून ह्मणाला ' ही गोष्ट तुह्मांस कशी कळली ! बाई ह्मणाली, ' मुला, तुझें तप अगर योग मला माहीत नाहीं. मीं आपली सामान्य स्त्री आहें; पण माझे पति अस्वस्थ अस-

त्यामुळें मी त्यांच्या सेवेंत होते, ह्मणून तुला थांबावें लागलें. यांत मीं आपलें कर्तव्य केलें. मीं जन्मभर कर्तव्य बजाविण्याविषयीं फार झटलें. मीं अविवाहित असतांना, मुलीप्रमाणें आपलें कर्तव्य बजाविलें; व लग्न झाल्यावरही मीं आपलें कर्तव्य करीत आहें. हाच कायतो माझा योगाभ्यास. ह्याचे योगानेंच माझ्या अंतःकरणांत प्रकाश पडला, व ह्या अंतर्ज्ञानामुळें तूं अरण्यांत जें कृत्य केलेंस तें व तुझ्या मनांतील विचार मला समजले. पण याहींपेक्षां अधिक असें कांहीं तुला पाहिजे असेल, तर, अमक्या अमक्या शहरीं बाजारांत एका खाटकाकडे जा, म्हणजे तो तुला शिकण्यासारख्या पुष्कळ गोष्टी सांगेल.' हें ऐकून संन्यासी मनांत म्हणाला, 'मीं त्या शहरांत खाटकाकडे जाऊं काय!' (आमच्या देशांत खाटिक म्हणजे अगदीं हलक्या प्रतीचे लोक समजतात. त्यांना 'चांडाळ' म्हणतात. ते घाणेरडा धंदा करतात म्हणून त्यांना कोणी शिवत नाहीं. कसाबाच्या धंद्याशिवाय ते झाडूवाल्याचा व इतर पुष्कळ धंदे करितात.)

संन्याशानें आतांपर्यंत जो प्रकार पाहिला, त्यामुळें त्याच्या मनांत किंचित् प्रकाश पडला. तो चालत चालत शहराजवळ गेला. तेथें त्यानें बाजार हुडकून काढला व बाजारांत जातांच कांहीं अंतरावर त्यास एक लठ्ठ खाटीक सुरा घेऊन आपलें काम करतांना व पुष्कळ लोकांशीं देवघेव करतांना दृष्टीस पडला. तरुण संन्यासी आपल्या मनांत म्हणाला 'देवा! काय हा प्रकार! ह्या मनुष्याजवळून का मीं आज ज्ञान संपादन करणार? हा

तर केवळ राक्षसाचा अवतार आहे !' इतक्या अवकाशांत कसाब संन्याशाकडे पाहून म्हणाला, 'स्वामी, आपल्याला त्या बाईनें इकडे पाठविलें काय ? माझें काम पुरें होईपर्यंत आपण कृपा करून बसावें.' संन्यासी मनांत म्हणाला 'येथें बसून मला काय लाभ होणार कोण जाणे ?' असा विचार करून तो खालीं बसला. इकडे कसाबाचें काम चालूच होतें. त्यानें आपलें देवघेवीचें सर्व काम संपल्यावर पैसे घेतले व तो संन्याशास म्हणाला, 'चला; आपण आतां घराकडे जाऊं.' त्याप्रमाणें ते कसाबाचे घरीं गेले. कसाबानें संन्याशास बसावयास देऊन जरा थांबा म्हणून सांगितलें. नंतर त्यानें घरांत जाऊन आपल्या आईबापांस खाऊं पिऊं घालून संतुष्ट केलें. मग तो बाहेर संन्याशाजवळ येऊन बसला, आणि म्हणाला 'महाराज, आपण माझ्या भेटीस आलां आहां; तेव्हां, मीं आपली कोणती सेवा करावी तें आपण मला सांगा.' संन्याशानें त्याला आत्मा आणि ईश्वर यासंबंधाचे कांहीं प्रश्न केले. ह्या प्रश्नांचें उत्तर म्हणून कसाबानें जें मोठें व्याख्यान दिलें, तें आजमित्तीस 'व्याधगीता' या ग्रंथाच्या रूपानें हिंदुस्थानांत सुप्रसिद्ध आहे. यांत वेदांत व अध्यात्म शास्त्रांतील अत्युच्च तत्वें आहेत. श्रीकृष्णानें अर्जुनास केलेला उपदेश ह्मणजे 'श्रीमद्भगवद्गीता' तुह्मांस ऐकून माहित असेलच. ती वाचून झाल्यावर 'व्याधगीता' वाचा. या ग्रंथांत वेदांताचा अर्क एकत्र करून ठेविलेला आहे. असो. कसाबानें आपलें संभाषण पुरें केलें, तेव्हां संन्यासी आश्चर्यचकित होऊन म्हणालाः—'इतकें तुझें

ज्ञान असून तुझें शरीर कसाबाच्या रूपानें असें घाणेरडें काम कां करितें?' चांडाळ म्हणाला, 'मुला, कोणतेंही कर्तव्य घाणेरडें अगर किळसवाणें नाहीं. माझें जनन, स्थिति व परिस्थिति हीं सर्व जन्मतः खाटकाचींच होतीं. मीं मोठा होऊन मला कळूं लागलें तेव्हां मीं हा धंदा शिकलों. मीं अनासक्त आहें व आपलें कर्तव्य उत्तम रीतीनें बजावतों. गृहस्थ या नात्यानें, व आईबापांस सुखी करण्यांत, मीं कधींच कर्तव्यपराङ्मुख होत नाहीं. तुझा योगही मला माहित नाहीं व मीं कधीं संन्यासीही झालों नाहीं. त्याचप्रमाणें मीं कधीं अरण्यवास केला नाहीं. तरी तूं जें जें ऐकलेंस व पाहिलेंस तें सर्व, माझ्या स्थितींत जें माझें कर्तव्य आहे तें अनासक्त होऊन केल्यामुळें, मला प्राप्त झालें आहे.'

हिंदुस्थानांत एक साधु आहे. हा मोठा योगी आहे. ह्याच्यासारखा अलौकिक पुरुष मीं जन्मांत पाहिला नाहीं. तो विलक्षण मनुष्य आहे. तो कोणास कांहीं शिकवीत नाहीं व विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर देत नाहीं. शिक्षकाचें काम हातीं घेणें हें त्याला फार जड वाटतें. तो तें कधीं करणार नाहीं. तुम्हीं एकादा प्रश्न विचारून कांहीं दिवस वाट पाहत रहाल तर बोलण्याच्या ओघांत तोच होऊन तो विषय पुढें आणील व त्यावर त्याच्या संभाषणानें विलक्षण प्रकाश पडेल. त्यानें मला एकदां निर्दोष असें काम करण्याची गुरुकिल्ली सांगिली. तो म्हणाला–'कोणत्याही कृत्याची साधनसामग्री व उद्देश हीं दोन्हीं एकमय होऊं द्या. यांत द्वैत न ठेवणें हीच गुरुकिल्ली आहे.' सारांश, कोणतेंही कृत्य करतांना त्याच्या पलीकडे तुमची

नजर जाऊं देऊं नका. तें आपलें दैवत, किंबहुना आदिदैवत, समजून तुह्मीं आपलें आयुष्य त्या वेळेपुरतें तिकडेच अर्पण करा. असें करणें ह्मणजे कर्तव्याकरितां कर्तव्य करणें होय. अशाच रीतीनें वरील गोष्टींत बाईनें व कसाबानें मोठ्या आनंदानें, एकाग्रचित्तानें व फार उल्हासानें आपलें कर्तव्य बजावलें. ह्मणूनच त्यास अंतर्ज्ञान प्राप्त झालें. प्रत्येक कर्तव्य पवित्र आहे व कर्तव्याचे ठायीं आसक्ति हाच परमेश्वराचे भक्तीचा अत्युत्कृष्ट प्रकार आहे. संसारपाशानें बद्ध झालेल्यांचा अज्ञानानें जड झालेला व भ्रमानें भांबावलेला आत्मा ज्ञानरूपी प्रकाशानें संसारबंधनांतून मुक्त होण्यास कर्तव्यासक्ति हें एक उत्तम साधन आहे. ह्या गोष्टीवरून हें स्पष्ट होतें कीं, आयुष्यांतील कोणत्याही स्थितींत फलाची अपेक्षा न ठेवतां योग्य रीतीनें आपलें कर्तव्य बजावल्यापासून आत्म्याची पूर्णोन्नति होते.

आपलीं कर्तव्यें आपल्या परिस्थितीवरून बहुशः निश्चित होतात. त्यांत हलकीं व भारी असा प्रकार बिलकुल नाहीं. फलाची अपेक्षा धरणारा मनुष्य आपल्या वांट्यास आलेल्या कर्तव्याबद्दल कुरकुरत असतो. निरिच्छ मनुष्यास सर्व कर्तव्यें चांगलींच वाटतात. ह्या कार्यसाधक कर्तव्यरूप शस्त्रांच्या योगानें तो स्वार्थ व विषयासक्ति यांचा बिमोड करून, आत्म्याचें स्वातंत्र्य अगदीं कायम करून टाकतो. आपणांसर्वांस स्वतःविषयीं वृथाभिमान असतोच. मी लहान मुलगा असतांना मला स्वप्न पडे कीं, मी एक मोठा राजा आहे व मी असा आहे व तसा आहे. याचप्रमाणें तुमचा अनुभव असेल. पण हें सर्व स्वप्न आहे,

व सृष्टीचा न्याय सर्वांसंबंधानें सारखाच कडक व निर्भिड आहे. ह्मणून, आपण जितक्या अंशानें कबूल करण्यास खुषी असतों, त्यापेक्षां जास्त अंशानें आपल्या योग्यतेवरून आपलीं कर्तव्यें निश्चित होतात. आपण जें कर्तव्य हातीं घेतलें आहे, जें आपल्याला इतर सर्व कर्तव्यांपेक्षां निकट आहे, तें बजावल्यानेंच आपणांस बळकटी येते. अशा रीतीनें आपण आपलें सामर्थ्य हळूहळू वाढविलें ह्मणजे, ज्या स्थितींत समाजांतील व आयुष्यांतील सन्माननीय व अतिशय स्पृहणीय कर्तव्यें करण्याचा आपणांस हक्क प्राप्त होतो, त्या स्थितीप्रत आपण पोहोंचूं. चुरशीनें मत्सरास भरतें येतें, व तें अंतःकरणांतील दयार्द्रतेस मारक होतें. कुरकुर करणारास सर्व कर्तव्यें अप्रिय वाटतात; त्यांचा तो तिटकारा करतो; त्याचें कशानेंही समाधान होत नाहीं, व त्याचें सर्व आयुष्य निष्फळ होणार हें ठरलेलेंच असतें. ह्मणून, आपण सतत कार्यव्यापृत असावें; आपल्या वांट्यास जें कर्तव्य आलें असेल तें करीत असावें; व नेहमीं झटून काम करण्यास आपण तत्पर असावें. असें झालें ह्मणजे आपल्या अंतःकरणांत प्रकाश पडेल !



# प्रकरण ५ वें.

## आपण आपलीच उन्नति करितों; जगाची करीत नाहीं.



कर्तव्याबद्दल आपली श्रद्धा असली म्हणजे तिच्या योगानें आपल्या प्रगतीस किती मदत होते, ह्याचा आणखी विचार करण्यापूर्वी, हिंदुस्थानांत आम्हीं 'कर्म' या शब्दानें काय व्यक्त करितों ह्याचें अन्य स्वरूपानें होईल तितकें थोडक्यांत निरूपण करूं. प्रत्येक धर्मांत ३ भाग आहेत. ( १ ) तत्वज्ञान, ( २ ) पौराणिक गोष्टी व ( ३ ) शास्त्रोक्त क्रिया. तत्वज्ञान प्रत्येक धर्माचें सार आहे. पौराणिक गोष्टींच्या योगानें तत्वज्ञान चांगलें व्यक्त होतें, इतकेंच नव्हे तर, थोर पुरुषांचीं थोड्या बहुत अंशानें दंतकथारूप चरित्रें व चमत्कारिक कल्पित वगैरे गोष्टी यांच्या दृष्टांतानें त्याचें उत्तम स्पष्टीकरण होतें. विधियुक्त क्रियांच्या योगानें, सर्वांस समजेल असें सुव्यक्त मूर्त स्वरूप त्या तत्वज्ञानास प्राप्त होतें. सारांश, शास्त्रोक्त क्रिया म्हणजे साररूपानें एकत्र केलेलें तत्वज्ञान होय. ह्याच क्रियेस 'कर्म' अशी संज्ञा असून ह्याची प्रत्येक धर्मांत आवश्यकता आहे; कारण आपणांपैकीं पुष्कळ लोक अध्यात्मविद्येंत निष्णात होईपर्यंत त्यांस अमूर्त अध्यात्मिक

गोष्टी कळणें शक्य नाहीं. आपणांस कोणतीही गोष्ट समजेल, असें वाटणें सोपें आहे; पण मनुष्यास जेव्हां व्यावहारिक अनुभव येतो, तेव्हां, अमूर्त कल्पनांचें आकलन करणें किती दुष्कर असतें, हें त्यास चांगलें कळतें. म्हणून, चिन्हांचा फार उपयोग आहे व वस्तूंचें दिग्दर्शन करणाऱ्या ह्या संज्ञायुक्त पद्धतीचा आपणांस त्याग करितां येत नाहीं. सर्व प्रकारच्या धर्मांत चिन्हांचा उपयोग अस्मार्त कालापासून करण्यांत येत आहे. एका दिशेनें विचार केला, तर, असें दिसतें कीं, चिन्हांच्या साह्यावांचून आपणांस विचार करणें शक्यच नाहीं; शब्द देखील विचारांच्या सांकेतिक खुणाच आहेत. अन्य दृष्टीनें विचार केला, तर, विश्वांतील वस्तुजात संज्ञारूप म्हणतां येईल. सर्व विश्व चिन्हमय असून त्याचे मागें ईश्वरच काय तो अस्तित्वरूपानें आहे. हें संज्ञाशास्त्र केवळ मानवी कृतीचें फल नव्हे. एका धर्माचे कांहीं लोक एकत्र बसून त्यांच्या संयुक्त विचारांनीं हात, पाय वगैरे खुणा ठरलेल्या नाहींत. त्यांच्या कल्पनेनें त्या अस्तित्वांत आल्या नाहींत. त्यांची वाढ नैसर्गिक आहे. असें नसतें तर, बहुतेकांचे मनांत अमुक खुणांनीं अमुक कल्पना उद्भवतात, त्या उद्भवल्या नसत्या. कित्येक खुणा सार्वत्रिक आहेत, त्या तशा झाल्या नसत्या. तुम्हांपैकीं पुष्कळांस असें वाटतें कीं, क्रास* हा शब्द ख्रिस्तिधर्मसूचक खूण या रूपानेंच प्रथम

* ज्याप्रमाणें हिंदूच्या देवालयांस घुमट व मुसलमानांच्या मशिदींवर अर्धचंद्राकार (क्रिसेंट) खूण असते त्याचप्रमाणें ही खूण ख्रिस्ती देवालयांवर ('चर्च'वर) असते.

अस्तित्वांत आला. पण वस्तुतः ख्रिस्तिधर्म अस्तित्वांत येण्या-पूर्वी, मोझेसचा[*] जन्म होण्यापूर्वी, वेद जगांत येण्यापूर्वी, इतकेंच नव्हे, तर, मानवी वस्तूंचा मानवी लेख प्रकाशमान होण्यापूर्वींच 'क्रॉस' शब्द अस्तित्वांत होता. अइटेक्स[†] व फिनिशिअन[¶] लोकांचे अंमलांतही ह्याचें अस्तित्व होतें; व तो त्या वेळीं प्रत्येकाजवळ असे, असें दिसतें. त्याचप्रमाणें सुळावर चढविलेल्या लोकतारकाची (येशू ख्रिस्ताची), म्हणजे फाशीं दिलेल्या मनुष्याची, खूण बहुशः प्रत्येक राष्ट्रास अवगत होती असें दिसतें. सर्व जगभर वर्तुळ हें एक मोठें चिन्ह असून तें फार दिवसांपासून अस्तित्वांत आहे. त्याचप्रमाणें स्वस्तिकाची खूण 卐 सार्वत्रिक आहे. एका वेळीं, बौद्धधर्माचे लोकांनीं ती जगभर आपल्याबरोबर नाचविली, असा लोकांचा समज होता; पण बुद्धांचे अस्तित्वापूर्वी कित्येक युगें निरनिराळ्या राष्ट्रांतून ही खूण प्रचलित असल्याचें आतां

* ख्रिस्ति शकापूर्वी १७ व्या शतकांत हा जन्मास आला.

† स्पेन देशांतील लोकांनीं अमेरिकेंतील मेक्सिको देश प्रथमतः शोधून काढून त्या देशावर स्वारी केली, त्यावेळीं ह्या लोकांची त्या प्रांतांत सत्ता होती.

¶ ह्या लोकांचा देश फिनीशिया भूमध्य समुद्राचे कांठीं आहे. दंतकथांवरून हे लोक ३०' हजार वर्षांपूर्वींचे आहेत, असें कळतें. ख्रिस्ति शकापूर्वी ७ व्या—८ व्या शतकाचे सुमारास यांची, विद्या, कलाकौशल्य, व्यापार, नौकाशास्त्र, इत्यादिकांत फार भरभराट होऊन यांचें वर्चस्व चोहोंकडे पसरलें.

आढळून आलें आहे. जुन्या बॅबिलन[†] शहरांत व मिसर (ईजिप्त) देशांत ही खूण असल्याचें समजतें. ह्यावरून असें सिद्ध होतें कीं, ह्या सर्व खुणा केवळ रूढीनें अस्तित्वांत येणें शक्य नाहीं. त्यांना कांहींतरी कारण असलें पाहिजे. ह्या खुणा व मनुष्याचें मन यांमध्यें कांहींतरी नैसर्गिक संगति असली पाहिजे. भाषा ही पण लोकाचाराचें फळ नव्हे; अमुक शब्दांनीं अमुक विचार प्रदर्शित करावे असें लोकांनीं एकमतानें कधीं ठरविलें नाहीं. अनुरूप शब्दाशिवाय विचार व अनुरूप विचाराशिवाय शब्द असणें शक्य नाहीं. शब्द व विचार हे स्वभावतःच एकमेकांपासून विलग नाहींत. खुणांनीं विचार व्यक्त करावयाचे म्हटलें म्हणजे ते ध्वनीच्या खुणांनीं (शब्दांनीं) अगर रंगांच्या खुणांनीं व्यक्त करितां येतील. मुके व बहिरे यांजकरितां ध्वनीच्या खूणांशिवाय इतर खुणा पाहिजेत. मनांतील प्रत्येक विचाराला एक जोड विचार असतो. ह्याला संस्कृतांत नाम–रूप असें म्हणतात. भाषेप्रमाणें खुणाही लोकाचारानें अस्तित्वांत येणें अशक्य आहे. जगांत शास्त्रोक्त क्रियांसंबंधीं ज्या खुणा आहेत, त्यांवरून मनुष्य-

† हें शहर प्राचीन काळीं फार भरभराटीस आलें होतें. हल्लीं तें जमीनदोस्त झालें आहे. हें एशियांतील तुर्कस्तान देशांत युफ्राटिस नदीचेकांठीं बगदाद शहरचे दक्षिणेस ६० मैलांवर आहे. ह्याच्या पूर्ववैभवावरून हल्लींच्या लंडन शहरास 'आधुनिक बॅबिलन' असें म्हणण्याचा परिपाठ आहे.

जातीचे धर्मसंबंधीं विचार चांगले व्यक्त होतात. अशा क्रियांचें, देवालयांचें व अशा प्रकारच्या सर्व उपकरणांचें मुळींच प्रयोजन नाहीं, हें म्हणणें फार सोपें आहे. अलीकडे तर, लहान मूलही असें म्हणूं लागलें आहे. पण कोणासही सहज असें दिसून येईल कीं, देवालयांत जाऊन भजनपूजन करणारे, देवालयांत भजनपूजन न करणारांपेक्षां पुष्कळ बाबतींत निराळे असतात. म्हणून विशिष्ट धर्माची, विशिष्ट देवालयें, शास्त्रोक्त क्रिया व इतर साकार पदार्थ यांशीं संगति असली म्हणजे त्या धर्माप्रमाणें वागणाऱ्या लोकांचे मनांत जे विचार येतात ते विचार वरील साकार पदार्थांच्या खुणांच्या रूपानेंच असतात; तेव्हां शास्त्रोक्त क्रिया व संज्ञाशास्त्र यांस मुळींच न जुमानणें हें फायदेशीर नाहीं. ह्या गोष्टींचें अध्ययन व तदनुसार आचरण ह्यांचा 'कर्मयोगा'च्या एका भागांत स्वाभाविकपणें समावेश होतो.

ह्या कर्मविषयक शास्त्राचीं आणखी पुष्कळ स्वरूपें आहेत. त्यांतलें एक स्वरूप म्हटलें म्हणजे शब्दाचें सामर्थ्य किती आहे व विचार आणि शब्द यांचा काय संबंध आहे, ह्याचें ज्ञान करून घेणें हें होय. प्रत्येक धर्मांत शब्दाच्या सामर्थ्याविषयीं खात्री झालेली आहे; ती इतकी कीं, कित्येक धर्मांत सृष्टि देखील शब्दापासून उत्पन्न झाली आहे असें मानितात. ईश्वराविषयींच्या विचाराचें बाह्य स्वरूप ह्मटलें ह्मणजे 'शब्द'च होय; व

ईश्वरानें प्रथम विचार करून आपली इच्छा प्रकट केल्यावर 'शब्द 'ब्रह्मांतून सृष्टि उत्पन्न झाली, असा या धर्मांतील लोकांचा समज आहे. ह्या व्यावहारिक आयुष्यक्रमाच्या गर्दीमध्यें आपल्या ज्ञानतंतूंची चेतना कमी होत होत ते लोखंडी तारेप्रमाणें कठिण बनतात. जसजसे आपण वयातीत होतों, तसतसे या जगांत आपणांस अधिकाधिक प्रहार सहन करावे लागतात, व त्यामुळें आपले ज्ञानतंतू जड होतात. ह्याचा परिणाम असा होतो कीं, ज्या गोष्टी एकसारख्या आपल्या सभोंवतीं ढळढळीत घडत असतात, त्यांची आपण अनास्था करितों. असें आहे तरी, कधींकधीं मनुष्यस्वभाव आपला हक्क स्थापन केल्याशिवाय राहत नाहीं; व असें झालें म्हणजे, अशा सामान्य गोष्टींचा आपण शोध करूं लागतों व त्यांबद्दल आपणांस आश्चर्य वाटतें. हें आश्चर्य म्हणजे ज्ञानप्राप्तीची पहिली पायरी होय. 'शब्दा 'चें तात्विक व धार्मिक महत्व एका बाजूस ठेविलें तरी, आपणांस असें दिसून येईल कीं, मानवी आयुष्यरूपी नाटकांत ध्वनिरूप चिन्हें फारच महत्वाचीं कामें करितात. मीं तुह्मांपुढें बोलत उभा आहे; पण मी तुम्हांस स्पर्श करीत नाहीं. तरी, माझ्या भाषणानें वायूस गति मिळून तद्द्वारा तें तुमच्या कर्णरंध्रांत प्रवेश करून मज्जातंतूंस जागृत करितें व त्यामुळें त्या भाषणाचा तुमच्या मनावर परिणाम होतो. तुह्मांस ह्याचा प्रतिकार करितां यावयाचा नाहीं. तेव्हां, याहून अधिक आश्चर्यजनक असें काय

असणार? एका मनुष्यानें दुसऱ्यास मूर्ख म्हटल्याबरोबर दुसरा त्याशीं सामना करण्यास तयार होऊन त्याच्या नाकावर एक ठोंसा मारितो. काय हें शब्दसामर्थ्य! एक अत्यंत दरिद्री स्त्री शोक करीत आहे; दुसरी स्त्री तिच्याजवळ येऊन चार गोड व सौम्य शब्दांनीं तिची समजूत करिते. ह्या शब्दरूप जादूनें ती शोकग्रस्त स्त्री खाडकन् उठून उभी राहते व आपलें दुःख विसरून जाऊन स्मित करूं लागते! काय हा शब्दप्रभाव!! उच्च तत्वज्ञानाप्रमाणें सामान्य आयुष्यक्रमांतही शब्दांचें सामर्थ्य फार मोठें आहे. रात्रंदिवस ह्या शब्दशक्तीचा आपण स्वहस्तानें व्यापार करितों; पण त्याबद्दल आपल्या मनांत किंचितही विचार येत नाहीं व तत्संबंधीं आपण कांहींच विचारपूस करीत नाहीं. ह्या शक्तीच्या प्रकाराचें व सदुपयोगाचें ज्ञान करून घेणें, हाही 'कर्मयोगा'चा एक भाग आहे.

इतरांविषयीं आपलें कर्तव्य म्हटलें म्हणजे त्यांस मदत करणें, अर्थात् सर्व जगाच्या उपयोगीं पडणें, हें होय. आपण जगाच्या कल्याणाकरितां कां झटावें? वरकरणीं जगाच्या उपयोगाकरितां; पण वस्तुतः स्वतःच्याच उन्नतीकरितां. जगाच्या कल्याणार्थ नेहमीं झटावें, असा आपल्या मनांतील अत्युच्च हेतु असावा. पण, ह्या हेतूचें आपण नीट रीतीनें पृथक्करण करूं लागलों तर आपणांस असें दिसून येईल कीं, जगाला आपल्या मदतीची मुळींच जरूर नाहीं. तुम्हीं अगर मीं या जगांत जन्मास येऊन त्याचे

उपयोगीं पडावें, म्हणून परमेश्वरानें तें उत्पन्न केलें नाहीं. एका धर्मोपदेशांत मला असें वाचल्याचें स्मरतें कीं, 'हें सर्व सुंदर जग फार चांगलें आहे; कारण, इतरांच्या उपयोगीं पडण्यास तें आपणांस प्रसंग व संधि आणून देतें.' बर-पंगी, हा विचार फार सुंदर आहे; पण एका अर्थानें असा विचार करणें अत्यंत गैरशिस्त आहे. जगाला आपल्या मदतीची जरूर आहे, असें म्हणणें म्हणजे ईश्वराची निंदा करण्यासारखेंच नव्हे काय? जगांत पुष्कळ दुःखें आहेत, हें आपल्याला कबूल केलेंच पाहिजे व म्हणूनच इतरांस मदत करणें हाच काय तो आपला सर्वोत्कृष्ट हेतु असूं शकेल; तरी, इतरांचे उपयोगीं पडणें म्हणजे स्वतःलाच मदत करणें होय असें आपणांस सरतेशेवटीं आढळून येईल. मी लहान असतांना मजजवळ कांहीं पांढरे उंदीर होते. ह्यांजकरितां एक लहान पेटी करवून तिजमध्यें त्यांना फि-रण्याकरितां लहान लहान चक्रें ठेविलीं होतीं. ह्या च-क्रांच्या पलीकडे जाण्याकरितां जेव्हांजेव्हां ते उंदीर प्रयत्न करीत, तेव्हांतेव्हां चक्रें मात्र सारखीं फिरत व उंदीर जागच्या जागींच राहत. जगाची व तत्संबंधीं आपल्या मदतीची हीच स्थिति आहे. जगाच्या उपयोगीं पडल्यानें आपल्या नीतिमत्तेस चांगला व्यायाम मात्र घडतो. हें जग बरें नाहीं व वाईटही नाहीं. प्रत्येक मनुष्य आपापलें जग बनवितो. आंधळ्या मनुष्याचें जग त्याच्या समजुतीप्रमाणें थंड अगर ऊष्ण, मऊ अगर कठिण

असूं शकेल. आपण सर्वजण सुखदुःखाचे पिंड आहों. आपल्या आयुष्यांत आपणांस सुखदुःखाचे शेंकडों प्रसंग आले आहेत, व त्या त्या वेळीं हें जग दुःखमय अगर सुखप्रद असें आपणांस वाटलें. सामान्यतः तरुणांस हें जग फार उत्कृष्ट वाटतें व वृद्धांस तें अत्यंत दुःखमय भासतें. तरुणांस सर्व जन्म कंठावयाचा असतो. वृद्धांस आपले दिवस गेले असें वाटतें, ह्मणून ते कुरकुरतात. वृद्धांच्या शेंकडों इच्छा पूर्ण न झाल्यामुळें त्यांच्या मनांत त्या झग-डत असतात. त्यांना वाटतें कीं, आपली इहलोकींची इतिश्री झाली. अशी कल्पना करण्यांत तरुण व वृद्ध हे दोघेही चुकतात. हें आयुष्य बरेंही नाहीं व वाईटही नाहीं. आपल्या मनाची जशी स्थिति असेल तसें तें आपणांस दिसतें. चांगला व्यवहारदक्ष मनुष्य आयुष्यास बरेंही ह्मण-णार नाहीं व वाईटही ह्मणणार नाहीं. विस्तवाला बरेंही ह्मणतां येत नाहीं व वाईटही ह्मणतां येत नाहीं; कारण त्यापासून आपणांस ऊब मिळेते, तेव्हां आपण त्यास फार 'सुंदर' म्हणतों; पण पोळल्याबरोबर आपण त्यास दोष देऊं लागतों. हीच स्थिति आयुष्यक्रमाची आहे. ज्या-प्रमाणें आपण त्यास उपयोगांत आणावें त्याप्रमाणें आप-णांस तें बरें-वाईट दिसतें. सारांश, जग हें निर्दोष आहे; म्हणजे त्याचे सर्व हेतू परिपूर्ण होतील, अशा प्रकारेंच त्याची योजना झालेली आहे. म्हणून आपण सर्वांनीं खात्रीपूर्वक लक्षांत ठेवावें कीं, आपल्या साहायावांचून हें

जग उत्तम प्रकारें चालेल व त्यास मदत करण्याची आपण मुळींच तसदी घेऊं नये.

तत्रापि आपण सत्कार्य करीत असावें. इतरांस मदत करणें हा आपला अधिकारविशेष आहे असें जर आपण नेहमीं ध्यानांत ठेविलें तर, सत्कृत्य करण्याची इच्छा ही एक प्रचंड नीतिप्रवर्तक शक्ति आहे असें आपलें ठाम मत होईल. पांच सेंट[1] हातांत घेऊन एका उंच स्थानावर उभें राहून 'अरे भिकाऱ्या हे घे' असें न म्हणतां, तुम्ही आपल्या मनांत त्या गरीब मनुष्याचे आभार माना; कारण त्याला धर्म करण्याची संधि मिळाल्यानें तुम्हांस आपली उन्नति करून घेतां येते. दात्यास लोक दुवा देतात, ग्राहकास देत नाहींत. या जगांत तुम्हांस आपल्या परोपकारबुद्धीचा व दयाशीलतेचा उपयोग करण्यास संधि प्राप्त होऊन पवित्र व निर्दोष बनतां येतें, याबद्दल तुम्ही त्या भिकाऱ्याचे आभार मानिलेच पाहिजेत. आपलें आचरण शुद्ध व निर्दोष बनविणें, हें सर्व सत्कृत्यांचें लक्षण आहे. जास्तींत जास्ती असें आपण काय करणार? दवाखाने, रस्ते अथवा धर्मशाळा बांधणार, दुसरें काय? आपणांस २–३ लक्ष डॉलर्स मिळवून एकाद्या धर्मार्थ फंडाची योजना करितां येईल. एक लक्ष दवाखान्यांकडे लावून, दुसऱ्याचा शांपेन, मद्य व नाच (बॉल्स्) यांत फडशा उडवून, बा-

---

१. हें अमेरिकन् नाणें अर्धा पेन्स किंमतीचें आहे. याची जवळजवळ अर्धा आणा किंमत होईल.

कीच्या एका लक्षांतीलनिम्मे अधिकाऱ्यांचे भरतीस घालून, निम्मे गरिबांकरितां ठेवितां येतील! पण ह्या सर्वांचा शेवट काय होणार? एका प्रचंड वायूनें ह्या सर्व इमारती ढांसळून पडतील; मग आपण काय करणार? एका ज्वालाग्राही पर्वतांतील कोळासरसे आपले सर्व रस्ते, दवाखाने, शहरें व इमारती नामशेष होतील. म्हणून, जगाचें कल्याण करण्याची ही मूर्ख कल्पना आपण टाकून द्यावी. जग हें तुमच्या अगर माझ्या मदतीकरितां खोळंबलेलें नाहीं. तरी आपण श्रम करून नेहमीं सत्कार्य करावें; कारण त्यापासून आपल्यालाच सुखप्राप्ति आहे. आपल्यास निर्दोष बनण्याचा हाच कायतो एक मार्ग आहे. ज्या ज्या भिकाऱ्याला आपण मदत केली, तो आपलें एक कपर्दकही लागत नव्हता. आपण मात्र सर्वस्वी त्याचे ऋणी आहों; कारण त्यानें आपणांस आपली पवित्रता, दया व धार्मिकता प्रकट करण्यास संधि दिली. आपण जगाचें कल्याण केलें, किंवा करूं; अगर आपण अमुक अमुक इसमांस मदत केली असें म्हणणें अगदीं चुकीचें आहे. अशा मूर्खपणाच्या विचारांपासून आपणांस दुःख होतें. आपणांस वाटत कीं, आपण अमुक अमुक इसमास मदत केली आहे, तेव्हां त्यानें आपले आभार मानावे; व तो तसें करीत नाहीं म्हणून आपणांस दुःख होतें. आपण जें कांहीं करितों, त्याजबद्दलच्या मोबदल्याची आपण कां इच्छा करावी? ज्या मनुष्यास तुम्हीं मदत करितां त्याजबद्दल तुम्हीं कृतज्ञताबुद्धि दाखवा

व त्याला ईश्वराप्रमाणें समजा. स्वजातीयांस मदत केल्यानें परमेश्वराची आराधना होते, हा आपला मोठाच अधिकार-विशेष नाहीं काय? आपण खरोखर अनासक्त राहिलों, तर ह्या निरर्थक आशादुःखांतून आपली सुटका होईल, व मोठ्या आनंदानें ह्या जगांत आपणांस सत्कार्य करितां येईल. अनासक्त होऊन कर्माचरण केल्यावर दुःख अगर संकट कधींही प्राप्त होणार नाहीं. जगांतील सुखदुःखें मात्र अव्याहत चालूं राहतील.

एका गरीब मनुष्याला कांहीं द्रव्य पाहिजे होतें. त्याला कर्मधर्मसंयोगानें असें कळलें कीं, एकादें पिशाच (अगर राक्षस) आपण वश करून घेतलें तर आपणाला त्याजकडून द्रव्य अगर हवें तें मागवितां येईल. म्हणून, तो एक राक्षस मिळविण्याविषयीं अगदीं चिंतातुर झाला होता. राक्षस पाहून देणारा कोणी मनुष्य भेटेल तर पाहावा, अशा हेतूनें तो शोधार्थ निघाला. शेवटीं त्याला एक महाशक्तिमान् साधुपुरुष भेटला. त्याला त्यानें राक्षस पाहून देण्याविषयीं विनंति केली. साधूनें विचारिलें, 'तूं राक्षसाचें काय करणार?' त्यानें उत्तर केलें, 'माझें काम करण्याकरितां मला एक राक्षस पाहिजे. महाराज, तो कसा मिळवावा हें मला आपण कृपा करून सांगा. मला त्याची फार जरूर आहे.' साधु म्हणाला, 'ह्या भानगडींत तूं पडूं नको. घरीं जा.' दुसरे दिवशीं पुन्हां तो मनुष्य साधूकडे येऊन रडूं लागला व विनवणी करून म्हणाला, 'कसेंही करून मला

एक राक्षस द्या. मला त्याची फार जरूर आहे.' शेवटीं तो साधुपुरुष त्रासून म्हणाला, 'हा मंत्र घे, ह्या इंद्रजालाचें उच्चारण कर, म्हणजे एक राक्षस तुजकडे येईल व तूं त्याला जें जें सांगशील तें तें तो ऐकेल. पण एवढें मात्र लक्षांत ठेव कीं, हे राक्षस फार भयंकर असतात, करितां यांना नेहमीं कामांत गुंतवून ठेविलें पाहिजे. ह्या राक्षसाला तूं काम दिलें नाहींस, तर तो तुझा प्राण घेईल.' तो मनुष्य म्हणाला, 'हें फार सोपें आहे. मीं त्याला जन्मभर काम देईन.' असें म्हणून तो अरण्यांत गेला, तेथें त्यानें बराचवेळ मंत्रोच्चारण केल्यावर एक प्रचंड राक्षस त्याचे पुढें येऊन उभा राहिला व म्हणाला, 'मीं राक्षस आहें. तुझ्या मंत्रानें मीं वश झालों आहे. तूं मला सतत काम दिलें पाहिजे. ज्या क्षणीं तूं मला काम देण्याला चुकशील त्या क्षणींच मी तुझा प्राण घेईन.' हें ऐकून तो मनुष्य म्हणाला 'मला एक राजवाडा बांधून दे.' हें काम चट्दिशीं राक्षसानें पुरें केलें! नंतर त्यानें राक्षसास द्रव्य आणण्यास सांगितलें. तेंही त्यानें तेव्हांच आणून दिलें! हें झाल्यावर त्या राक्षसास त्यानें तें सर्व अरण्य कापून टाकून त्या ठिकाणीं राजमंदिर बांधण्यास सांगितलें. आज्ञा होण्याचा उशीर, कीं राक्षसानें तें सर्व संपवून टाकिलें, व आणखी कांहीं आहे काय, म्हणून विचारिलें! हें पाहून तो मनुष्य घाबरूं लागला व म्हणाला, 'आतां मी याला कोणचें काम देऊं! हा सर्व कांहीं क्षणार्धांत उरकून टाकितो.'

राक्षस म्हणाला, 'मला आणखी काम दे, नाहींतर मीं तुला खाऊन टाकीन.' त्या गरीब मनुष्याला राक्षसास काय काम द्यावें हें सुचेना व तो फारच घाबरला. तो अरण्यांतून पळत सुटला, व शेवटीं साधुपुरुषाजवळ येऊन म्हणाला, 'महाराज, आतां माझा जीव वांचवा.' साधूनें विचारिलें 'हें असें काय?' तेव्हां तो म्हणाला, 'ह्या राक्षसाला आतां कोणतेंही काम मला देतां येत नाहीं. जें जें त्याला सांगावें तें तें तो हां हां म्हणतां करून टाकितो. मीं त्याला काम न दिलें तर मला खाऊन टाकण्याची तो धमकी घालितो.' ह्या मनुष्याचें बोलणें पुरें होतें न होतें तोंच राक्षस तेथें येऊन उभा राहिला व म्हणाला 'मी तुला खाऊन टाकितों.' राक्षसानें त्या मनुष्यास गिळून टाकिलें असतें; पण त्या मनुष्यानें कांपत कांपत साधुपुरुषास आपला जीव वांचविण्याबद्दल पुन्हां विनंति केल्यावरून तो प्रसंग टळला. साधु त्या मनुष्यास म्हणाला, 'मीं तुला एक तोड सांगतों. त्या कुत्र्याचें वांकडें शेंपूट तूं आपल्या तरवारीनें कापून काढून राक्षसास सरळ करण्यासाठीं दे.' हें ऐकून त्या मनुष्यानें राक्षसास कुत्र्याचें शेंपूट कापून दिलें व त्यास तें सरळ करण्यास सांगितलें. राक्षसानें हळूच व फार काळजीपूर्वक तें नीट करण्याचा प्रयत्न केला; पण तें सोडल्याबरोबर पूर्ववत् वांकडें झालें! पुन्हां त्यानें प्रयत्न केला, पण तोही फसला! शेवटीं तिसऱ्यांदा त्यानें आपली पराकाष्ठा करून पाहिली, पण

कांहीं केल्या त्यांत त्यास यश येईना. असा क्रम त्यानें पुष्कळ दिवस चालू ठेविला व शेवटीं तो अगदीं थकून म्हणाला, 'अशा संकटांत मीं पूर्वी कधीं पडलों नाहीं. मीं ज्ञानवृद्ध राक्षस आहे, पण अशा पेंचांत आजपर्यंत सांपडलों नाहीं. तेव्हां आतां मीं एक तोड काढतों!' असें म्हणून राक्षसानें त्या मनुष्यास विनंति केली कीं, 'तूं मला सोडून दे, म्हणजे आतांपर्यंत जें जें मीं तुला दिलें आहे, तें तें सर्व तुझ्याजवळ ठेवीन व पुन्हां कधींही तुला त्रास देणार नाहीं.' त्या मनुष्यास हें ऐकून फार आनंद झाला व त्यानें राक्षसाची विनंति संतोषानें मान्य केली.

हें जग कुत्र्याच्या शेंपटाप्रमाणें वांकडें आहे. लोक आपापल्यापरी तें सरळ करण्याचा शेंकडों वर्षे प्रयत्न करीत आहेत; पण त्यांनीं सोडतांक्षणींच, तें पूर्ववत् वांकडें होतें. असें होणेंच साहजिक आहे. कोणीही अनासक्त होण्यास प्रथम शिकलें पाहिजे, म्हणजे तो वेडापीर बनणार नाहीं. जेव्हां आपली खात्री होईल कीं, हें जग कुत्र्याच्या शेंपटाप्रमाणें वांकडें असून आपण कितीही प्रयत्न केला तरी तें सरळ होत नाहीं, तेव्हां आपला माथेफिरुपणा नाहींसा होईल. जगांत भ्रांतबुद्धीचे वेडेपीर अथवा अतिश्रद्धालु लोक नानाविध आहेत; उदाहरणार्थ मद्यपान व धूम्रपान वगैरेच्या निषेधाविषयीं अतिश्रद्धालु. ह्या वर्गीतील एक तरुण स्त्री एकदां माझे पाहण्यांत आली. ही स्त्री शिकागो येथील एका संस्थेची सभासद आहे. पुष्कळ स्त्रिया मिळून ही

संस्था उभारलेली आहे. ह्या संस्थेंत कामकरी लोकांस गायन व कसरत शिकविण्यांत येते. एकदां ही तरुण स्त्री मद्यपान व धूम्रपान यांच्या दुष्ट परिणामाविषयीं मजशीं बोलतांना म्हणाली, 'हे दुष्ट परिणाम नाहींसे करण्याची मजजवळ एक युक्ति आहे.' ती काय म्हणून विचारितां, ती म्हणाली "तुम्हांला 'हॉल हाऊस्' (वरील संस्थेचें नांव) माहीत नाहीं काय?" तिच्या म्हणण्याचें तात्पर्य असें कीं, ही संस्था म्हणजे सर्व मानवी संकटांचें निवारण करणारा त्रैलोक्यचिंतामणीच आहे! हिंदुस्थानांतील कित्येक वेडेपीरांना असें वाटतें कीं, एका स्त्रीस दोनतीनदां लग्न करण्याची मोकळीक असली म्हणजे त्यापासून सर्व संकटांचा परिहार होईल. हा सर्व माथेफिरुपणा आहे, व शहाणे लोक असे भ्रांतबुद्धि कधींही बनणार नाहींत. अशा वेडेपिरांच्या हातून खरें काम कांहींच होत नाहीं. जगांत असें अतिश्रद्धालुत्व नसेल तर हल्लींपेक्षां जगाची प्रगति अधिक होईल. अशा वेडानें मानवी प्रगतीस मदत होते, असें मानणें केवळ मूर्खपण होय. अशा समजुतींनीं आपली पिछेहाट होते, कारण त्यामुळें रागद्वेषादिकांस भरतें येऊन आपसांत लढा सुरू होतो व एकमेकांविषयीं कळकळ राहत नाहीं. आपणांस असें वाटतें कीं, आपणांजवळ जें जें आहे व जें जें आपण करितों तेंच जगांत सर्वोत्कृष्ट आहे; व जें आपणांजवळ नाहीं व आपण करीत नाहीं तें सर्व कुचकामाचें आहे. म्हणून, तुम्हीं वेडेपीर बनण्याच्या बेतांत

याल तेव्हां, नेहमीं कुत्र्याच्या वांकड्या शेंपटाची आठवण ठेवा. जगासंबंधाची काळजी वाहून तुम्हीं आपल्यास त्रास करून घेऊं नका. तुमच्या मदतीशिवाय तें उत्तम प्रकारें चालेल. परमेश्वर हा जगन्नियंता व जगाचा त्राता आहे. पान व धूम्रपान यांच्या निषेधाविषयीं फाजील कळकळ बाळगणारांच्या व स्त्रियांनीं दोन तीन लग्नें करावीं असें कंठशोष करून प्रतिपादन करणारांच्या मदतीवांचून तो सगळ्या जगाची काळजी वाहील. हें वेड तुमच्या डोक्यांतून गेलें तरच तुमच्या हातून चांगलें काम होईल. ज्या मनुष्याची वृत्ति सर्वांविषयीं समान आहे, ज्याचा स्वभाव शांत आहे, ज्याचे विचार उत्तम आहेत, जो तापट नाहीं, ज्याचे मनांत फार प्रेम व कळकळ आहे, त्या मनुष्याचे हातून चांगलें काम होऊन तो स्वतःचेंही कल्याण करून घेईल. भ्रांतबुद्धीचा मनुष्य मूर्ख असून त्याचें मनांत मुळींच कळकळ नसते. त्याजपासून जगासही सरळपणा यावयाचा नाहीं व तो स्वतःही शुद्ध व निर्दोष बनणार नाहीं.

ह्या देशांत (अमेरिकेंत) 'प्युरिटन'[1] लोक 'मे-फ्लॉवर' नांवाच्या जहाजांतून कसे आले हें तुम्हांस आपल्या इति-

---

१. इंग्लंडचा राजा ६ वा एडवर्ड सिंहासनारूढ होण्यापूर्वीं ह्या लोकांचा स्वतंत्र पंथ होता; पण एलिझाबेथ राणीच्या कारकीर्दींत हे लोक उदयास आले. पुढें त्यांचे 'इंडिपेन्डन्टस्' व 'प्रेस्बिटेरिअन्स्' असे दोन पंथ होऊन, पहिल्या पंथाचे लोक क्रॉमवेलच्या अंमलांत सत्ताधीश बनले.

हासावरून आठवतें काय? प्रथमतः हे लोक फार चांगले असून यांचें आचरण शुद्ध होतें; पण लवकरच ते इतरांस छळूं लागले. मनुष्यजातीच्या इतिहासांत सर्वत्र असाच प्रकार आहे; जे लोक छळाला भिऊन पळतात, तेच स्वतःला चांगले दिवस आले म्हणजे दुसऱ्यास छळूं लागतात. मीं दोन विलक्षण जहाजांविषयीं हकीकत वाचली आहे. एक 'नोहाचें आर्क' व दुसरें 'मे-फ्लॉवर'. यॆहुदी लोकांचा असा समज आहे कीं, सर्व सृष्टि 'नोहाच्या आर्क' मधून उत्पन्न झाली. त्याचप्रमाणें अमेरिकन् लोकांस वाटतें कीं, 'मे-फ्लॉवर' जहाजांतून जवळ जवळ अर्धें जग बाहेर पडलें. "माझे आजोबा अगर पणजोबा 'मे-फ्लॉवर' जहाजांतून आले आहेत" असें न ह्मणणारा मनुष्य मला ह्या देशांत क्वचितच आढळतो. हाही एक प्रकारचा वेडगळपणाच आहे. शेंकडा ९९ हिश्शांनीं हे वेडेपीर अ-

१. ख्रिस्ती धर्मशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें जलप्रलय होऊन सर्व पृथ्वी बुडाली, त्यावेळीं ह्या जहाजांतील प्राणी काय ते बचावले. प्रलयसमयीं हें जहाज पाण्यावर तरंगून राहिलें होतें.

२. हे लोक फार पुरातन आहेत. ह्यांस प्रथमतः फ्रेंच लोकांनीं इतर नागरिकांप्रमाणें सर्व हक्क दिले. ह्यांना सन १८५८ पासून पार्लमेंटांत शिरकाव झाला. इंग्लंडचे मुख्य प्रधान व ग्लॅडस्टन साहेबांचे प्रतिस्पर्धी लॉर्ड बीकॉन्सफील्ड (डिझ्राइली) हे यहुदी होते. अर्वाचीनकाळीं ह्या लोकांत स्पिनोझा, शूबर्ट, वगैरे बरेच नामांकित पुरुष होऊन गेले. सर्व जगांत ह्या धर्माच्या लोकांची संख्या १ कोट आहे.

जीर्ण, पित्ताशयाचा विकार अगर अशाच प्रकारच्या इतर रोगांनीं ग्रस्त झालेले असतात. कांहीं दिवसांनीं माथेफिरू-पणा हा एक रोग आहे, असें वैद्यही म्हणूं लागतील. मीं हा रोग फार पाहिला आहे. परमेश्वर मला त्यापासून दूर ठेवो !

माझ्या ह्या एकंदर अनुभवाचें सार असें आहे कीं, सर्व प्रकारच्या वेडगळ सुधारणांपासून आपण अलिप्त राहवें. मद्यपाननिषेधाविषयीं अतिश्रद्धालुत्व दाखविणारे लोक मद्यपानानें धुंद होणाऱ्या आपल्या गरीब बांधवांवर प्रेम करीत असतील असें तुम्हांस वाटतें काय ? वेडेपीर तर ते वेडेपीरच, कारण त्यांना अशा वेडगळपणापासून स्वतःकरितां कांहींतरी मिळविण्याची अपेक्षा असते. लढाईसंपतांच लुटीची हांव करणाऱ्या लोकांप्रमाणेंच यांचें वर्तन असतें. ह्या माथेफिरू मंडळीच्या कंपूबाहेर राहूनच तुम्हांस खरें प्रेम व खरी कळकळ यांचें ज्ञान करून घेतां येईल. अशा रीतीनें तुम्हीं अलिप्त राहिलां म्हणजे मद्यपी मनुष्याविषयीं तुम्हांस कळवळा येऊन तोही आपल्याप्रमा-णेंच एक मनुष्य आहे, असें तुम्हांस वाटूं लागण्याचा संभव आहे. ज्या कारणांनीं तो मनुष्य अधोगतीस चा-लला आहे, त्या कारणाचें तुम्हांस ज्ञान होऊन, असें वाटूं लागेल कीं, आपण त्याचे जागीं असतों तर कदाचित् आत्महत्या केली असती. मला अद्याप आठवतें कीं, एक स्त्री आपल्या नवऱ्याच्या मद्यपानाविषयीं नेहमीं मजजवळ

येऊन गाऱ्हाणें सांगे; पण माझी अशी खात्री आहे कीं, स्त्रियाच बहुतांशीं आपल्या पतीस मद्यपी बनवितात. माझें काम, सत्य असेल तें सांगावयाचें आहे. मला कोणाचीही हांजीहांजी करावयाची नाहीं. ज्या बेताल स्त्रियांच्या मनांतून 'सोसणें' व 'गम खाणें' हे शब्द कायमचे नाहींसे झाले आहेत, ज्यांना स्वातंत्र्याच्या खोट्या कल्पनांमुळें पुरुषांस आपल्या ताटाखालचें मांजर करून ठेवावेसें वाटतें, व ज्या, त्यांना न रुचेल असें भाषण पुरुषांनीं केल्याबरोबर रडून ओरडून अकांडतांडव करितात, त्या जगास कलंक लावणाऱ्या स्त्रिया समजाव्या. अशा स्त्रियांमुळें जगांतील निम्मे लोक आत्महत्या करीत नाहींत, हें आश्चर्यच होय! अर्धपोटीं राहणारे उपदेशक (भटजी) अशा स्त्रियांच्या बाजूनें असतात. ते ह्मणतात, 'बाई, आपल्यासारख्या उत्तम स्त्रिया क्वचित्च आढळतील!' ह्या स्त्रिया त्यांस आपले उपाध्याय समजून द्रव्य व इतर वस्तू देतात. अशा प्रकारें जग चाललें आहे. आयुष्य अशा प्रकारची थट्टा नव्हे; त्यांत कांहीं भारदस्तपणा आहे.

आतां आपण आजच्या व्याख्यानांतील मुख्य मुद्दे ध्यानांत ठेवा. प्रथम आपण असें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, आपण सर्वजण जगाचे ऋणी आहों; जग आपलें ऋणी नाहीं. जगाकरितां आपल्याला वाटेल तें करण्याची मोकळीक असते, हा आपला अधिकारविशेष आहे. जगास मदत करून आपण आपलाच फायदा करून घेतों. ध्या-

नांत ठेवण्यासारखी दुसरी गोष्ट अशी कीं, ह्या विश्वांत ईश्वराचें अस्तित्व सदैव आहे. तुमच्या अगर माझ्या मदतीची अपेक्षा धरून हें जग चाललें आहे असें ह्मणणें चुकीचें आहे. ईश्वर अनंत आहे. तो सदोदित कार्यव्यापृत असतो. त्याच्या सावध-पणास तर सीमाच नाहीं. सर्व विश्व झोंप घेतें, त्यावेळीं ईश्वर जागृत असतो.* तो सतत उद्योग करीत असतो. ज-गांतील सर्व घडामोडी व स्वरूपें त्याचींच आहेत. तिसरी मुद्याची गोष्ट अशी कीं, आपण कोणाचाही द्वेष करूं नये. ह्या जगांत बऱ्यावाईटाचें मिश्रण नेहमीं असाव-याचेंच. दुर्बलांची व दुष्कर्म करणारांची आपण दया करावी, हें आपलें कर्तव्य आहे. जग ह्मणजे नीतीचा एक प्रचंड आखाडा आहे. त्यांत कसरत करून आपणांस अध्यात्मविद्येंत अधिकाधिक पारंगत झालें पाहिजे. चवथी गोष्ट अशी कीं, आपण कोणत्याही प्रकारें माथेफिरू बनूं नयें; कारण माथेफिरुपणा हा प्रेमाच्या अगदीं विरुद्ध आहे. माथेफिरू लोक मोठ्या वाक्चापल्यानें ह्मणतात कीं,

---

* श्रीमद्भगवद्गीतेंत ह्मटलें आहे कीं,

या निशा सर्व भूतानां तस्यां जागर्ति संयमी।
यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः॥

—अ. २, ६९.

मुनीश्वरासंबंधानें जें हें ह्मटलें आहे तेंच परमेश्वरास लागू पडतें; ह्मणजे प्राणिमात्र झोंपेंत असतांना ईश्वर जागृत असतो व ते जागे असतांना तो झोंप घेतो. स्थिरबुद्धि पुरुषांचेंही हेंच लक्षण आहे.

'आम्हीं पापाचा द्वेष करितों. पाप करणाराचा द्वेष करीत नाहीं.' पण, पाप आणि पापी यांजमध्यें भेद दाखविणाऱ्या गृहस्थाचें दर्शन घेण्याकरितां मीं वाटेल तितकें लांब जाण्यास तयार आहें. असें ह्मणणें फार सोपें आहे. पदार्थ व त्यांचे गुणधर्म यांमधील भेद आपणांस चांगल्या रीतीनें दाखवितां येईल, तर, आपण सर्वस्वी परिपूर्ण बनूं. हें फ़ार सोपें नाहीं. शेंवटीं इतकेंच सांगतों कीं, आपण जितके शांत असूं व आपल्या शरीरांत जितकी गडबड कमी असेल तितकें आपलें प्रेम अधिक वाढेल व आपल्या हातून अधिक चांगलें काम होईल.



# प्रकरण ६ वें.

## अनासक्ति आत्मपरित्यागाची परिपूर्णता आहे.¶



आपल्या प्रत्येक कृत्याची प्रतिक्रिया ज्याप्रमाणें आपणांवर होते, त्याप्रमाणेंच ती इतरांवर होत असेल व इतरांच्या कृत्याची प्रतिक्रिया आपणांवर होत असेल. कदाचित् तुह्मां सर्वांच्या लक्षांत ही गोष्ट आली असेल कीं, मनुष्य वाईट कृत्य करूं लागला ह्मणजे तो अधिकाधिक वाईट होतो, व तो सत्कृत्य करूं लागला

¶ आत्मपरित्याग ह्मणजे आपलेपणा टाकून देणें, अथवा स्वतःला विसरणें. ही आपलेपणा विसरून जाण्याची स्थिति प्राप्त होण्यास पूर्णपणें इंद्रियनिग्रह अथवा आत्मसंयमन झालें पाहिजे. ही परिपूर्ण स्थिति ह्मणजेच अनासक्ति (निरिच्छपणा) होय. ही अनासक्ति कर्मयोगाचें आदितत्व होय. हेंच सगळ्या कर्मयोगाचें इंगित आहे. हीच साधण्याकरितां श्रीकृष्णानें अर्जुनास सांगितलें कीं,

यस्त्विंद्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन ।
कर्मेंद्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥

—श्रीमद्भगवद्गीता अ. ३, ७.

ह्मणजे जो मनानें इंद्रियनिग्रह करून कर्मेंद्रियांनीं कर्माचरण करितो, तो निष्काम पुरुष सर्वश्रेष्ठ होय. वरील श्लोकाचें ज्ञानेश्वरींतील निरूपण अवश्य वाचावें.

म्हणजे दिवसेंदिवस त्याचें सामर्थ्य वाढून सदोदित सत्कार्यच करण्यास तो शिकतो. कर्माच्या प्रभावाच्या ह्या उत्कर्षाचें कारण म्हटलें म्हणजे परस्परांवरील क्रिया व प्रतिक्रियाच होत. याशिवाय दुसरें कोणतेंही कारण दिसत नाहीं. ह्या गोष्टीच्या स्पष्टीकरणार्थ आपण पदार्थविज्ञानशास्त्रांतील एक उदाहरण घेऊं:—मीं अमुक एक कृत्य करीत असतों, त्यावेळीं माझ्या मनांत कांहीं विशिष्ट तरंग येतात. ज्या मनांची स्थिति माझ्या मनासारखीच असेल, त्या सर्वांवर माझ्या मनाचा परिणाम होईल. त्याचप्रमाणें निरनिराळीं तंतुवाद्यें एकाच खोलींत व एकाच सुरांत लावून ठेविलीं, तर, एका वाद्याच्या तारांस स्पर्श करतांच त्यांतून जो स्वर निघेल, तोच स्वर आंदोलनानें इतर वाद्यांतून निघेल, असें आपणां सर्वांस दिसून येईल. हा जो दृष्टांत सांगितला, यांत सर्व वाद्यें सारखींच लावलेलीं असून त्यांवर एकाच आघाताचा सारखा परिणाम झाला. ह्याच विचारसरणीनें असें ह्मणतां येईल कीं, ज्या सर्व मनांत सारखेच तरंग अथवा विचारलहरी असतात, त्यांवर एकाच विचाराचा सारखा परिणाम होईल. आतां हें मात्र उघड आहे कीं, अंतराच्या व इतर कारणांनीं हा परिणाम कमजास्ती होईल; पण असा परिणाम घडण्यास मन मात्र सदोदित तयार असेल. कल्पना करा कीं, मी एक वाईट कृत्य करीत आहें व माझ्या मनांत विशिष्ट प्रकारचे तरंग आहेत, आणि विश्वांतील जीं सर्व मनें ह्याच

स्थितींत असतील त्यांवर माझ्या मनाच्या आंदोलनानें परिणाम होण्याचा संभव आहे. ह्याच न्यायानें मीं सत्कृत्य करीत असतांना माझ्या मनांत जे तरंग असतील तेच ज्या मनांत असतील, त्या सर्वांवर माझ्या मनाच्या तरंगाचा परिणाम झालाच पाहिजे. एका मनाचा दुसऱ्या मनावर परिणाम होण्याचा हा प्रभाव मनामनांतील कमजास्त तीव्रतेप्रमाणें कमीजास्ती होतो.

हेंच सादृश्य घेऊन असें स्पष्ट ह्मणतां येईल कीं, ज्याप्रमाणें प्रकाशलहरी कोणत्याही पदार्थाप्रत पोंचण्यापूर्वी लक्षावधि वर्षें मार्गक्रमण करीत असतील, त्याचप्रमाणें विचारलहरींनांही आपणांशीं एकतान होणारा पदार्थ मिळेपर्यंत शेंकडों वर्षें लागतील. म्हणून आपल्या सभोंवतालचें वातावरण बऱ्या आणि वाईट विचारांच्या अशा प्रकारच्या गतींनीं ( आघातांनीं ) भरलेलें असणें फारच संभवनीय दिसतें. प्रत्येक मनुष्याच्या मेंदूंतून बाहेर पडणाऱ्या प्रत्येक विचाराची अनुरूप पदार्थाशीं गांठ पडेपर्यंत तो विचार जणुं काय आघातयुक्त गतीनेंच भ्रमण करीत राहील. ह्या आघातांचें ग्रहण करण्यास जें मन उत्कंठित असेल, तें त्यांचें तत्क्षणींच ग्रहण करील. यावरून असें सिद्ध होतें कीं, मनुष्य वाईट कृत्यें करूं लागला ह्मणजे त्याच्या मनाला जो एक प्रकारचा ताण बसतो तितकाच ताण वातावरणांतील ज्या लहरींत असेल त्या सर्व लहरी त्याच्या मनांत प्रवेश करण्याकरितां झगडतील. दुष्कर्म

करणारा मनुष्य दिवसेंदिवस दुष्कर्मांत आपलें पाऊल पुढें टाकीत जातो, ह्याचें कारण तरी हेंच आहे. ह्या कारणानें त्याचीं दुष्कृत्यें बळावत जातात. सत्कृत्य करणारासही हाच नियम लागू पडतो. तो सत्कर्म करूं लागला म्हणजे वातावरणांतील सर्व सुविचारलहरींचें ग्रहण करील व त्या योगानें त्याच्या सत्कर्मांस बळकटी येईल. म्हणून, दुष्कर्म करण्यांत दोन प्रकारचें भय आहे; एक तर आपण सभोंवतालचे सर्व दुष्परिणाम ग्रहण करण्यास आपलें मन प्रवृत्त करितों; दुसरें, आपल्या दुष्कर्मानें इतरांवर वाईट परिणाम होतो. आजपासून शेंकडों वर्षांनींही आपल्या दुष्कृत्यांचा परिणाम होणें शक्य आहे. वाईट कृत्यें करून आपण आपली व इतरांची हानि करितों. सत्कर्मानें आपण स्वतःचें व इतरांचें कल्याण करितों. ह्या दुष्कर्माच्या व सत्कर्माच्या दोन्ही शक्तींस, इतर मानवी शक्तींप्रमाणें, बाहेरूनही पुष्टि मिळते.

'कर्मयोगा' प्रमाणें, कोणत्याही मनुष्यानें केलेल्या कृत्याचा तें फलद्रूप होईपर्यंत नाश होत नाहीं. तें फलद्रूप न होऊं देणारी विश्वांत एकही शक्ति नाहीं. मला आपल्या दुष्कर्माचें फल भोगलेंच पाहिजे; विश्वांतील कोणतीही शक्ति त्याचा प्रतिकार करूं शकणार नाहीं. त्याचप्रमाणें माझ्या सत्कर्माबद्दल मला चांगलें फळ मिळालेंच पाहिजे. तसें न होऊं देणारी एकही शक्ति या जगांत नाहीं. कारणापासून कार्य निष्पन्न झालें पाहिजे; त्याचा

प्रतिबंध कशानेंही होणार नाहीं. असो आतां आपण 'कर्मयोगां'तील फार सुंदर व अत्यंत विचारणीय भागाकडे वळूं. या भागांत असें सांगितलें आहे कीं, आपल्या बऱ्यावाईट सर्व कृत्यांचा एकमेकांशीं दृढ संबंध आहे. अमुक एक कृत्य सर्वांशीं चांगलें आहे व अमुक एक सर्वतोपरि वाईट आहे, असा परिच्छेद आपणास करितां यावयाचा नाहीं. असें एकही कृत्य नाहीं कीं, ज्यापासून एकाच वेळीं बरें व वाईट निष्पन्न होणार नाहीं. ह्याच्या स्पष्टीकरणार्थ आपण एक जवळचें उदाहरण घेऊं:–मी तुह्मांसमोर बोलत उभा आहे. तुम्हांपैकीं कित्येकांना वाटत असेल कीं, मी चांगलें कृत्य करीत आहे; पण याच वेळीं माझ्या बोलण्यानें वातावरणांतील सहस्रावधि सूक्ष्मजंतू मरत असतील. म्हणजे, मी दुसऱ्या कोणास तरी अपकार करीत असेन. सर्वस्वी चांगलें अगर सर्वांशीं वाईट असें एकही मानवी कृत्य असूं शकणार नाहीं. कोणतेंही कृत्य आपल्या समीप असून त्याचा आपल्या माहितींतल्या पदार्थांवर सुपरिणाम घडत असला ह्मणजे तें कृत्य चांगलें आहे असें आपण समजतों. उदाहरणार्थ, माझें बोलणें तुह्मांला चांगलें वाटेल; पण सूक्ष्मजंतूंना तें तसें वाटणार नाहीं. आपण एकमेकांस दिसतों, पण हे अति सूक्ष्म जंतू आपणांस दिसत नाहींत. माझ्या भाषणाचा तुह्मांवर काय परिणाम होतो हें तुह्मांस उघड दिसतें; पण त्याचा सूक्ष्म जंतूंवर होणारा परिणाम तुह्मांस कळत नाहीं. त्याचप्रमाणें

आपल्या दुष्कृत्यांचेंही पृथक्करण केलें तर आपणांस असें दिसून येईल कीं, त्यांपासूनही कोठेंतरी थोडाबहुत चांगला परिणाम होत असेल. ह्मणून, ' ज्याला सत्कृत्यांत कांहीं तरी वाईट आहे असें दिसतें व दुष्कर्मांत कोठें तरी थोडासा चांगुलपणा दिसतो, त्यालाच काम करण्याची गुरुकिल्ली समजली ' असें ह्मटलें पाहिजे.

ह्यापासून हेंच निष्पन्न होतें कीं, आपण कितीही प्रयत्न केला तरी कोणतेंही कृत्य पूर्णपणें शुद्ध व पूर्णपणें अशुद्ध होऊं शकणार नाहीं. ( येथें शुद्धपणा व अशुद्धपणा ह्या शब्दांचा अनुक्रमें ' अनपकार ' व ' अपकार ' या अर्थानें उपयोग करावयाचा आहे. ) इतरांस अपकार झाल्याशिवाय आपल्याला श्वासोश्वास करतां यावयाचा नाहीं, व आपली जीवनक्रियाही चालावयाची नाहीं. आपण जें अन्न खातों त्याचा प्रत्येक घास दुसऱ्याच्या तोंडचा काढून घेतलेला असतो. आपल्या जीवितानें इतरांच्या जीवितास अडचण झाली आहे. ' श्रीमद्भगवद्गीतें 'तही असेंच ह्मटलें आहे. मनुष्य, प्राणी अगर अत्यंत सूक्ष्म जंत यांपैकीं कोणास तरी अडचण केल्याशिवाय आपलें राहणें अशक्य आहे. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें कोणत्याही कृत्यांत परिपूर्ण निरुपद्रवी निर्दोषता संपादन न करितां येणें अगदीं स्वाभाविक आहे. आपण अनंतकालपर्यंत काम केलें तरी, ह्या गूढ भुलभुळावणींतून आपणांस पार पडतां यावयाचें नाहीं. आपण सतत कर्माचरण करीत राहिलों

तरी कर्मफलांत चांगलें व वाईट यांच्या अपरिहार्य संगतीचा कधींही शेवट व्हावयाचा नाहीं.

दुसरा विचार करण्यासारखा मुद्दा ह्मटला ह्मणजे 'कर्माचा शेवट काय ?' हा होय. प्रत्येक देशांतील बहुतेक लोकांस वाटतें कीं, या जगांतून रोग, मरण, दुःख अथवा दुष्टपणा अजिबात नाहींसा होऊन तें निर्दोष बनण्याचा समय कधींतरी येईल. ही कल्पना फार चांगली आहे. अज्ञानांची उन्नत्ति करून त्यांस प्रोत्साहन देणारी ही एक चांगली प्रवर्तक शक्ति आहे. पण आपण एक क्षणभर विचार केला तर आपणांस उघडपणें असें दिसून येईल कीं, असें होणें शक्य नाहीं. बरें आणि वाईट ह्या, एकाच नाण्याच्या उलटसुलट बाजू असल्यामुळें, असें होईल तरी कसें ? वाईटाच्या अभावीं चांगलें कोठून असणार ? निर्दोषता अथवा परिपूर्णता ह्मणजे काय ? निर्दोष आयुष्यक्रम ही बहुतांशीं विरोधोक्तिच आहे. आयुष्य ह्मणजे आपण आणि बाह्यसृष्टि यांमधील सततची झटापट होय. आपण प्रतिक्षणीं बाह्यसृष्टीशीं खरोखरच झगडत असतों; ह्या झटापटींत आपला पराभव झाला कीं, आपली आयुष्यमर्यादा संपते! तात्पर्य, अन्नोदक आणि हवा यांजकरितां नेहमीं झगडणें हेंच आपलें जीवित आहे. हवा आणि अन्न आपणांस न मिळालें तर आपलें देहावसान होतें! आयुष्य हा साधा, गुळगुळीत व प्रवाही पदार्थ नाहीं; तो संमिश्र आहे. अंतरात्मा व बाह्यसृष्टि यांमधील विषम

झटापटीसच आयुष्य असें ह्मणतात. यावरून हें उघड दिसतें कीं, हें झगडणें संपतांक्षणींच आपल्या आयुष्याचा शेवट होईल.

जें सुख प्राप्त झाल्याबरोबर हा सर्व खटाटोप, हें झगडणें, निर्मूल होईल, तेंच परमसुख होय. पण असें झालें ह्मणजे, वर सांगितल्याप्रमाणें आयुष्यही संपेल. दुसरें असें कीं, ह्या परमसुखाचा एक सहस्रांशही आपणांस मिळण्यापूर्वी ही पृथ्वी बरीच थंड होईल व आपण आहों तसेच राहं. ह्मणून, हें सहस्रसंवत्सर इतरत्र असलें तरी या जगांत नाहीं हें खास. जगास हातभार लावल्यानें आपण आपलीच उन्नति करून घेतों, हें आतां आपणां सर्वांस कळलेंच आहे. इतरांचें कल्याण करण्याच्या सतत प्रयत्नानें आपणांस स्वतःचें विस्मरण होतें. या जन्मांत आपणांस ह्या आत्म–विस्मरणाचा धडा शिकला पाहिजे. मनुष्यमात्राची अशी वेडगळ समजूत असते कीं, आपण स्वतःला सुखी करूं शकूं; पण कित्येक वर्षें झगडल्यावर त्यास शेवटीं कळून येतें कीं, आपल्या स्वार्थपरायणतेची आहुति दिल्याशिवाय आपणांस खरें सुख प्राप्त व्हावयाचें नाहीं व आपलें सुख आपल्याच हातीं आहे. प्रत्येक धर्मकृत्य, प्रत्येक कळकळीचा विचार, कोणत्याही प्रकारची मदत व प्रत्येक सत्कर्म ह्यांमुळें, आत्ममहती पुष्कळच कमी होऊन, आपण सर्वांहून कमी दरजाचे व कनिष्ठ आहों असें आपणांस वाटूं लागतें. ह्मणून हीं सर्व कृत्यें फार चांगलीं आहेत.

ह्या ठिकाणीं ज्ञान, भक्ति आणि कर्म या त्रयींचें ऐक्य होतें. ' शाश्वत आणि संपूर्ण इंद्रियनिग्रह ' हीच सर्वोत्कृष्ट कल्पना होय; ह्या इंद्रियनिग्रहानें, ह्या आत्मपरित्यागानें 'मी'स फांटा मिळून जिकडे तिकडे 'तूं'च होऊन जातें. ही गोष्ट मनुष्यास कळो अगर न कळो, कर्मयोगानें असा परिणाम झालाच पाहिजे. धर्मोपदेशक अव्यक्त (निराकार) परमेश्वराच्या नुसत्या कल्पनेनें घाबरून जाईल; साकार परमेश्वराबद्दल हट्ट धरून आपली सरूपता आणि व्यक्तिता कायम ठेवण्याची तो इच्छा दर्शवील; मग त्याच्या मनानें ह्या गोष्टीचा वाटेल तो अर्थ होवो. पण, आचारनीति-विषयीं त्याचे विचार खरोखरच चांगले असले, तर, त्या विचारांची इमारत सर्वश्रेष्ठ आत्मसंयमनाच्या पायावरच उभारलेली असायाचची. आत्मसंयमन अथवा इंद्रियनिग्रह हा सर्व प्रकारच्या नीतींचा पाया आहे. हा नियम मनुष्य, प्राणी व देवदूत यांस सारखाच लागू पडतो. हें एकच आदितत्व, ही एकच आधार—कल्पना, सर्व प्रकारच्या आचारनीतिशास्त्रांत आपल्या दृष्टीस पडेल.

या जगांत मनुष्याचे नानाविध वर्ग तुम्हांस दिसून येतील. पहिला वर्ग ईश्वरी (अवतारी) पुरुषांचा. ह्यांचा इंद्रियनिग्रह परिपूर्ण असून हे आपल्या जीविताची आहुति देऊनही इतरांच्या कल्याणाकरितांच झटतात. हेच परम सत्पुरुष होत. असे १०० लोक ज्या देशांत असतील त्या देशास हताश होण्याची जरूर नाहीं; पण दुर्दैवानें

असे लोक फारच थोडे सांपडतात. दुसऱ्या वर्गांतील लोकही चांगले; पण ते आपल्या जिवावर येऊन बेतली नाहीं तोंपर्यंतच परकल्याणार्थ झटतात. तिसऱ्या वर्गां- तील लोक राक्षसी असतात. ते स्वार्थ साधून इतरांस पीडा करतात. एका संस्कृत कवीनें* ह्मटल्याप्रमाणें एक चवथा वर्ग आहे. ह्यास नांवच देतां येत नाहीं. ह्या वर्गांतील लोक केवळ पीडा करण्याच्याच हेतुनें इतरांस छळितात. अस्तित्वाच्या एका धृवाशीं ज्याप्रमाणें सत्कार्य करण्याच्या हेतुनेंच सत्कर्म करणारे महासज्जन पुरुष अस-

* ह्या कवि 'नीति', 'शृंगार' व 'वैराग्य' या तीन 'शत- कां'चा कर्ता भर्तृहरी होय. ह्या कवीचा वरील आशयाचा श्लोक खालीं लिहिल्याप्रमाणें आहे:—

एके सत्पुरुषाः परार्थघटकाः स्वार्थान्परित्यज्य ये।
सामान्यास्तु परार्थमुद्यमभृतः स्वार्थाविरोधेन ये॥
तेऽमी मानवराक्षसाः परहितं स्वार्थाय निघ्नन्ति ये।
ये तु घ्नन्ति निरर्थकं परहितं ते के न जानीमहे॥

नीतिशतक, श्लोक ७४.

ह्याची वामन पंडितकृत समश्लोकी असावी तितकी चांगली न- सल्यामुळें मराठी वाचकांकरितां त्याऐवजीं खालीं लिहिलेला श्लोक देतों:—

स्वार्था त्यागुनि साधिती परहिता त्यां बोलती सज्जन
स्वार्था साधुनियां परार्थ करिती सामान्य की ते जन।
स्वार्थालागिं परार्थनाश करिती ते राक्षसी दुर्जन
वायां जे करिती परार्थहनना ते कोण? त्यां नाम न!!॥

तात, त्याचप्रमाणें दुसऱ्या धूवाशीं पीडा करण्याच्या हेतुनेंच पीडा करणारे दुर्जनही असतात. ह्या दुर्जनांना असें करण्यापासून कांहीं फलप्राप्ति नसते, पण दुष्कर्म करणें हा त्यांचा अंगस्वभावच बनलेला असतो. ह्यावरून आपल्या कवीच्या ह्मणण्याप्रमाणें, असें उघड होतें कीं, पराकाष्ठेचा आत्मपरित्याग करणारा ह्मणजे परोपकारार्थ स्वतःची आहुति देणारा पुरुष खरोखरच महात्मा समजला पाहिजे.

संस्कृत भाषेंत 'प्रवृत्ति' व 'निवृत्ति' असे दोन शब्द आहेत. पहिल्याचा अर्थ अमुक गोष्टी 'कडे कल (गति) असणें' व दुसऱ्याचा अमुक गोष्टी 'पासून पलीकडे (दूर) जाणें' अथवा परावृत्त होणें, असा आहे. पहिलें ह्मणजे 'मीं आणि माझें' अथवा ज्याला आपण जग म्हणतों तें होय. ह्यांत आपलेपणाला अथवा 'ममत्वाला' भर घालणाऱ्या द्रव्य, सत्ता, नांव आणि कीर्ति यांचा, व बुद्धीनें आकलन करितां येण्यासारख्या सर्व पदार्थांचा समावेश होतो. 'अहं (मीं) ह्या मध्यांत सर्व कांहीं नेऊन सांठविण्याकडे ह्या सर्व पदार्थांचा कल असतो. प्रत्येक मानवी प्राण्याची हीच नैसर्गिक मनःप्रवृत्ति असते; ह्मणजे प्रत्येक मनुष्य चोहोंकडून प्रत्येक वस्तु घेऊन तीं एका केंद्राभोंवतीं सांठवून ठेवतो. हा केंद्र ह्मणजे मनुष्याचें प्रिय स्वत्व (आपलेपणा) होय. ही मनःप्रवृत्ति कमी होत होत वरील पदार्थांपासून आपण दूर राहून 'निवृत्ति' मार्गाचें अवलंबन करूं लागलों, ह्मणजे, आपल्या धर्मास व नीतीस

प्रारंभ होतो. 'प्रवृत्ति' व 'निवृत्ति' हे कर्माचेच दोन प्रकार आहेत; पहिलें दुष्कर्म व दुसरें सत्कर्म होय. निवृत्ति हा सर्व नीतींचा व सर्व धर्मांचा मूळ पाया आहे; व ह्याची परिपूर्णता, पूर्णत्वानें आत्मपरित्याग करण्यांत, ह्मणजे, इतरांकरितां आपल्या मनाची, देहाची व सर्वस्वाची आहुति देण्यास तयार असण्यांतच आहे. मनुष्य ह्या स्थितीप्रत पोंचला, कीं त्यानें 'कर्म-योगां'त परिपूर्णता संपादिलीच. सत्कर्मांचें सर्वांत श्रेष्ठ फल हेंच आहे. मनुष्यानें कोणत्याही तत्वज्ञानाचा अभ्यास न केला, तो नास्तिक असला अथवा तो जन्मभर नास्तिक आहे, व त्यानें सर्व जन्मांत एकदांही परमेश्वराची प्रार्थना केली नाहीं, तरी, नुसत्या सत्कृत्यांनीं तो आपलें जीवित व सर्वस्व यांचा त्याग करण्याच्या स्थितीप्रत पोंचला असेल तर जें स्थान धार्मिकास आपल्या प्रार्थनांनीं (भक्तीनें) व तत्वज्ञास आपल्या ज्ञानानें प्राप्त होईल, तेंच सत्कर्मांनीं ह्यासही मिळेल; व तुह्मांस असें आढळून येईल कीं, कर्माचरण करणारा, भक्तीनें परमेश्वरास आकळणारा व तत्वज्ञ हे तिघे आत्मपरित्यागरूपी शिखरावर एकत्र होतात. एकमेकांच्या तत्वज्ञानांत अगर धर्मांत कितीही फरक असला तरी, सर्व मनुष्यप्राणी इतरांकरितां प्राणत्याग करण्यास तयार होणाऱ्या मनुष्यापुढें पूज्यबुद्धीनें व विस्मयानें चकित होऊन उभे राहतात. अशा ठिकाणीं धर्माचा अगर मताचा मुळींच प्रश्न नसतो. सर्व प्रकारच्या धर्मकल्पनांशीं ज्यांचा

वांकडें आहे अशा लोकांच्या मनांतही ह्या परिपूर्ण स्वार्थ त्यागाच्या कृत्यांबद्दल पूज्यबुद्धि उत्पन्न झाल्याशिवाय राहत नाहीं. स्वधर्माविषयीं अत्यंत अभिमान बाळगणारा ख्रिस्ती मनुष्यही एड्विन् अर्नोल्ड साहेबांनीं लिहिलेलें 'लाईट ऑफ एशिया' (एशियांतील प्रकाश) हें पुस्तक वाचून, ज्या बुद्धानें ईश्वराविषयीं उपदेश न करितां फक्त स्वार्थत्याग करण्याविषयींच उपदेश केला, त्याबद्दल अत्यंत पूज्यबुद्धि प्रकट करितो, हें तुम्हीं पाहिलें नाहीं काय? स्वधर्माविषयीं फाजील अभिमान बाळगणारास अथवा हट्टवाद्यास आपल्याशीं ज्यांचा मतभेद आहे त्यांच्याच प्रमाणें आपले ही उद्देश असतात हें कळत नाहीं. भक्तिमार्गाचें अवलंबन करणारा मनुष्य चांगल्या परिस्थितींत परमेश्वराची प्रतिमा सदोदित आपल्या डोळ्यांपुढें ठेवून शेवटीं कर्माचरण करणाराच्याच पदाप्रत जाऊन म्हणतो 'ईश्वरेच्छा बलीयसी'. म्हणजे तो सर्व 'कृष्णार्पण' करितो; आपल्यापाशीं कांहींच ठेवीत नाहीं. ह्याचेंच नाव आत्मपरित्याग. तत्वज्ञास आपल्या ज्ञानाच्या योगानें दृश्य 'स्वत्व' अगदीं भ्रममूलक आहे असें कळतें व तें तो तेव्हाच सोडून देतो. हाही आत्मपरित्यागच होय. सारांश **कर्म, भक्ति व ज्ञान**, हीं त्रयी 'आत्मपरित्यागात' एकत्र होते. प्राचीनकाळच्या महाश्रेष्ठ उपदेशकाचा, 'परमेश्वर हा जगापासून निराळा आहे,' असें सांगण्यात हाच आशय होता. हा भेद अगदीं यथार्थ आहे; कारण जग म्हणजे मूर्तिमंत स्वार्थ व ईश्वर

म्हणजे मूर्तिमंत निरपेक्षताच होय. रत्नखचित सिंहासनावरील अथवा सुवर्णमय राजमंदिरांतील राजाही अगदीं निरिच्छ असूं शकेल, व तो तसा असेल तर परमेश्वरस्वरूपच होय. परंतु दुसरा एक मनुष्य झोंपड्यांत राहणारा असून, त्याच्या सर्वांगावर चिंध्या आहेत व त्याचें जगांत कांहीं एक नाहीं. अशा स्थितींतही जर त्याचें मन जगांत अतिशय गढून गेलेलें असेल, तर, तो स्वार्थपरच म्हटला जाईल.

कांहींतरी दुष्कर्म घडल्याशिवाय सत्कर्म होत नाहीं व दुष्कर्मांतही सत्कर्मांचा अंश असतो, ह्या आपल्या मुख्य मुद्याकडे आतां आपण वळूं. ह्या वस्तुस्थितीचें ज्ञान झाल्यावर आपल्या हातून कर्माचरण व्हावें कसें? ह्या जगांतील कित्येक पंथांनी ही गोष्ट ध्यानां आणून हळूहळू आत्महत्या करणें हाच काय तो ह्या जगांतून मुक्त होण्याचा मार्ग आहे असा, विस्मयजनक असंबद्ध रीतीनें, जगास उपदेश केला; कारण त्यांना वाटलें कीं मनुष्य जिवंत असेपर्यंत त्याजपासून निरुपद्रवी सूक्ष्म प्राण्यांना, झाडझुडपांना व इतर कांहीं वस्तूंना पीडा होऊन त्यांपैकीं कित्येकांची हानि होईल. तात्पर्य, ह्यांच्या मताप्रमाणें मृत्यु हाच जगांतून मुक्त होण्याचा एक मार्ग आहे. जैन लोकांनींही ह्याच मताचा अत्युच्च मनःकल्पना म्हणून अनुवाद केला. हें मत तर्कशास्त्रास अगदीं धरून आहेसें दिसतें, पण ह्याचा खरा उलगडा अनासक्तीच्या उपपत्तीनें ‘श्रीमद्भगवद्गीतेंत’

केलेला आहे. ही अनासक्ति म्हणजे कर्माचरण करून सर्व गोष्टींपासून अलिप्त राहणें हें होय. तुम्हीं जगांत आहां, पण जगापासून अगदीं विलग आहां; व जें जें कृत्य तुम्हीं करितां, तें तें स्वतःकरितां नव्हे, हें नीट ध्यानांत ठेवा. जें जें कृत्य तुम्हीं स्वतः कराल त्याचा तुम्हांवर परिणाम झाला पाहिजे व तो होईलच. तुमचें कृत्य चांगलें असेल तर त्याचा तुम्हांवर सुपरिणाम होईल; वाईट असेल तर दुष्परिणाम होईल. पण कोणतेंही कृत्य तुम्ही स्वतःकरितां करणार नाहीं, तर, त्याचा तुम्हांवर कांहींच परिणाम होणार नाहीं. आमच्या धर्मशास्त्रांत ही कल्पना ज्यांत उत्तम प्रकारें व्यक्त केली आहे, असें एक वाक्य आहे. तें हें:—'कोणीही सर्व विश्वाचा संहार केला (अथवा कोणाचाही संहार झाला) तरी, तो हें कृत्य स्वतःकरितां मुळींच करीत नाहीं असें त्यास कळलें म्हणजे तो मारणारा अथवा मरणारा नव्हे.'* म्हणून 'कर्म-योगांत' असा उपदेश केला आहे कीं, 'हें जग सोडूं नका. त्यांतच रहा. जगाचा प्रभाव तुमच्या मनांत होईल तितका भिंबू द्या; पण हें सर्व तुमच्या सुखाकरितां व चैनीसाठींच असेल, तर, कर्माचरणच करूं नका. उपभोग हें आपलें इतिकर्तव्य नसावें.' प्रथमतः 'स्वत्वाची' हानि करून, मग जग आपल्याप्रमाणें मानूं लागा. जुने ख्रिस्ति लोकही असें म्हणत असत कीं, ह्या

* श्रीमद्भगवद्गीतेंत म्हटलें आहेः—

य एनं वेत्ति हंतारं यश्चैनं मन्यते हतं।
उभौ तौ न विजानीतो नायं हंति न हन्यते॥
अ० २, १९.

ह्यातान्याला मरण आलें पाहिजे.' 'हें सर्व जग आपल्या उपभोगाकरितां आहे,' ह्या स्वार्थाचे कल्पनेस त्यांनीं वृद्ध मनुष्याची उपमा दिली होती. मूर्ख आईबाप आपल्या मुलांस अशी प्रार्थना करण्यास शिकवितात कीं, 'हे देवा! तूं हे सूर्यचंद्र मजकरितां उत्पन्न केले आहेस.' जणूं काय ह्या बालकांकरितां चंद्रसूर्य उत्पन्न करण्याखेरीज ईश्वरास दुसरें कांहींच करावयाचें नव्हतें! असा वेडगळ प्रकार तुम्हीं आपल्या मुलांस शिकवूं नका. आणखी कांहीं लोक दुसऱ्या प्रकारचा मूर्खपणा करितात; ते असें म्हणतात कीं, हे सर्व प्राणी आपण मारून खावे म्हणून जन्मास आले आहेत व हें विश्व मनुष्यांच्या उपभोगांकरितां आहे. हा सर्व मूर्खपणा आहे. वाघही असें म्हणेल, 'मनुष्य माझ्यासाठींच जन्मास आला आहे.' आणखी तो परमेश्वराची अशी प्रार्थना करील कीं, 'देवा, हे मनुष्य प्राणी किती दुष्ट आहेत! ते माझ्यापुढें येऊन माझ्या भक्ष्यस्थानीं कां पडत नाहींत? खरोखरच, ते तुझ्या कायद्याचें उल्लंघन करितात!' हें जग आपणांकरितां निर्माण झालें असेल, तर, आपणही जगाकरितां जन्मास आलों आहों असें म्हटलें पाहिजे. हें जग आपल्या उपभोगार्थ उत्पन्न केलें आहे, ह्या अत्यंत दुष्ट कल्पनेनें आपण अधःपात पावत आहों. हें जग आपल्याकरितां नव्हे. लक्षावधि लोक त्यांतून दरवर्षी नाहींसे होतात. जगावर त्याचा कांहींच परिणाम होत नाहीं. इतर लक्षावधि लोकांनीं त्यांची जागा भरली जाते. तात्पर्य, जग आपल्याकरितां असेल तर आपणही जगाकरितां आहों.

ह्मणून, योग्य रीतीनें कर्माचरण करण्याकरितां प्रथमतः आपणांस आसक्तीची कल्पना झुगारून दिली पाहिजे.* नंतर ह्या (संसाररूपी) कलहांत न मिसळतां, दुरूनच प्रेक्षकांप्रमाणें सर्व अवलोकन करून आपलें कर्तव्य केलें पाहिजे. माझे वृद्ध शिक्षक मला ह्मणत असत कीं, 'तुह्मी आपल्या मुलांवर दाईप्रमाणें प्रेम ठेवा.' दाई तुमच्या मुलांस कुरवाळील, त्याच्याशीं खेळेल, व आपल्या पोटच्या मुलाप्रमाणेंच त्याच्याशीं सौम्यपणाचें वर्तन ठेवील; पण तुह्मी तिला रजा देतांक्षणींच आपलें चंबूगबाळें घेऊन घरांतून बाहेर पडण्यास तिची तयारी असते. 'आसक्ती'च्या (मायेच्या) रूपानें जें कांहीं असतें, तें सर्व ती विसरून जाते. सामान्य प्रतीच्या दाईस तुमचीं मुलें टाकून दुसरीं मुलें घेण्यांत मुळींच दुःख होणार नाहीं. तुह्मी 'आपलें' ह्मणून जें जें समजतां त्या सर्वांसंबंधानें तुमचें असेंच वर्तन असलें पाहिजे.

---

* श्रीमद्भगवद्गीतेंत श्रीकृष्णांनीं अर्जुनास उपदेश केला आहे कीं,

तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर।
असक्तो ह्याचरन् कर्म परं प्राप्नोति पूरुषः॥

—अ० ३, १९.

ह्मणजे श्रीज्ञानदेवांनीं ज्ञानेश्वरींत ह्मटल्याप्रमाणें,

'ह्मणउनि तूं नियत (सदोदित)। सकलकामनारहित। होऊनियां उचित। स्वधर्में राहाटें॥ जे स्वधर्में निष्कामता। अनुसरले पार्था। ते कैवल्यपद तत्वतां। पावले जगीं॥

तुह्मीं दाई आहां असें समजा; व परमेश्वरावर तुमचा भरंवसा असेल, तर ज्या वस्तु तुमच्या आहेत असें तुह्मांस वाटतें त्या त्याच्या आहेत असें मानीत जा. अत्यंत दुर्बलत्व हें अत्यंत भलेपणा व सामर्थ्य यांचें भासमान सूचक आहे. अमुक इसम मजवर अवलंबून आहे व मला दुसऱ्याचें बरें करितां येईल, असें वाटणें हा मानसिक दुर्बलपणा आहे. ही आढ्यता आपल्या सर्व आसक्तींची जननी आहे, व ह्या आसक्तीपासूनच आपलीं सर्व दुःखें उद्भवतात. आपण आपल्या मनाला असें ज्ञान करून दिलें पाहिजे कीं, ह्या विश्वांत आपणांवर कोणीही अवलंबून नाहीं. एकही भिकारी आपल्या भिक्षादानाची, एकही प्राणी आपल्या वत्सलतेची, व एकही सजीव वस्तु आपल्या मदतीची, अपेक्षा करीत नाहीं. सृष्टिनियमानें सर्वांस साहाय्य मिळतें, व आपणांतले लक्षावधि लोकही येथें नसले तरी तें मिळणारच. तुह्मां आह्मांसारख्यांकरितां सृष्टिक्रम बंद होणार नाहीं. इतरांस मदत करून आपणांस सुसंस्कृत बनतां येतें, हा तुमच्या व माझ्या सद्भाग्यानें, पूर्वी सांगितल्याप्रमाणें, आपला एक अधिकारविशेषच आहे. आपल्या आयुष्यांत हा एक मोठा धडा आपल्यास शिकावयाचा आहे, व तो पूर्णपणें आपणांस अवगत झाला ह्मणजे आपण कधींही कष्टी होणार नाहीं. अपाय न होतां आपणांस वाटेल त्या ठिकाणीं समाजांत मिसळतां येईल. तुह्मीं विवाहित असलां, तुमच्या आश्रयास चाकरांच्या पलटणीच्या पलटणी असल्या, व

तुह्मांस राज्यशकट चालवावयाचा असला, तरी जग हें आपल्याकरितां नाहीं व जगाला आपली जरूर नाहीं, ह्या तत्वानुसार तुह्मीं वागलां, ह्मणजे त्यापासून तुह्मांस यत्किंचित्‌ही पीडा होणार नाहीं. ह्याच वर्षी तुमचे कांहीं मित्र निवर्तले असतील; पण ते परत येईपर्यंत जग खोळंबलें आहे कीं काय? जगाचा प्रवाह बंद झाला आहे कीं काय? नाहीं, तो चालूच आहे. ह्मणून जगाकरितां आपणांस अमुक करावयाचें आहे, ही कल्पनाच तुह्मी आपल्या मनांतून काढून टाका. जगाला तुमच्या मदतीची मुळींच जरूर नाहीं. आपण जगाला मदत करण्याकरितां जन्मास आलों आहों असें मानणें अगदीं मूर्खपणाचें आहे; हा केवळ गर्व आहे, व सद्गुणाच्या ( परोपकाराच्या ) स्वरूपानें दिसणारा स्वार्थ आहे. तुह्मी आपल्या मनाला व शरीरांतील स्नायूंना, हें जग तुह्मांवर अगर इतर कोणावरही अवलंबून नाहीं, ह्या कल्पनेप्रमाणें कृति करण्यास शिकविलें, ह्मणजे तुह्मीं जें जें कृत्य कराल त्यापासून दुःखाच्या स्वरूपानें तुह्मांवर प्रतिक्रिया होणार नाहीं. तुह्मी एकाद्या मनुष्यास कांहीं देतां, पण त्यापासून आपणांस कांहीं लाभ व्हावा अशी इच्छा ठेवीत नाहीं, तेव्हां त्यानें नुसती कृतज्ञता तरी दाखवावी असें देखील मनांत आणूं नका. त्याच्या कृतघ्नपणाचा तुह्मांवर परिणाम होणार नाहीं; कारण, तुह्मीं आपल्या कृत्याबद्दल त्याजपासून कोणताही मोबदला मिळण्याची इच्छा ठेविली नाहीं; त्याच्या लायकीप्रमाणें त्याला तुह्मी

दान केलें, त्याच्या 'कर्मा'नें त्याला तें मिळवून दिलें, व तुमच्या 'कर्मा'मुळें तुह्मीं तें दिलें. कांहीं दान केल्या-बद्दल तुह्मी गर्व कां वाहावा? द्रव्य अगर दुसरी जी देणगी तुह्मीं दिली असेल ती उचलून देणारे काय ते तुह्मी आहां? जगाला त्याच्या 'कर्मा'नें हें सर्व प्राप्त होतें. तेव्हां, दातृ-त्वाबद्दल गर्व अथवा अभिमान बाळगण्याचें कांहींच कारण राहत नाहीं. तुह्मीं जगाला जें दिलें त्यांत मोठेसें कांहीं केलें नाहीं. तुह्मीं अनासक्ति संपादन केली ह्मणजे तुह्मांक-रितां या जगांत बरें अगर वाईट कांहींच उरलें नाहीं. स्वार्थामुळेंच चांगलें व वाईट हा भेद उत्पन्न होतो. हें सम-जणें फार कठीण आहे; पण कालेंकरून तुह्मांस असें दिसून येईल कीं, ह्या विश्वांत, तुह्मी आपल्यावर सत्ता गाजवूं देईपर्यंत, तुह्मांवर कोणत्याही पदार्थाची सत्ता नाहीं. मनुष्याचें स्वत्व मूर्ख बनून आपलें स्वातंत्र्य घालवीपर्यंत त्यावर कोणाचीही सत्ता चालणार नाहीं. ह्मणजे, अना-सक्तीच्या योगानें तुम्ही आपणांवर कोणत्याही गोष्टीचा पगडा बसूं देणार नाहीं. तुह्मी आपल्यावर परिणाम होऊं देईपर्यंत कोणत्याही गोष्टीचा तुम्हांवर क्रिया करण्याचा हक नाहीं, असें ह्मणणें फार सोपें आहे; तेव्हां, ज्या मनु-ष्यावर कसलाही परिणाम होत नाहीं, जो बाह्यसृष्टींतील परिणामानें सुखी अगर दुःखी होत नाहीं, अशा मनु-ष्याची खरी खूण काय समजावी? ही खूण ह्मटली ह्मणजे, ह्मावर पर्वत कोसळून त्याचे तुकडे तुकडे झाले, असंत

सुखप्रद देखावे त्याचे नजरेसमोर असले, किंवा त्याला आनंदविणाऱ्या गोष्टी घडून आल्या, तरी त्याच्या मनाच्या वृत्तींत कांहींएक फरक न होणें ही होय. असा मनुष्य विपत्तींत व संपत्तीच्या काळांत सारखाच असतो. त्याला कोणतीही स्थिति प्राप्त झाली तरी तो सदासर्वकाळ एकसारखाच राहतो.

हिंदुस्थानांत व्यास नांवाचे महामुनि होऊन गेले. हे वेदांतसूत्रांचे कर्ते होत. ह्यांचें आचरण अत्यंत पवित्र असे. ह्यांच्या वडिलांनीं निर्दोषता संपादण्याचा यत्न केला. पण त्यांत त्यांस यश आलें नाहीं. ह्यांच्या आजोबांचीही हीच स्थिति झाली. ह्यांच्या पणजासही ह्या कृत्यांत असेंच अपयश आलें. यांना स्वतःला देखील परिपूर्ण निर्दोषता संपादन करितां आली नाहीं. व्यासपुत्र शुक ह्यानें मात्र ती संपादन केली. व्यासानें आपल्या मुलास व्यावहारिक शहाणपण शिकवून सत्यज्ञान प्राप्त करून दिलें. नंतर त्यास जनक राजाचे दरबारीं पाठविलें. ह्या महाराजांस 'जनक विदेह' असें ह्मणत असत. 'विदेह' ह्मणजे 'शरीराबाहेर' जनक राजा होता, तरी आपण देहधारी आहों हें तो अजिबात विसरून गेला होता. त्याला नेहमी असें वाटे कीं, आपण ब्रह्म (आत्मरूप) आहों. व्यास पुत्र शुक यास शिक्षण देण्याकरितां आपणाकडे पाठवीत आहेत, हें जाणून राजानें पूर्वीच कित्येक तजविजी करून ठेविल्या होत्या. शुक राजवाड्याच्या दरवाजाजवळ आला

तेव्हां द्वारपालकांनीं त्याजकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. त्यांनीं एक जागा मात्र त्यास दाखविली. त्या ठिकाणीं तो अहोरात्र तीन दिवस बसून राहिला. इतक्या अवधींत त्याशीं कोणी बोललें नाहीं, व तो कोण आहे, कोठून आला वगैरे विचारपूसही कोणीं केली नाहीं. शुक हा महामुनिपुत्र होता. त्याच्या पित्यास सर्व देशभर मान मिळत असे, व तो स्वतःही फार सन्माननीय पुरुष होता. असें असूनही राजवाड्यांतील हलक्या गांवढळ पहारेकऱ्यांनीं त्याजकडे दुर्लक्ष केलें. तदनंतर तत्काळ राजाचे सर्व प्रधान व मोठमोठाले कामदार शुक बसला होता त्या ठिकाणीं आले, व त्यांनीं शुकाचा मोठा आदरसत्कार केला. त्यांनीं त्यास राजवाडयांत नेऊन तेथील सुंदर दालनें दाखविलीं, सुगंध तैलाभ्यंग स्नान घातलें, भरगच्ची पोषाख दिला, व आठ दिवसपर्यंत त्यास सर्व प्रकारच्या ऐषआरामांत ठेविलें. अशा प्रकारच्या बरदास्तीनेंही शुकाच्या शांत व गंभीर मुद्रेंत अणुरेणूइतकाही फरक पडला नाहीं; राजवाडयाच्या दरवाज्याशीं मार्गप्रतीक्षा करीत बसला असतांना ज्याप्रमाणें त्याची मुद्रा शांत होती, त्याचप्रमाणें अशा ऐषआरामांतही राहिली. हा आठ दिवसांचा विलासकाळ संपल्यावर त्यास जनक राजाकडे नेण्यांत आलें. त्या वेळीं राजा सिंहासनारूढ होता, व गायन सुरू असून नृत्यादि करमणुकीचे प्रकारही चालूच होते. अशी परिस्थिति असतांना राजानें त्याचे हातीं कां-

ठोकांठ भरलेला एक दुधाचा प्याला दिला, व त्यास सांगितलें कीं, 'दुधाचा एक थेंबही खालीं न सांडतां सात वेळां दिवाणखान्यासभोंवती प्रदक्षिणा कर.' शुकानें तो प्याला हातीं घेऊन सुंदर मुखकमलांचें आकर्षण व नृत्यगायन यांच्या ऐन बहारींत राजाज्ञेप्रमाणें सात वेळ दिवाणखान्या-भोंवतीं प्रदक्षिणा केली, व दुधाचा एक थेंबही सांडूं दिला नाहीं! शुकासारख्या मुलाचें मन ह्या जगांतील कोणत्याही वस्तूला आकर्षून घेतां आलें नाहीं; कारण, त्यानें ह्या वस्तूंचा आपल्या मनावर परिणामच होऊं दिला नाहीं. शुकानें तो प्याला जशाचे तसाच भरलेला राजापुढें आ-णिला, तेव्हां राजा ह्मणाला, 'तुझ्या पित्यानें तुला जें शि-कविलें, व तूं स्वतः जें शिकलास, त्याचीच मीं द्विरुक्ति करितों. तुला सत्यज्ञान झालें आहे; करितां तूं आतां घरीं जा.'

सारांश, ज्यानें आत्मसंयमन केलें त्यावर बाह्य वस्तूंचा कधींही परिणाम होऊं शकणार नाहीं; त्याच्या गुलामगिरीचा शेवट झालाच ह्मणून समजावें. त्याचें मन मुक्त होऊन तोच ह्या जगांत चांगल्या रीतीनें राहण्यास लायक झाला आहे. जगासंबंधानें लोकांचीं दोन प्रकारचीं मतें आहेत असें आप-णांस सामान्यतः आढळून येतें. कित्येक लोक जगासंबंधानें नाक मुरडणारे आहेत. ते ह्मणतात, 'हें जग किती भयं-कर व किती दुष्ट आहे!' इतर लोक 'हें जग फार उत्तम आहे' असें मानितात. त्यांच्या मताप्रमाणें हें जग फार सुंदर

व आश्चर्यजनक आहे! ज्यांचा आपल्या मनावर पगडा बसला नाहीं, ह्मणजे ज्यांनीं इंद्रियदमन केलें नाहीं, त्यांना हें जग वाईट गोष्टींनीं भरलेलें, अथवा फार झालें तर चांगलें व वाईट यांचें एक मिश्रण आहे असें वाटतें. आपल्या मनाचे आपण धनी झालों ह्मणजे हेंच जग आपणांस उत्तम वाटूं लागेल. असें झालें ह्मणजे, आपणांवर चांगला अगर वाईट असा कांहींच परिणाम होणार नाहीं; जी ती वस्तु आपापल्या ठिकाणीं सुव्यवस्थित असून एकचित्त झालेली आहे असें आपणांस आढळून येईल. जे कित्येक लोक प्रारंभीं ह्या जगास नरकासमान लेखितात, तेच शेवटीं इंद्रियनिग्रह करतां आला ह्मणजे त्याला स्वर्गलोकाप्रमाणें मानितात. आपण खरे 'कर्म-योगी' असलों, व ह्या स्थितीप्रत पोंचण्याची आपली इच्छा असली, तर आपला आरंभ कोठेंही असला तरी संपूर्ण आत्मपरित्यागांतच त्याचा खात्रीनें शेवट होतो; व हें भासमान स्वत्व नाहींसें झाल्याबरोबर, जें सर्व जग पूर्वी आपणांस दुष्कृत्यांनीं भरलेलें दिसत होतें, तेंच सर्व सुखाचें आगर बनून प्रत्यक्ष स्वर्गच भासूं लागतें. मनाची अशी स्थिति झाली ह्मणजे जगाचें वातावरणच सुखानें भरून जातें, व प्रत्येक मनुष्याचा चेहरा चांगल्या गोष्टीचा सूचक आहे असें वाटतें. हीच कर्मयोगाची इतिश्री व त्याची व्यावहारिक आयुष्यक्रमांतील परिपूर्णता होय. आमचे विविध 'योग' एकमेकाशीं झगडत नाहींत. प्रत्येक योग एकाच अवसानभूमीकडे आह्मांस

नेतो, व आह्मांस परिपूर्ण (निर्दोष) बनवितो; आपण ज्या त्या योगाप्रमाणें आचरण करण्यास मात्र झटलें पाहिजे. सर्व गुरुकिल्ली काय ती आचरणांतच आहे. प्रथम श्रवण, नंतर मनन, व मग आचरण असा क्रम आहे. हाच क्रम प्रत्येक योगास सारखा लागू आहे. प्रथमतः योग ह्मणजे काय हें ऐकून घेऊन नंतर तो समजून घेतला पाहिजे; व ज्या पुष्कळ गोष्टी तुह्मांस कळणार नाहींत त्यांचें परिज्ञान सतत श्रवण व मनन करूनच होईल. एकदम सर्व कांहीं समजणें कठीण आहे. प्रत्येक गोष्टीचें स्पष्टीकरण सरतेशेवटीं तुह्मांतच आहे. वास्तविक पाहतां कोणी कोणास शिकवितो असें कधीं घडत नाहीं. आपल्यापैकीं प्रत्येकानें स्वतःच शिकून तयार झालें पाहिजे. बाह्य शिक्षकाचें काम फक्त सुचवून देण्याचें आहे. ही सूचना अंतःशिक्षकास कोणत्याही गोष्टीचें ज्ञान करून घेण्यास उद्दीप्त करिते. नंतर मनन व ग्रहणशक्ति यांचे योगानें सर्व गोष्टी आपणांस नीट कळूं लागतात, व आपल्या अंतरात्म्यास त्यांचें प्रत्यक्ष ज्ञान होतें. ह्या प्रत्यक्ष अनुभवाचीच पुढें प्रबळ इच्छाशक्ति बनते. आपल्या अंतःकरणांत प्रथम जो मनोविकार जागृत होतो त्यासच पुढें इच्छेचें स्वरूप मिळतें, व ह्या इच्छेपासूनच एक प्रचंड कर्मप्रवर्तक शक्ति उत्पन्न होते. आपलें सर्व शरीर निरिच्छ कर्म-योगाचें एक यंत्र बनून परिपूर्ण आत्मपरित्याग व पराकाष्ठेची निरपेक्षता यांची इष्टसिद्धि होईपर्यंत, ही कर्मप्रवर्तक शक्ति आपल्या प्रत्येक धमनींतून,

स्नायूंतून व मज्जातंतूंतून खेळत राहील. ही इष्टसिद्धि अमुक एक प्रकारच्या मतावर, पंथावर, अगर श्रद्धेवर अवलंबून नसते. अमुक मनुष्य ख्रिस्ती आहे, कीं यहुदी आहे, कीं परदेशस्थ आहे, याबद्दल अशा बाबतींत कांहींच विचार करावयाचा नसतो. तुह्मीं निरिच्छ आहां कीं नाहीं हाच काय तो प्रश्न आहे. तसे तुह्मी असाल, तर एकही धर्मपुस्तक वाचल्यावांचून, अथवा 'चर्च' मध्यें अगर देवालयांत गेल्यावांचून, तुह्मांस परिपूर्णता प्राप्त होईल. आमचा प्रत्येक 'योग' इतर योगांचे मदतीशिवाय मनुष्यास निर्दोष बनविण्यासारखा आहे; कारण, सर्व योगांचें पर्यवसान एकच आहे. 'कर्म', 'भक्ति' व 'ज्ञान' ह्या योगत्रयीचा मोक्षप्राप्तीच्या प्रत्यक्ष व स्वतंत्र साधनांप्रमाणें उपयोग करून घेतां येतो. 'कर्म' आणि 'तत्वज्ञान' एकमेकांपासून भिन्न आहेत असें मूर्ख लोक ह्मणतात; शहाणे तसें ह्मणत नाहींत. ज्ञानी पुरुष असें समजतात कीं, हीं दोन्ही एकमेकांपासून बाह्यतः भिन्न दिसलीं, तरी शेवटीं मानवी परिपूर्णता हेंच त्यांचें पर्यवसान असतें.



## प्रकरण ७ वें.

### मुक्ति.



'कर्म' ह्या शब्दाचा अर्थ 'कृत्य' असा असून अध्यात्मशास्त्रांत 'कर्म' ह्या शब्दानें कारणत्वाचाही बोध होतो, हें पूर्वी सांगितलेंच आहे. ज्या कोणत्याही विचारापासून, क्रियेपासून अगर कृत्यापासून कार्य घडतें त्यास 'कर्म' ह्मणतात. सारांश कर्मनियम ह्मणजे कारणत्वाचा (निमित्ताचा) अथवा अपरिहार्य कार्यकारणसंबंधाचा नियम होय. ज्या ज्या ठिकाणीं कारण अथवा हेतु यांचें अस्तित्व असेल, त्या त्या ठिकाणीं कार्य घडलेंच पाहिजे. ह्या आवश्यकतेस प्रतिबंध करितां येणार नाहीं. हा कर्मनियम आपल्या तत्वज्ञानाप्रमाणें सर्व जगास सारखा लागू पडतो. जें जें आपण पाहतों, करतों, व जें जें आपल्या मनास वाटतें; त्याचप्रमाणें ह्या विश्वांत कोणत्याही स्थलीं जें जें कृत्य घडतें, तें तें सर्व एकापक्षीं आपल्या पूर्वकर्माचें फळ असून अन्यपक्षीं पर्यायानें कारण होऊन त्यापासून फलनिष्पत्ति होते. तेव्हां ह्या गोष्टीविषयीं व 'नियम' ह्या शब्दाच्या अर्थाविषयीं विचार करणें आवश्यक आहे. अध्यात्मिक दृष्टीनें आपणांस असें दिसून येईल कीं, कोणत्याही परंपरेची (अथवा क्रमाची) आव-

र्तनाकडे जी प्रवृत्ति असते, तिला नियम अशी संज्ञा आहे. एका गोष्टीमागून दुसरी गोष्ट घडली अथवा दोन्ही गोष्टी एकाच कालीं घडल्या, तर ह्या अनुक्रमाचें अथवा सहवर्त-नाचें[1] आवर्तन होईल अशी आपली धारणा असते. आ-मच्या जुन्या नैयायिकांनीं ह्या आवर्तनाचे नियमास 'व्याप्ति' असें ह्मटलें आहे. त्यांच्या मताप्रमाणें नियमासंबंधानें आपल्या सर्व कल्पना साहचर्यामुळें उत्पन्न झाल्या आहेत. दृग्विष-यांच्या परंपरेची एका प्रकारच्या अचल क्रमानें आपल्या मनाशीं संगति झालेली असते; यामुळें कोणत्याही वेळीं आपण जें जें पाहतों, त्या सर्वांचा आपल्या मनांतील गो-ष्टींशीं तेव्हांच संबंध जुळतो. कोणत्याही एका कल्पनेमुळें, अथवा अध्यात्मभाषेंत म्हणावयाचें असल्यास कोणत्याही एका मानसिक तरंगामुळें, आपल्या 'चित्तांत' नेहमी पुष्कळ तरंग उत्पन्न होतात. साहचर्य अथवा संगति ह्या संबंधाची ही अध्यात्मिक कल्पना होय; व निमित्त म्हटलें ह्मणजे ह्या प्रचंड व व्यापक अशा संगतितत्वाचें एक स्वरूप होय. संगतीच्या ह्या व्यापकपणासच संस्कृत भाषेंत 'व्याप्ति' असें ह्मणतात. बाह्यसृष्टींत व अंतःसृष्टींत नियमासंबंधाची कल्पना एकच आहे. ती ही कीं, अमुक गोष्ट घडल्यावर अ-मुक गोष्ट घडेल, व ह्या परंपरेची आपली नजर चालेल तों-पर्यंत आवर्तनें होतील. ह्मणजे वस्तुतः सृष्टींत नियम ह्मणून नाहीं. तेव्हां खरें म्हटलें म्हणजे पृथ्वींत गुरुत्वाकर्षण

1 Co—existence.

आहे असें म्हणणें, अथवा सृष्टींत पदार्थमात्रासंबंधानें कोठेंतरी नियम आहे असें म्हणणें चुकीचेंच आहे. हा नियम म्हणजे एक प्रकारची पद्धत आहे. हिचे योगानें आपलें मन दृष्टिगोचर विषयांच्या परंपरेस आकलन करितें, व ही सर्व पद्धत आपल्या मनांतच असते. कित्येक दृष्टिगोचर गोष्टी एकामागून एक अगर एकत्र घडल्या, व नंतर ठराविक वेळीं त्यांचें आवर्तन होईल अशी आपली खात्री होऊन ह्या सर्व परंपरेच्या पद्धतीचें आपल्या मनास आकलन करितां आलें, म्हणजे ह्या सर्व प्रकारास आपण ‘नियम’ अशी संज्ञा देतों.

आतां, ‘सार्वत्रिक (विश्वव्यापक) नियम’ ह्मणजे काय हा दुसरा एक विचारणीय प्रश्न आहे. ज्याला संस्कृत अध्यात्मशास्त्रज्ञांनीं ‘देश–काल–निमित्त’ ह्मटलें आहे, त्या अस्तित्वाचा एक भाग ह्मणजे आपलें विश्व होय. अनंत अस्तित्वाचा केवळ एक भाग ह्मणजे हें आपलें विश्व असून तें एका विशिष्ट प्रकारच्या मुसींत ओतलेलें आहे, अथवा देश–काल–निमित्तानें तें बनलेलें आहे. अस्तित्वाच्या एकुणातीच्या ज्या भागानें ही मूस भरते, तोच भाग आमचें विश्व होय. यावरून असें सिद्ध होतें कीं, अशा स्थितींतील विश्वांतच नियम शक्य आहे. त्यापलीकडे नियमाचें बंधन नाहीं. जेव्हां आपण ह्या विश्वाविषयीं बोलतों, तेव्हां आपल्या मनानें मर्यादित अशा अस्तित्वाच्या भागासच आपण विश्व समजतों. जें विश्व इंद्रियांनीं बनलेलें

आहे व ज्यास दर्शन, स्पर्श, मनन, श्रवण, कल्पना व मनोविकार यांचें ज्ञान होतें, त्यासच नियमाचा निर्बंध आहे. त्यापलीकडील अस्तित्व नियमातीत आहे; कारण आपल्या मनाच्या जगापलीकडे कारणत्वाची गति नाहीं. मन व इंद्रियें यांच्या मर्यादेपलीकडे जें जें आहे तें तें कारणत्वाच्या नियमानें बांधलेलें नाहीं; कारण, इंद्रियांपलीकडील प्रदेशांत वस्तुमात्राची मानसिक संगति नाहीं व विचारसंगतीवांचून निमित्त नाहीं. अस्तित्व हें संज्ञा आणि स्वरूप यांच्या मुशींत पडलें ह्मणजेच निमित्त—नियमाच्या बंधनांत येतें, व मग त्यास नियमाचा निर्बंध आहे, असें आपण ह्मणतों; कारण, सर्व नियमांचें सार निमित्तांत आहे. ह्मणून आपणांस सहज दिसून येईल कीं, ‘ स्वतंत्र इच्छा ’ अशी वस्तुच असूं शकणार नाहीं. हे दोन शब्द परस्पर विरोधी आहेत; कारण इच्छा ह्मणजे काय हें आपणांस कळतें, व जें जें आपणांस कळतें तें सर्व आपल्या विश्वांत आहे व आपल्या विश्वांत जें कांहीं आहे, त्यास देश—काल निमित्ताच्या स्थित्यनुरूप स्वरूप प्राप्त झालें आहे. जें जें आपणांस कळतें अगर कळणें शक्य आहे तें तें निमित्ताधीन आहे, व निमित्ताचा नियम ज्यास मान्य करावा लागतो तें स्वतंत्र असूं शकणार नाहीं. त्यावर इतर शक्तींचा परिणाम झाल्यानें तेंच पर्यायानें कारण बनतें. परंतु जें प्रथमतः इच्छा या स्वरूपानें नसून पुढें ज्यास इच्छेचें स्वरूप प्राप्त होतें, ह्मणजे ज्यास देश—काल—निमि-

त्याच्या मुशींत येऊन पडल्यामुळें मानवी इच्छेचें स्वरूप येतें, तें मूळारंभीं अगदीं स्वतंत्र--बंधनरहित--असतें; व ह्या देश--काल--निमित्ताच्या मुशींतून बाहेर पडल्यावरही पुन्हां तें स्वतंत्र बनतें. सारांश, विमुक्त स्थितीपासून तें जन्मास येतें, नंतर तें बंधनाच्या मुशींत येऊन पडतें व ह्या बंधनाच्या बाहेर पडल्यावर पुन्हां तें विमुक्त बनतें.

हें विश्व कोठून येतें, त्याचें वसतिस्थान कोठें असतें, व तें कोणीकडे जातें, असा एक प्रश्न उपस्थित झाला आहे. ह्यास उत्तर असें देण्यांत येतें कीं, मुक्तीपासून त्याचें जनन होतें, बंधनांत त्याचें वसतिस्थान असतें व तेथून तें पुन्हां मुक्तीकडेच जातें. त्याचप्रमाणें आपण जेव्हां मनुष्य हा अनंत परमेश्वराचें स्वरूप आहे असें ह्मणतों, तेव्हां मनुष्य ह्मणजे अनंत परमेश्वराचा अत्यंत सूक्ष्म भाग आहे, अशी आपली समजूत असते. आपण पाहतों तें शरीर व मन समस्त विश्वाचा एक लहानसा भाग अथवा अनंत अस्तित्वाचें एक सूक्ष्म क्षेत्र होय. हें सर्व विश्व अपरिमित अस्तित्वाच्या एका बिंदूसमान असून, आपले सर्व नियम, आपलीं बंधनें, आपलीं सुखदुःखें व आपल्या आशा ह्या छोट्याशा विश्वांतच असतात; तद्वतच आपला उत्कर्ष व भ्रंशही ह्या लहानशा मंडलांतच असतो. यावरून तुमचे लक्षांत येईल कीं, आपल्या मनानें बनविलेलें हें विश्व सतत चालू राहण्याविषयीं आशा बाळगणें व ह्या ज्ञात जगाचीच ज्या ठिकाणीं आवृत्ति होणार अशा

स्वर्गलोकीं जाण्याची अपेक्षा करणें हें किती तरी पोरक-टपणाचें आहे! ह्या सर्व अनंत अस्तित्वानें आपल्या मर्यादित व विशिष्ट स्थितींतील ज्ञात अस्तित्वास प्रमाणभूत मानावें अशी इच्छा असाध्य व पोरकट आहे, हें तुह्मांस सहज कळून येईल. जेव्हां एकादा मनुष्य स्वतःपाशीं असणारी वस्तुच पुन्हां पुन्हां आपणांस प्राप्त व्हावी अशी अपेक्षा करितो अथवा, मीं कधींकधीं ह्मणतों त्याप्रमाणें, 'सुखकर' धर्म असावा असें तो ह्मणतो, तेव्हां तो इतका निकृष्टावस्थेस पोंचला आहे ह्मणून समजावें कीं, सद्यःस्थितीहून अधिक उच्चस्थितीप्रत जाण्याविषयीं त्याचे मनांत विचारच येत नाहीं. त्याच्या प्रस्तुतच्या लहानशा परिस्थितीपलीकडे त्याच्यानें जाववतच नाहीं. अनंत सृष्टीचें त्यास विस्मरण होऊन त्याची सर्व कल्पना ह्या लहानशा सुखदुःखांत व क्षणिक मत्सरांतच गढून गेलेली असते. ही मर्यादित वस्तु अमर्याद आहे असें त्यास वाटतें, इतकेंच नव्हे, तर, हा मूर्खपणाही तो टाकून देत नाहीं. तो जीविततृष्णेस अत्यंत लगटून राहतो. आपल्या माहितींतल्या लहानशा विश्वाबाहेर लक्षावधि सुखें, अस्तित्वें, नियम, प्रगती व निमित्तें आहेत व आपली सृष्टि ह्मणने वस्तुतः ह्या सर्वांचाच एक भाग आहे.

मुक्ति संपादण्याकरितां ह्या विश्वाचे मर्यादेपलीकडे आपणांस गेलें पाहिजे. येथें ती प्राप्त होणार नाहीं. पूर्ण समतोलपणा अथवा ख्रिस्ती लोक ज्यास आकलनशक्तीबाहेरची

शांतता अशी संज्ञा देतात, तें विश्वांत, कैलासांत, अथवा आपलें मन आणि विचार ज्या ज्या ठिकाणीं जाऊं शकतात त्या त्या ठिकाणीं, इंद्रियज्ञेयस्थळीं, किंवा कल्पनेनें ज्यांचें ज्ञान होतें अशा ठिकाणीं, प्राप्त होणें शक्य नाहीं. अशा स्थळीं मुक्तीचा आपणांस लाभ मिळणार नाहीं; कारण हीं सर्व स्थळें देश—काल—निमित्तानें मर्यादित असून, आपल्या विश्वांतच आहेत. आपल्या पृथ्वीहून अधिक तेजस्वी अशीं कित्येक स्थळें असतील व त्या ठिकाणीं उपभोगही अधिक तीव्र असतील; पण, त्यांचाही विश्वांतच समावेश होत असल्यानें तीं नियमबद्ध आहेत. ह्मणून मुक्तीकरितां ह्या सर्व स्थळांच्या पलीकडे आपणांस गेलें पाहिजे. हें चिमुकलें विश्व संपलें ह्मणजे सत्यधर्मास प्रारंभ होईल. त्या ठिकाणीं ह्या लहानशा सुखदुःखाचा व वस्तुविषयक ज्ञानाचा अंत होऊन, खऱ्या तत्वास सुरुवात होईल. जीविततृष्णा व क्षणिक अस्तित्वावरील प्रबल आसक्ति यांचा आपण त्याग करीपर्यंत, विश्वापलीकडील अनंत मुक्ततेचें आपणांस क्षणभरही दर्शन होणार नाहीं. मानवी जातीच्या सर्व उदात्त महात्वाकांक्षांची अवसानभूमि जी मुक्तता ती साध्य होण्यास एकच मार्ग उरला आहे, हें आतां विचारशक्तीनेंच सिद्ध झालें आहे. हा मार्ग ह्मटला ह्मणजे, हें लहानसें जीवित, हें चिमुकलें विश्व, पृथ्वी, स्वर्ग, आपलें मन, शरीर व जें जें मर्यादित व स्थित असेल त्या सर्वांचा त्याग करणें हें होय. इंद्रि

मन यांच्या कक्षेंतील चिमुकल्या विश्वाचा त्याग करितांक्षणींच आपण मुक्त होऊं. नियमानें मर्यादित व निमित्तप्रचुर स्थलांपलीकडे जाणें, हाच बंधनांतून मुक्त होण्याचा मार्ग आहे.

पण ह्या विश्वाची आशा सुटणें फार कठीण आहे. फारच थोड्यांना तें साधतें. आमच्या ग्रंथांतून हें साध्य होण्यास दोन मार्ग सांगितले आहेत. एका मार्गाचें नांव 'नेति नेति' (असें नव्हे, असें नव्हे,), व दुसऱ्याचें 'इति इति' (असें असें). पहिलें निषेधात्मक व दुसरें भावात्मक आहे. निषेधाचा मार्ग अत्यंत गहन आहे. अत्यंत असामान्य मनाच्या व प्रचंड इच्छाशक्तीच्या पुरुषांसच हा मार्ग साध्य होणें शक्य आहे. अशा लोकांनीं सहज म्हटलें कीं, 'छे! मला हें नको,' तर, त्यांचें मन व शरीर हीं त्यांच्या इच्छेप्रमाणें वागतात व ह्मणूनच ते यशस्वी होतात. पण असे लोक फार विरळा. बहुजनसमाजास—बहुतेक सर्व लोकांस—दुसऱ्याच मार्गाचें अवलंबन करावें लागतें. हा मार्ग जगांतून आक्रमून जाण्याचा असतो व ह्यांत मायिक बंधनें तोडून टाकण्याकरितां त्या सर्व बंधनांचा उपयोग करावा लागतो. हाही एक प्रकारचा त्याग आहे; मात्र तो फार धीमेपणानें व क्रमशः करावयाचा असतो. ह्मणजे, वस्तूंचें ज्ञान करून घेऊन, त्यांचा उपभोग घेऊन व अशा रीतीनें अनुभव मिळवून व पदार्थमात्रांचे धर्म काय आहेत ते समजून घेऊन, आणि शेवटीं ह्या

सर्व गोष्टींस झुगारून देऊन, मन अनासक्त झाल्यावर हा परित्याग करावयाचा आहे. पहिल्या मार्गांत ज्ञानाच्या—विचाराच्या—योगानें व दुसऱ्यांत कर्माचरण व अनुभव यांच्या द्वारें अनासक्ति संपादितां येतें. पहिल्यास 'ज्ञानयोग' ह्मणतात; ह्याचें विशेष लक्षण ह्मटलें ह्मणजे कर्मापासून अगदीं निवृत्त असणें हें होय. दुसऱ्यास 'कर्मयोग' ह्मणतात. ह्यांत सतत कर्माचरण करण्याशिवाय गत्यंतरच नसतें. प्रत्येक मनुष्यास या विश्वांत कर्माचरण करावेंच लागतें. मात्र, जे कोणी आत्म्याचे योगानें पूर्णपणें संतुष्ट असतात, ज्यांची इच्छा व मन आत्म्यापलीकडे जात नाहीं व आत्मा ह्मणजे ज्यांचें सर्वस्व आहे, ते कर्माचरण करीत नाहींत. इतरांस तें केलेंच पाहिजे. ज्याप्रमाणें एखादा प्रवाह आपल्या प्रकृतिगुणाप्रमाणें जोरानें स्वैरपणें वहात येऊन शून्यगर्भांत पडतो व तेथें भोंवऱ्यांत सांपडल्यामुळें कांहीं वेळ वर्तुलभ्रमण केल्यावर बाहेर पडून पुन्हां स्वतंत्रपणें स्वैरगतीनें वाहूं लागतो, त्याच प्रमाणें प्रत्येक मानवी जीविताची स्थिति आहे. तें ह्या देशकाल—निमित्तरूपी जगाच्या भोंवऱ्यांत सांपडून, तेथें माझे आईबाप माझे बंधू, माझें नांव, माझी कीर्ति इत्यादिकांचा घोष करीत कांहीं कालपर्यंत भ्रमण केल्यावर भोंवऱ्याबाहेर पडून आपलें मूळचें स्वातंत्र्य पुन्हां संपादन करितें. सर्व विश्वाची हीच अवस्था आहे. त्याचें आपणांस ज्ञान असो वा नसो, तें आपणांस कळो वा न कळो, आपण सर्वजण ह्या स्व-

प्ररूप जगांतून पार पडण्यास झटत आहों. या जगांतील अनुभवानें मनुष्यास जगाच्या भोंवऱ्यांतून पार पाडण्यास सामर्थ्य येतें.

पण 'कर्मयोग' ह्मणजे काय? कर्माचरणाच्या गुरुकिल्लीचें ज्ञान ह्याचेंच नांव 'कर्मयोग'. आपण पाहतों कीं, सर्व विश्व कर्म आचरीत आहे. हें तें कशाकरितां करितें? तर, मुक्ति व स्वातंत्र्य यांकरितां. अत्यंत सूक्ष्म परमाणूपासून, तों तहत् अत्युच्च प्राण्यापर्यंत प्रत्येक वस्तु ह्या मोक्षाकरितां कळत अगर न कळत कर्माचरण करित असते. ह्या कर्माचरणाचा हेतु, मन, शरीर, आत्मा व इतर जें कांहीं असेल, त्या सर्वांची मुक्ति संपादन करण्याचा असतो. सर्व वस्तू नेहमीं स्वातंत्र्याकरितां प्रयत्न करीत असून, बंधनापासून दूर दूर पळत आहेत. सूर्य, चंद्र, पृथ्वी व तारेही बंधनांतून मुक्त होऊन दूर जाण्याचा प्रयत्न करीत आहेत. सृष्टींतील केंद्रगामि व केंद्रपराङ्मुख ह्या दोन शक्ती आपल्या विश्वाचे मासलेच होत. कर्मयोगानें आपणांस कर्माचरणाची पद्धत व त्यांतील गुह्य कळतें. आपल्या उत्साहशक्तीचा कशारीतीनें उपयोग करावयाचा हें आपणांस कळलें नाहीं, तर, तिचा व्यर्थ व्यय होईल. कर्मयोगानें कर्मविषयक शास्त्र तयार होतें, व त्यामुळें ह्या जगांतील कृत्यांचा उत्तम रीतीनें कसा उपयोग करावा हें कळतें. कर्माचरण अपरिहार्य आहे, व तें तसें असलेंच पाहिजे; पण ज्याचा उच्चतम उद्देश आहे असेंही कृत्य

आहे. कर्मयोगामुळें आपणांस कबूल करावें लागतें कीं, हें जग फक्त पांच मिनिटांचें आहे. यांतून कांहीं झालें तरी आपणांस पार पडलें पाहिजे व याच्या पैलतीराला गेल्यावरच मुक्ति प्राप्त होईल. जगांतील बंधनांतून बाहेर पडण्याचा मार्ग आपल्यास हळूहळू पण निश्चयानें आक्रमण केला पाहिजे. मीं नुकतेंच सांगितल्याप्रमाणें कित्येक अलौकिक पुरुष, ज्याप्रमाणें सर्प आपली कातीण टाकून देऊन एका बाजूला होतो व मग तिजकडे पहातो, त्याप्रमाणें जगाचा त्याग करून बाजूला होतात. असे असाधारण पुरुष कांहीं आहेत, यांत संदेह नाहीं; पण बाकीच्या मानवजातीस कर्मरूप जगांतूनच हळूहळू मार्गक्रमण केलें पाहिजे. ज्याचा ह्मणून कर्म—योगाशीं संबंध आहे त्या प्रत्येक मनुष्यास अत्यंत फायदेशीर होईल अशाच प्रकारची कर्माचरणाची पद्धत व गुरुकिल्ली कर्मयोग आपणांस दाखवून देतो.

कर्मयोगाचें असें ह्मणणें आहे कीं, 'सतत उद्योग करा, पण कर्मासंबंधानें सर्व प्रकारची आसक्ति टाकून द्या.' कशाशींही एकरूप होऊं नका. तुमचें मन मोकळें ठेवा. जीं संकटें व दुःखें तुम्हीं पाहतां, तीं सर्व या जगांत अवश्य असलींच पाहिजेत; दारिद्र्य, संपत्ति व सुख हीं क्षणिक आहेत; आपल्या खऱ्या स्वभावगुणाशीं त्यांचा कांहीं संबंध नसतो. आपला प्रकृतिस्वभाव सुखदुःखांस व इंद्रियविषयांस अगोचर असून कल्पनातीत आहे. असें

आहे तरी, सर्वकाल आपणांस कर्माचरण केलेंच पाहिजे. मायेपासून दुःख उत्पन्न होतें; कर्मापासून नव्हे. आपण जें काम करतों त्याशीं आपण एकरूप होतांक्षणींच आपल्या दुःखास आरंभ होतो; पण आपण असें एकरूप झालों नाहीं, तर आपणांस दुःख होणार नाहीं. दुसऱ्याची एकादी सुंदर तसबीर जळून गेली, तर, त्याबद्दल मनुष्यास सामान्यतः फार दुःख होत नाहीं; पण त्याची स्वतःचीच तशी तसबीर 'अग्नये स्वाहा' झाली, तर, त्याला कितीतरी दुःख होतें! असें कां व्हावें? दोन्ही तसबिरी सुंदर आहेत, व किंबहुना त्या एकाच मूळ तसबिरीच्या प्रतिकृती असतील; पण चमत्कार असा कीं, एकीबद्दल दुसरीपेक्षां कितीतरी पटीनें आपणांस जास्त दुःख होतें! ह्याचें कारण असें कीं, एका तसबीरींत तो आपलेपणा—एकरूपता—व्यक्त करितो; दुसरींत करीत नाहीं. हें 'मी व माझें' सर्व दुःखास कारण आहे. सत्तेबरोबर स्वार्थपरता प्राप्त होऊन स्वार्थामुळें सर्व दुःखास आरंभ होतो. स्वार्थाच्या प्रत्येक कृत्यानें अगर विचारानें आपण कोणत्या तरी वस्तूशीं आसक्त होऊन लागलीच गुलाम बनतों. 'मीं आणि माझें' ह्मणणारी आपल्या चित्तांतील प्रत्येक विचारलहरी लागलीच आपल्या भोंवतीं शृंखला घालून आपणांस गुलाम बनविते. आपण अधिकाधिक 'मीं आणि माझें' ह्मणत गेलों ह्मणजे आपल्या गुलामगिरीची व दुःखाचीही वृद्धि होते. ह्मणून 'कर्म-योग' आपणांस शिकवितो कीं, जगांतील सर्व

चित्रांच्या सौंदर्याचा आपण उपभोग घ्यावा पण त्यांतील कोणत्याही चित्राशीं आपण एकरूप होऊं नये. 'माझें' असें कधींही ह्मणूं नये. ज्या ज्या वेळीं अमुक वस्तु माझी आहे असें आपण म्हणूं त्या त्या वेळीं, दुःख हें दत्त ह्मणून उभें आहेच असें समजा. तुह्मी आपल्या मनांत 'माझें मूल' असें सुद्धां म्हणूं नका. मुलावर आपला ताबा ठेवा, पण तें 'माझें' असें म्हणूं नका. असें कराल तर तुम्ही दुःखी व्हाल. त्याचप्रमाणें 'माझें घर,' 'माझें शरीर' असें म्हणूं नका. सर्व अडचण काय ती यांत आहे. हें शरीर तुमचें, माझें अथवा दुसऱ्या कोणाचेंही नाहीं.* सृष्टिनियमाप्रमाणें हीं शरीरें उत्पन्न होऊन नाहींशीं होतात; पण, आपण केवळ प्रेक्षकांप्रमाणें असून, या सर्वांपासून अलिप्त आहों. एकादी तसबीर अथवा भिंत यांहून हें शरीर अधिक स्वतंत्र नाहीं. आपण ह्या शरीराविषयीं इतकें आसक्त कां असावें? एकादा मनुष्य चित्र रंगवून ठेवतो व चालता होतो; त्याची त्या चित्राविषयीं इतकी आसक्ति कां असावी? तें तसेंच असूं द्यावें. 'मला तें पाहिजे' हा स्वार्थविकार मनांत घोळूं

---

* श्री समर्थ रामदास स्वामींनीं 'दासबोधांत' म्हटलें आहे कीं, देह ह्मणावें आपुलें। तरी तें बहुतां कारणें निर्मिलें। प्राणियांच्या माथां घर केलें। उवा मस्तकीं भक्षिती॥ ......ऐसें शरीर बहुतांचें। हें मूर्ख ह्मणे आमुचें। परंतु खाजें जीवाचें। तापत्रयीं बोलिलें॥ —दशक १, समास १०.

देऊं नये. ह्या विकार मनांत घोळूं लागला कीं, दुःखास आरंभ झालाच.

ह्मणून 'कर्म-योगाचें' असें ह्मणणें आहे कीं, हे स्वार्थपर विकार मनांत येऊं देण्याकडे जी आपली प्रवृत्ति असते तिचा प्रथमतः नाश करा; व ह्या प्रवृत्तीस दाबांत ठेवण्याचें तुमच्या अंगीं सामर्थ्य आलें ह्मणजे, तुह्मी आपल्या मनास स्वार्थपर विचारतरंगांत निमग्न होऊं देऊं नका. इतकें झाल्यावर तुम्ही जगांत वाटेल तेथें जाऊन वाटेल तितकें काम केलें, व वाटेल त्या समाजांत जाऊन मिसळलां तरी, तुमचें मन दुर्विकारांनीं कलुषित होणार नाहीं. तें पाण्यांतील कमलपत्र पहा. जलबिंदु त्याला स्पर्श करून चिकटून राहत नाहीं. त्याचप्रमाणें तुह्मीं ह्या जगांत वागूं लागाल. वैराग्य अथवा कर्मयोगांत ज्यास अनासक्ति म्हणतात तें हेंच होय. अनासक्तीवांचून कोणताही योग नाहीं हें मीं तुम्हांस सांगितलें आहेसें मला वाटतें. अनासक्ति सर्व योगांचा पाया होय. जो मनुष्य घरदार टाकून देतो, सुंदर वस्त्रांचा परित्याग करितो व कदान्न भक्षण करून अरण्यांत वास करितो तोही अत्यंत आसक्त असूं शकेल. त्याचें स्वत्व व शरीर ह्यासच तो माझें माझें म्हणेल व जन्मभर तो आपल्या शरीराकरितांच झगडत राहील. आपल्या बाह्य शरीरासंबंधाच्या गोष्टींशीं अनासक्तीचा कांहीं संबंध नाहीं. तिचा मनाशींच संबंध आहे. 'मीं व माझें' ह्याचा शरीराशीं

संबंध आहे; इंद्रियविषय व आपलें शरीर ह्यांमध्यें ही सांखळी नसेल तर, आपण कोठेंही आणि कोणीही असलों तरी अनासक्तच आहों. सिंहासनावरील राजा पूर्णपणें अनासक्त असूं शकेल; व ज्याचें शरीरावर चिंध्याखेरीज कांहीं नाहीं तो अत्यंत आसक्त असूं शकेल. ह्मणून, प्रथमतः अनासक्त होऊन मग सतत उद्योग करण्यास सुरुवात करावी. कर्मयोग आपणांस जे मार्ग दाखवून देईल, त्यांयोगानें सर्व आसक्तीचा परित्याग करण्यास आपणांस मदत होईल. अनासक्त होणें हें खरोखरच फार कठीण आहे.

सर्व आसक्तींचा परित्याग करण्याचे कर्म—योगांत दोन मार्ग सांगितले आहेत. एक मार्ग बाह्यसृष्टींतील मदतीवर अथवा ईश्वरावर ज्यांचा भरंवसा नाहीं अशा लोकांकरितां आहे. अशा लोकांची स्वतःच्या कल्पना अथवा युक्त्या यांवरच मदार असते. ते आपल्या इच्छाशक्तीनें, मनःशक्तीनें व विवेकसामर्थ्यानें 'मला अनासक्त झालेंच पाहिजे' असें ह्मणतात. जे आस्तिक आहेत ह्मणजे ज्यांचा ईश्वरावर भरंवसा आहे त्यांजकरितां दुसरा मार्ग आहे. हा मार्ग पहिल्यापेक्षां पुष्कळच सुगम आहे. आस्तिक आपल्या कृत्यांचीं फळें परमेश्वरास अर्पण करितात. ते कर्माचरण करितात, पण तज्जन्य फलाविषयीं कधीं आसक्ति ठेवीत नाहींत. ते जें जें पाहतात, ऐकतात, करितात अथवा त्यांना ज्या ज्या गोष्टींचें ज्ञान होतें, तें सर्व परमेश्वराकरितांच होय. कोणतेंही सत्कृत्य आपण

केलें, तर, त्याबद्दल आपण स्तुतीची अपेक्षा कधींही करूं नये. जें जें कृत्य आपण करितों तें तें परमेश्वराचें होय; व ह्मणूनच त्याचें फल परमेश्वरास अर्पण केलें पाहिजे. आपल्या आयुष्यांत आपण जीं मोठमोठीं कामें करितों त्यांचा फायदा आपणांस मिळावा असें आपण कधींही मनांत आणूं नये, इतकेंच नव्हे, तर आपण एकादें सत्कृत्य केलें आहे असेंही आपणांस वाटतां कामा नये. सर्व कृत्य परमेश्वराचें आहे. आपण अलिप्त राहून असा विचार करावा कीं, सर्व शक्तिमान् परमेश्वर आपला स्वामी आहे व आपण त्याचे आज्ञाधारक सेवक आहों; प्रतिक्षणीं जें जें कृत्य आपणांकडून घडतें तें करण्यास परमेश्वराकडूनच आपणांस स्फूर्ति मिळते. जें जें तुम्हीं पूज्य मानितां, जें जें तुम्हीं पाहतां व जें जें तुम्हीं करितां तें तें परमेश्वरास अर्पण करून समाधान माना. अंतर्यामीं नेहमीं पूर्ण शांतवृत्ति धारण करून शरीर, मन व आपलें सर्वस्व परमेश्वरास कायमचें अर्पण करा. जुन्या चालीप्रमाणें अग्नीस आहुति देऊन होम करण्यापेक्षां आपल्या छोटयाशा स्वत्वाचाच रात्रंदिवस महायज्ञ करा. '(परमेश्वरा!) या जगांत संपत्तीचा शोध करितां करितां तुजवांचून दुसरी संपत्ति मला आढळली नाहीं, अतएव मीं तुला आपली आहुती देतों; माझ्या भक्तिच–प्रेमाचें–स्थान शोधतां शोधतां तूंच एक मला आढळून आलास, म्हणून मी आपला देह तुला समर्पण करितों,' ह्या मंत्राचा आपण रात्रंदिवस जप केला पाहिजे;

व नेहमीं असें म्हटलें पाहिजे कीं, 'मजकरितां कांहीं नाहीं. कोणतीही वस्तु बरी असो, कीं वाईट असो, कीं कशीही असो. मला तिजबद्दल परवा नाहीं. मीं परमेश्वराचेठायीं सर्व कांहीं अर्पण करणार.' आपण रात्रंदिवस ह्या दृश्य स्वत्वाचा परित्याग करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. तो इतका कीं, आपणांस तशी संवय होऊन ती हाडामांसांत खिळली पाहिजे, व आपलें सर्व शरीर प्रतिक्षणीं ह्या आत्मपरित्यागाच्या कल्पनेच्या आज्ञेंत वागलें पाहिजे. असें झाल्यावर तुमुलयुद्धानें व तोफांच्या दीर्घगंभीर घोषानें दुमदुमलेल्या संग्रामभूमींत तुम्हीं जाऊन उभे राहिलां तरी तुम्हांस आपण विमुक्त असून प्रशांत स्थळीं आहों, असेंच वाटेल.

कर्मयोगामुळें आपणांस असें कळतें कीं, कर्तव्याची सामान्य कल्पना ( समाजरूप भूमीच्या ) खालच्या पातळांत आहे; तथापि आपणांसर्वांस कर्तव्य केलेंच पाहिजे. आपणांस आणखी असेंही आढळून येईल कीं, कर्तव्याची ही विशिष्ट कल्पना पुष्कळ अंशानें आपल्या दुःखास कारण होते. कर्तव्यरूपी रोगानें आपण ग्रस्त होऊन, त्याचा आपणांवर पूर्ण पगडा बसतो व आपल्या सर्व आयुष्याचा त्यामुळें बिघाड होतो. मानवी जीविताच्या नाशास हा रोग कारण होतो. 'हें कर्तव्य—ही कर्तव्याची—कल्पना-ग्रीष्म ऋतूंतील भर दुपारच्या उन्हाप्रमाणें मानवी अंतरात्म्यास भाजून काढिते.' कर्तव्याचे दास बनलेल्या गरीब

बिचाऱ्या मानवी प्राण्यांकडे पहा! कर्तव्यामुळें त्यांना परमेश्वराचे प्रार्थनेस व स्नानास सुद्धां वेळ मिळत नाहीं! कर्तव्याचा त्यांच्यावर नेहमीं पगडा आहेच. ते बाहेर कामाला गेले तरी, कर्तव्य त्यांच्या पाठीशीं लागलेंच असतें. घरीं आल्यावर दुसऱ्या दिवशीं काय करावयाचें याच्या विवंचनेंत ते असतात. तेथेंही कर्तव्य त्यांस सोडीत नाहीं! हें केवळ गुलामाचें जिणें होय, व तें खोगीर घातलेल्या घोड्याप्रमाणें शेंवटीं रस्त्यांत पडून मरण्यासारखेंच ह्मणावयाचें. ह्यालाच लोककर्तव्य असें समजतात. खरें कर्तव्य म्हटलें ह्मणजे अनासक्त राहून विमुक्तपणें कर्माचरण करणें व तें ईश्वरास समर्पण करणें हें होय. आपलीं सर्व कर्तव्यें परमेश्वराचींच होत. आपण खरोखरच धन्य आहों कीं, परमेश्वरानें आपणांस इहलोकीं जन्मास घातलें आहे. आपण आपल्या वेळचीं कर्तव्यें करितों; तीं बऱ्या कीं वाईट रीतीनें हें मात्र आपणांस कळत नाहीं. आपण तीं चांगलीं केलीं तरी त्यांचें फल आपणांस मिळावयाचें नाहीं; व वाईट केलीं तरी त्याबद्दलच्या काळजीचा मोबदला आपणास मिळावयाचा नाहीं. ह्मणून शांत व अलिप्त राहून कर्माचरण करा. अशा प्रकारची मुक्ति प्राप्त होणें फार कठीण आहे. कर्तव्य ह्मणजे रक्तमांसानें बनलेल्या शरीराचेठायीं असलेली दूषित आसक्ति अथवा गुलामगिरी होय असें ह्मणणें सोपें आहे. मनुष्यमात्र या जगांत द्रव्य अथवा त्याची ज्या वस्तूवर आसक्ति असेल त्या वस्तू-

करितां धडपडत असतो. याचें कारण काय ह्मणून त्यास विचारलें तर, तें कर्तव्य होय असें तो म्हणतो. तात्पर्य, कर्तव्यरूप पुष्पांनीं तो धनादिकांच्या ह्या असंबद्ध अतिलोभावर झांकण घालतो.

तर मग, शेवटीं, कर्तव्य ह्मणजे काय? आपल्या आसक्तीची प्रवृत्ति हेंच आपलें कर्तव्य बनतें. आसक्ति चांगल्या प्रकारें प्रस्थापित झाली ह्मणजेच आपण तिला कर्तव्य ही संज्ञा देतों. उदाहरणार्थ, ज्या देशांत लग्नाची चाल नाहीं त्या देशांत नवराबायकोमध्यें कर्तव्य म्हणून कांहीं नाहीं. लग्न झाल्यावर स्त्रीपुरुष प्रेमामुळें (आसक्तीनें) एकत्र राहूं लागतात. हा क्रम पिढ्यानुपिढ्या चालू राहून कायम झाला ह्मणजे त्यास कर्तव्याचें स्वरूप प्राप्त होतें. ह्मणजे हें एक चिरस्थायी दुखणेंच बनतें. कोणत्याही दुःखापासून तीव्रवेदना होऊं लागल्या ह्मणजे आपण त्यास रोग-दुखणें-ह्मणतों; पण तें चिरस्थायी झाल्यावर आपल्या अगदीं अंगवळणीं पडतें. तरी तें दुखणेंच होय. त्याचप्रमाणें आसक्ति—प्रेम—चिरस्थायी झाल्यावर कर्तव्य ह्या नांवानें त्यास आपण सुसंस्कृत करितों. ह्या प्रेमावर आपण पुष्पांचा वर्षाव करितों, त्याकरितां वाद्य गजर होतात व त्याजकरितांच पवित्र शास्त्रांतील मंत्रांचें उच्चारण करितात. मग सर्व जगाची लढाई जुंपून, कर्तव्याकरितां मनुष्यप्राणी एकमेकांस बुचाडतात. कर्तव्य आपल्या पशुपणास आळा घालतें तितक्यापुरतें तें चांगलें ह्मणतां येईल. ज्यांना

कर्तव्याची उदात्त कल्पनाच नाहीं, अशा सर्वांत खालच्या दर्जाच्या मनुष्यांस ह्या कर्तव्यापासून कांहीं उपयोग होईल; पण ज्यांना कर्मयोगी बनावयाचें आहे, त्यांनीं ही कल्पना सुद्धां झुगारून दिली पाहिजे. वस्तुतः तुह्मांला अगर मला कर्तव्य ह्मणून नाहींच. जें जें आपणांस जगाला द्यावयाचें असेल तें तें सर्व द्यावें; पण, कर्तव्य ह्मणून नव्हे. त्या संबंधाचा विचारच मनांत आणूं नये. तसें करण्याची आपल्यावर सक्ति नसावी. सक्तीनें आपण जें जें करितों त्यापासून आसक्ति उत्पन्न होते. तुह्मांस कर्तव्य तरी कशास हवें? सर्वकांहीं परमेश्वरास अर्पण करा ह्मणजे झालें. 'ह्या भयंकर अग्निकुंडांत कर्तव्यरूप अग्नि सर्वांस भाजून काढितो; करितां हा अमृताचा प्याला प्राशन करून सुखी व्हा.' आपण केवळ ईश्वराच्या इच्छेनुरूप वागतों; तेव्हां, सत्कृत्याबद्दल बक्षिस अथवा दुष्कृत्याबद्दल शासन ह्या गोष्टींशीं आपणांस कांहींच कर्तव्य नाहीं. तुह्मांस बक्षिस पाहिजे असेल तर शिक्षाही भोगिली पाहिजे; शिक्षेंतून सुटका करून घेण्यास बक्षिसाची हांव सोडली पाहिजे. दुःखांतून पार पडण्यास सुखाची आशा सोडली पाहिजे; कारण ह्या दोहोंची अगदीं सांगड आहे. एकाबाजूस सुख व एकाबाजूस दुःख आहे; त्याच प्रमाणें एकाबाजूस जीवित व दुसरीकडे मृत्यु आहे. मृत्युच्या पैलतीरीं जाण्याकरितां जीवितावरील प्रेमाचा त्याग केला पाहिजे. जीवन व मृत्यु ही एकच वस्तु आहे; मात्र, ती निरनिराळ्या दृष्टीनें आ-

पण पाहतों. ह्मणून, दुःखावांचून सुखाची आणि मृत्यू-
वांचून जीविताची कल्पना करणें लहान मुलांस अथवा
शाळेंतील विद्यार्थ्यांसच शोभेल. खरा विचारशील पुरुष
ह्या विरोधाचा त्याग करितो. तुम्हीं जें जें करितां त्याकरि-
तां स्तुतीची अथवा पारितोषिकाची अपेक्षा करूं नका.
आपण सत्कृत्य केलें कीं, त्याबद्दल शाबासकी मिळविण्या-
ची आपणांस इच्छा होतेच. एकाद्या धर्मकृत्यास आपण
द्रव्यद्वारा मदत केली कीं, लागलीच आपलीं नांवें वर्तमान-
पत्रांतून फडकलेलीं पाहण्याची आपली इच्छा होते. दुःख
हा अशा इच्छांचा अपरिहार्य परिणाम आहे. जगांत जे
सर्वश्रेष्ठ महापुरुष होऊन गेले त्यांची आपणांस ओळखही
नाहीं. त्यांच्याशीं तुलना करितां आपणांस ज्यांचीं नांवें
माहित आहेत ते बुद्ध व ख्रिस्त दुसऱ्या प्रतीचे योद्धे ठर-
तात. मुकाट्यानें ज्यांनीं आपला कार्यभाग उरकून घेतला
असे शेंकडों अज्ञात वीरपुरुष प्रत्येक देशांत होऊन गेले,
ते कोणास न कळत आयुष्यक्रमण करितात व नकळतच
इहलोकींची यात्रा संपवून जातात; कालेंकरून त्यांचे वि-
चार बुद्ध व ख्रिस्त यांच्याद्वारें प्रकट होऊन हे बुद्ध व
ख्रिस्तच आपणांस अवगत होतात. सर्वश्रेष्ठ पुरुष आप-
ल्या ज्ञानाच्या योगानें कीर्ति अथवा नांव मिळविण्याची
अपेक्षा करीत नाहींत. ते आपले विचार जगाकरितां ठेवून
जातात. ते स्वतःचा कोणताही हक्क दाखवीत नाहींत व
आपल्या नांवानें स्वमतप्रदर्शक संस्था अगर पद्धति स्था-

पून करीत नाहींत. त्यांचा सर्व स्वभावच असा बनलेला असतो कीं, अशा गोष्टींपासून ते नेहमीं पराङ्मुख असतात. असे लोक शुद्ध 'सात्विक' समजावे. ते कांहीं गडबड न करितां शांतपणें भक्तीरसांत विलीन होत्साते परमेश्वरापाशीं एकरूप होऊन जातात. हिंदुस्थानांतील एका गुहेंत राहणारा असा एक योगी मीं पाहिला. आजपर्यंत मीं जे जे लोक पाहिले त्या सर्वांत ह्या योग्याचें मला फारच आश्चर्य वाटलें. व्यक्तित्वाचा विकार त्याचे हृदयांतून इतका नाहींसा झाला आहे कीं, मानवी स्वत्व त्याच्या अंगांतून पूर्णपणें नाहींसें होऊन ईश्वराचें सर्वग्रहणसामर्थ्यच अवशेष राहिलें आहे. त्याच्या एका हाताला एकादा प्राणी चावला, तर, तो दुसराही हात त्याच्या पुढें करितो व ही परमेश्वराची इच्छा आहे असें ह्मणतो. त्याजकडे जें जें येतें तें परमेश्वराकडून येतें असें तो समजतो. तो मनुष्याच्या दृष्टीस पडत नाहीं; पण त्याचें हृदय प्रेमाचें केवळ आगर असून तें सत्यपर्ण व गोड विचारांनीं परिप्लुत असतें.

दुसऱ्या प्रतीच्या लोकांत रजोगुण अधिक असतो. त्यांची वृत्ति अधिक चंचळ असते. ते परिपूर्ण बनलेल्या पुरुषांचे विचार आपलेसे करून घेऊन त्यांचा जगाला उपदेश करितात. सर्वश्रेष्ठ पुरुष सत्य व उदात्त कल्पना मौनपणें एकत्र करितात, व बुद्ध आणि ख्रिस्त यांसारखे पुरुष त्यांच्यावतीनें जागोजाग जाऊन उपदेश करितात. गौतम बुद्ध स्वतःस पंचविसावा बुद्ध ह्मणत असे, असें

आपणांस त्याच्या चरित्रांत पुष्कळ ठिकाणीं आढळून येईल. त्याच्या पूर्वी जे २४ बुद्ध होऊन गेले त्यांची इतिहासास ओळख नाहीं; पण त्यांनीं उभारलेल्या पायावरच इतिहासास अवगत असलेल्या बुद्धानें आपली इमारत रचिली असली पाहिजे. सर्वश्रेष्ठ पुरुष शांत व मौनवृत्ति असून त्यांची जगास ओळख नसते. त्यांनाच विचारशक्तीचें खरें ज्ञान झालेलें असतें. त्यांची अशी खात्री असते कीं, आपण एकाद्या गुहेंत जाऊन बसलों व दार बंद करून घेऊन सत्यपूर्ण अशा पांचच विचारांचें चिंतन केल्यावर इहलोकींची यात्रा संपविली, तर, आपले हें विचारपंचक या जागांत शाश्वत वास करीत राहील. खरोखरच असे विचार पर्वतांस भेदून व महासागरांस ओलांडून सर्व जगभर पसरतील आणि मानवी अंतःकरणांत व मेंदूंत खोल शिरतील. असें झालें ह्मणजे, मानवी आयुष्यांतील कृत्यांमध्यें व्यावहारिक स्वरूपानें हे विचार व्यक्त करणारे स्त्रीपुरुष ह्या विचारांपासूनच निर्माण होतील. ह्या सात्विक लोकांचें परमेश्वराशीं इतकें साम्य असतें कीं, ते इहलोकींच्या भूतदयेकरितां कधींही चळवळ करीत नाहींत, झगडत नाहींत, अगर तिचा उपदेश करीत हिंडत नाहींत. ज्यांची चळवळ सतत चालू असते, ते कितीही चांगले असले तरी, त्यांच्यांत अज्ञानाचा थोडा बहुत अंश असावयाचाच. आपल्या प्रकृतिगुणांत थोडासा अशुद्धपणा राहीपर्यंतच आपणांस कर्माचरण करितां येईल. कर्माचा स्वभाव-

गुणच असा आहे कीं, हेतु व आसक्ति यांचेयोगानेंच सामान्यतः कर्माकडे प्रवृत्ति होते. चिमण्या किती पडतात याचीसुद्धां ज्याचेपाशीं नोंध असते अशा सतत कार्यदक्ष जगन्नियंत्या परमेश्वरापुढें मनुष्याला आपल्या कृतीस महत्त्व तरी कसें देतां येईल? जगांतील अत्यंत क्षुल्लक गोष्टीसंबंधानेंही परमेश्वर चिंता वाहतो, असें कळत असून त्याचे समक्ष मानवी कृतीचा महिमा गाणें म्हणजे ईश्वराची निंदा करणें नव्हे काय? आपलें काम म्हटलें म्हणजे, देवापुढें पूज्यबुद्धीनें व आदरयुक्त भीतीनें हात जोडून उभें राहून 'देवा! तुझी इच्छा बलीयसी' असें म्हणणें, हें होय. सर्वश्रेष्ठ पुरुषांची गोष्ट तशी नाहीं. त्यांना आसक्ति नसल्यामुळें कर्माचरण करण्याची जरूर नाहीं. "ज्यांचा आत्मा ब्रह्माशीं मिळून गेला आहे, ज्यांच्या इच्छा ब्रह्मापलीकडे कधींच जात नाहींत व जे ब्रह्मरूप बनले आहेत, त्यांजकरितां कर्म उरलेंच नाहीं." मनुष्य जातींतील सर्वश्रेष्ठ पुरुष म्हटले म्हणजे खरोखर हेच होत. अशा महा पुरुषांव्यतिरिक्त सर्वांस कर्माचरण केलेंच पाहिजे. अशा कर्माचरणापासून या विश्वांतील लहानसहान वस्तूंस तरी आपणांस मदत करितां येईल असें आपणांस कधींही वाटतां कामा नये. तसें करितां येणें आपणांस शक्य नाहीं. ह्या जगांतील व्यायामशाळेंत आपण आपलीच उन्नति करीत आहों. कर्माची खरी स्थिति अशी आहे, कर्माचरण करण्यास आपणांस अशी संधि मिळाली आहे,

हा आपला अधिकारविशेष आहे, असें आपण नेहमीं ध्यानांत ठेऊन कर्माचरण करूं लागलों ह्मणजे, आपण कधींही कोणत्याही वस्तूवर आसक्ति ठेवणार नाहीं. तुह्मां-सारखे व माझ्यासारखे लक्षावधि लोक जगांत आपण मोठे आहों असें समजतात; पण आपण सर्वजण मेलों ह्मणजे पांच मिनिटांत जग आपणांस पार विसरून जातें. ईश्वर मात्र अनंत आहे. ह्या सर्वशक्तिमान् परमेश्वराची इच्छा नसेल तर, एक क्षणभरही जीवित धारण करूं शकेल असा कोण आहे? सतत उद्योगशील परमेश्वराखेरीज दुसरा कोण अस-णार? सर्व सत्ता त्याचीच आहे, व सर्व कांहीं त्याच्याच आज्ञेंत आहे. त्याच्याच आज्ञेनें वारा वाहतो, सूर्य प्रका-शतो, पृथ्वी जीवित धारण करिते व इहलोकीं मृत्यु मोठ्या डौलानें मिरवतो. तोच सर्वश्रेष्ठ, सर्वस्व व सर्वव्यापि आहे. आपण त्याचीच भक्ति करावी. आपल्या कर्मांचीं सर्व फळें त्या-लाच अर्पण करावीं; सत्कृत्य हें सत्कृत्याकरितांच करा; असें केलें ह्मणजेच पूर्ण अनासक्ति प्राप्त होईल. अशा प्रकारें अंतःकरणाचीं बंधनें तुटून पडतील व आपणांस पूर्ण मुक्तीचा लाभ मिळेल. ही मुक्ति ह्मणजे कर्मयोगाची अवसानभूमि होय.

---

# प्रकरण ८ वें.

## कर्मयोगाची अत्युच्च कल्पना.



आपण भिन्न मार्गांनीं एकाच अवसानभूमी-प्रत जाऊन पोहोंचूं, ही वेदांतांतील सर्वश्रेष्ठ व प्रधान कल्पना आहे. ह्या मार्गांचे मीं सामान्यतः कर्म, भक्ति, अध्यात्म व ज्ञान असे चार वर्ग केले आहेत. पण तुह्मीं हेंही ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, ह्या वर्गीकरणामुळें एका मार्गाचा दुसऱ्यांत अगदीं अंतर्भाव होत नाहीं असें नाहीं. हे परस्परसांमिश्र आहेत; पण ज्यांत जो प्रकार प्रधान आहे त्यावरून त्यास तें नांव दिलेलें आहे. असा कोणीही मनुष्य नसेल कीं, ज्यांत कर्माचरणाशिवाय, अगर निःसीम भक्तीशिवाय अगर केवळ ज्ञानाशिवाय दुसरा कोणताही गुण सांपडणार नाहीं. आपणांस असें आढळून येतें कीं, हे चारही मार्ग शेवटीं एकाच केंद्रस्थानीं जाऊन मिळतात. सर्व धर्मांचें व कर्माच्या व भक्तीच्या सर्व पद्धतींचें एकच पर्यवसान आहे.

हें पर्यवसान कोणतें हें मीं पूर्वीं सांगितलेंच आहे. हें पर्यवसान ह्मणजे मुक्ति असें मीं समजतों. आपणासभोंवतीं

जें जें दिसतें तें सर्व—परमाणूपासून मनुष्यापर्यंत व निर्जीव, अचेतन अणुरेणूपासून तों इहलोकींचें अत्युच्च अस्तित्व जो मानवी आत्मा त्यापर्यंत—मुक्तीकरितां झगडत आहे. वस्तुतः हें सर्व विश्व मोक्षप्राप्तीच्या ह्या धडपडीचेंच फल होय. सर्व प्रकारच्या एकीकरणांतील प्रत्येक परमाणु आपापल्या मार्गाचें अवलंबन करीत असतो, ह्मणजे तो इतर परमाणूंपासून दूर दूर जात असतो; इतर परमाणूही त्यास आपल्याकडे ओढीत असतात. पृथ्वी सूर्यापासून व चंद्र पृथ्वीपासून दूर दूर जाण्याचा प्रयत्न करीत आहे. प्रत्येक वस्तूची अनंत दिशांकडे जाण्याची प्रवृत्ति आहे. सारांश, ह्या विश्वांत आपण जें जें पाहतों त्या सर्वांच्या मुळाशीं मोक्षाकरितां ही एकच धडपड चालू आहे. ह्या प्रवृत्तीच्या प्रोत्साहनामुळेंच साधुजन परमेश्वराची प्रार्थना करितात व चोर चोरी करितो. कोणतेंही कृत्य करण्याची दिशा अयोग्य असली ह्मणजे आपण त्यास दुष्कृत्य ह्मणतों, व तें योग्य व उत्तम प्रकारें व्यक्त झालें ह्मणजे आपण त्यास सत्कृत्य ह्मणतों. पण दोन्ही प्रसंगीं आपली प्रवृत्ति मुक्त होण्याकडेच असते. साधुपुरुषास आपल्या स्थितींतील बंधनाचें ज्ञान होऊन तिचें त्याला ओझें वाटतें व तिजपासून आपली सुटका करून घेण्याकरितां तो परमेश्वराची भक्ति करितो. चोराला आपणापाशीं अमुक वस्तू नाहींत ह्या कल्पनेनें त्रास होत असतो व ही उणीव नाहींशी करण्याकरितां तो चोरी करितो. सर्व सचेतन किंवा अचे-

तन सृष्टीचें पर्यवसान मोक्षांतच आहे; व कळत अगर न कळत प्रत्येक वस्तु त्या अवसानभूमीकडे जाण्याचा प्रयत्न करीत असते. साधुपुरुषास जें स्वातंत्र्य अथवा जी मुक्ति पाहिजे असते ती चोराच्या स्वातंत्र्याहून अगदींच निराळी आहे. साधुपुरुषास ज्या मुक्तीची आवड असते तिजपासून त्याला अनंतकालपर्यंत अवर्णनीय सुखाचा लाभ होतो, व जीवर चोराचें मन बसलेलें असतें तिजमुळें इतर बंधनें उत्पन्न होऊन तीं त्याच्या आत्म्यास अधिक जखडून टाकितात.

प्रत्येक धर्मांत मुक्तीकरितां चालू असलेल्या खटाटोपाचें आविष्करण केलेलें आहे; सर्व नीतिशास्त्राचा व निष्कामतेचा हा पाया आहे. ही निष्कामता ह्मणजे 'मनुष्यें व त्यांचीं चिमुकलीं शरीरें एकच आहेत' ह्या कल्पनेपासून मुक्तता करून घेणें होय. एकादा मनुष्य सत्कृत्य करितो अथवा इतरांस मदत करितो, तेव्हां त्याचा अर्थ असा समजावयाचा कीं, ह्या मनुष्याचा 'मीं व माझें' ह्या मर्यादित वर्तुळांत समावेश करावयाचा नाहीं. स्वार्थापासून आपली सुटका करून घेण्याच्या ह्या कृत्यास मर्यादेचें बंधन नाहीं; सर्व प्रकारच्या मोठमोठाल्या आचारनीतिशास्त्रांत पूर्ण निरिच्छपणाच आपलें इतिकर्तव्य आहे असें सांगितलें आहे. अशा प्रकारें मनुष्य पूर्ण निरिच्छ बनला ह्मणजे त्याचें काय होतें? तो 'अमका' अगर 'तमका' अशा संकुचित मर्यादेंतून सुटतो. त्याला अनंत

व्यापकत्व प्राप्त होतें. त्याचें पूर्वीचें व्यक्तित्व अथवा लहा-
नसें स्वत्व अजिबात नाहींसें होऊन त्याला अनंतत्व येतें.
ह्या अनंत व्यापकत्वांतच सर्व धर्मांचें, सर्व नीतिशास्त्रांचें
व सर्व तत्वज्ञानाचें पर्यवसान आहे. व्यक्तित्ववादी तत्व-
ज्ञानाची ही कल्पना ऐकूनच भयभीत होतो. पण खरें
पाहूं गेलें तर, तो ज्या नीतीचा उपदेश करितो, ती हीच
कल्पना होय. तो मनुष्याच्या निरिच्छपणास मर्यादेचें
बंधन ठेवीत नाहीं. व्यक्तित्वपद्धतीनें मनुष्य पूर्णपणें नि-
रिच्छ बनला ह्मणजे इतर पद्धतींनीं पूर्णत्वास पोंचलेल्यांत व
ह्यांत भेद काय समजावयाचा? तो विश्वाशीं एकरूप झाला
आहे व तसें होणें हें सर्वांचें इतिकर्तव्य आहे; पण बि-
चाऱ्या व्यक्तित्ववाद्याला आपल्याच तर्कशास्त्राच्या खऱ्या
सिद्धांतांचें अनुकरण करण्यास धैर्य नसतें. सर्व मानवी
स्वभावाचें पर्यवसान ज्यांत आहे त्या मोक्षपदाप्रत जाणें,
ह्यालाच 'कर्म-योग' ह्मणतात. प्रत्येक स्वार्थपर कृत्यामुळें
ह्या पदाप्रत आपण जाऊं शकत नाहीं. निरिच्छपणानें
त्याची आपणांस प्राप्ति होते. ह्मणून, नीतीसंबंधानें एकच
व्याख्या देतां येणें शक्य आहे. ती व्याख्या अशी:—'जें
स्वार्थपर आहे तें नीतीला सोडून आहे व ज्यांत स्वार्थ
मुळींच नाहीं, ह्मणजे जें निरिच्छपणानें भरलेलें आहे, तें
नीतीस धरून आहे.'

पण आपण विस्तारानें विचार करूं लागलों तर, ही
गोष्ट इतकी सुगम नाहीं असें आपणांस दिसून येईल. उदा-

हरणार्थ मीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें परिस्थितीच्या मानानें ही विस्तृत हकीकत भिन्न प्रकारची असते. एकच कृत्य एकाच प्रकारच्या स्थितींत निरिच्छपणाचें असूं शकेल व इतर प्रसंगीं तेंच कृत्य अगदीं स्वार्थपर असेल. ह्मणून, आपणांस सामान्य व्याख्या मात्र देतां येईल. विस्तृत हकीकतीसंबंधानें स्थल, काल व स्थिति यांच्या योगानें होणारे भिन्न परिणाम लक्षांत घेतले पाहिजेत. एका देशांत जें वर्तन नीतीचें मानतात, तेंच स्थित्यंतरामुळें दुसऱ्या देशांत अनीतीचें समजतात. मुक्ति हेंच सर्व सृष्टीचें पर्यवसान आहे. मनुष्य पूर्णपणें निरिच्छ बनल्याशिवाय ही मुक्ति संपादन करितां येत नाहीं. निरिच्छपणाचें प्रत्येक कृत्य, प्रत्येक विचार व शब्द हीं आपणांस मुक्तिरूप अवसानभूमीकडे घेऊन जातात व ह्मणूनच हीं सर्व नीतीचीं आहेत असें आपण समजतों. ही व्याख्या सर्व धर्मांस व सर्व प्रकारच्या आचारविचारांस सारखी लागू पडते. कित्येक विचार पद्धतीप्रमाणें नीतीची उत्पत्ति परमेश्वरापासून आहे. ह्या पद्धतीनें विचार करणारांस अमुक गोष्ट कां करावी व अमुक कां करूं नये असें विचारिलें, तर तें ह्मणतात कीं 'परमेश्वराची तशी आज्ञा आहे.' नीतीचें उगमस्थान कोणतेंही असलें तरी, ह्यांच्या आचारनीतिशास्त्राच्या नियमांतही स्वत्वाचा नाश करणें हीच प्रधान कल्पना आहे. असें आहे तरी, कित्येक लोक स्वत्वाचा त्याग करण्याच्या विचारानेंच भिऊन जातात. ह्या लहानशा स्वत्वास

चिकटून राहणाऱ्या मनुष्यास पूर्णपणें निरिच्छ बनलेल्या, स्वत:विषयीं विचार न करणाऱ्या, स्वतःकरितां कोणतेंही कृत्य न करणाऱ्या व आपणासाठीं एक शब्दही न उच्चारणाऱ्या मनुष्याच्या स्थितीसंबंधानें विचार करण्यास सांगून मग त्याचें स्वत्व कोठें आहे ह्मणून विचारावें. तो जोंपर्यंत स्वत:करितां बोलेल व स्वत:करितां विचार अगर कृत्य करील तोंपर्यंतच त्यास स्वत्वाचें ज्ञान होईल. इतर लोक, अखिल सृष्टि व विश्व यांविषयीं त्याचे मनांत विचार येतील तर त्याचें स्वत्व कोठें राहील? अर्थांत तें समूळ नाहींसें होईल.

यावरून असें सिद्ध होतें कीं, ' कर्मयोग ' ही आचार-नीतिशास्त्राची व धर्माची एक शाखा असून निरिच्छपणानें व सत्कृत्यांनीं मोक्षप्रद प्राप्त करून घेतां यावें असा तिचा उद्देश आहे. कर्मयोग्याचा कोणत्याही मतावर विश्वास नसला व तो नास्तिक असला तरी चालेल; आत्मा कशास ह्मणावें व अध्यात्मशास्त्र काय आहे या गोष्टींचाही विचार करण्याची त्याला आवश्यकता नाहीं. त्याचा विशेष रोख स्वार्थाची नीट ओळख करून घेऊन त्यांतून पार पडण्याकडे आहे. भक्त आपल्या भक्तीनें व ज्ञानी आपल्या विचारशक्तीनें व ईश्वरप्रेरणेनें ज्या कूटप्रश्नाचा उलगडा करितो तोच प्रश्न, उपपत्ति अथवा मत यांचे मदतीवांचून कर्मयोग्यास प्रत्येक क्षणीं स्वार्थाची प्रत्यक्ष ओळख करून घेऊन, सोडवावयाचा आहे.

आतां दुसरा एक प्रश्न आहे, तो असा:—हें कर्म ह्मणजे काय? जगाच्या कल्याणार्थ झटणें याचा अर्थ काय? आपल्या हातून जगाचें बरें होऊं शकेल काय? स्वतंत्रपणें विचार केला तर आपणांस जगाचें कल्याण करतां येणार नाहीं असें उत्तर द्यावें लागेल; सापेक्षार्थी आपण होय असें ह्मणूं. वस्तुतः आपणांस जगाचें कायमचें अथवा शाश्वत कल्याण करितां येणार नाहीं. तसें करितां आलें तर हें जग तें नव्हे. आपणांस कांहीं वेळपर्यंत मनुष्याची क्षुधा शांत करतां येईल; परंतु, पुन्हां तो बुभुक्षित होईल. ज्या ज्या सुखाचा आपण मनुष्यास पुरवठा करूं तें तें क्षणिक आहे असें आपणांस दिसून येईल. ज्या सुखदुःख-रूपी ज्वराचें सतत आवर्तन होणार त्यास कायमचें कोण बरें करूं शकेल? जगास कायमचें सुख देतां येईल काय? महासागरांत एका ठिकाणीं खाडा पडल्याशिवाय दुसऱ्या ठिकाणीं लाट उसळणार नाहीं. मनुष्याची जरूर व त्याचा लोभ या दृष्टीनें विचार केल्यास जगांतील चांगल्या वस्तूंची एकुणात नेहमीं तीच राहील. ती कमजास्त होणार नाहीं. आजपर्यंत आपणांस अवगत असलेला मानवी जातीचा इतिहास घेऊं. त्यांत आपणांस तींच सुख-दुःखें व स्थित्यंतरें आढळून येत नाहींत काय? कित्येक श्रीमंत, कित्येक गरीब; कित्येक उच्च, कित्येक नीच; कित्येक रोगी, कित्येक निरोगी असें आपण पाहत नाहीं काय? ही वस्तुस्थिति आज अमेरिकेंत

जशी आहे, तशीच इजिप्शियन व ग्रीक लोकांचे अमदानींत व प्राचीन रोमन लोकांचे कारकिर्दीत होती. इतिहासावरून पाहिलें तरी हा प्रकार आहे तसाच आहे; असें आहे तरी, ही असाध्य सुखदुःखें मिटविण्याचे सतत प्रयत्न चालू आहेत. इतरांचा आयुष्यक्रम सुरळीत करण्याकरितां ज्यांनीं परिश्रम केले असे सहस्रावधि स्त्रीपुरुष ऐतिहासिक कालाच्या निरनिराळया प्रत्येक भागांत निर्माण झाले. यांना कितपत यश मिळालें हें पाहूं गेलों तर, एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं चेंडू उडविण्यापलीकडे त्यांचे हातून कांहीं झालें नाहीं असें म्हणावें लागतें. शारीरिक पातळींतून दुःख काढून घेतलें म्हणजे तें मानसिक पातळींत प्रवेश करितें. डँटीनें* नरकाचें चित्र रेखाटलें आहे, त्यांत कृपणाचे हातीं सोन्याचा गोळा देऊन तो चढावर लोटण्यास सांगितलें आहे; त्यांतलाच हा प्रकार होय. ज्या ज्या वेळीं कृपण हा सोन्याचा गोळा वर लोटी त्या त्या वेळीं तो गोळा खालीं येई. ख्रिस्त पृथ्वीवर येऊन

* हा इताली देशांतील कविकुलगुरु होय. ह्याचा जन्म इसवी सन १२६५ त फ्लॉरेन्स शहरीं झाला. तो आपल्या वयाच्या ५६ वे वर्षीं ह्मणजे इ. स. १३२१त मृत्यु पावला. हा आपल्या वयाच्या ९ व्या वर्षीं प्रेमपाशांत सांपडला होता! त्याचा 'बिआंची' नांवच्या राजकीय पक्षाशीं संबंध असल्यामुळें त्यास हद्दपार करण्यांत आलें होतें. त्यानें आपल्या विवासस्थानीं 'डिव्हाइन कॉमेडी' ह्या नांवाचें महाकाव्य रचिलें, त्यांतच हें नरकाचें चित्र रेखाटलें आहे.

हजार वर्षें साम्राज्य करील व जिकडेतिकडे आनंदीआनंद होईल हें बोलणें शाळेंतील मुलांसच शोभेल. ह्या सहस्र-संवत्सराचें ज्या राष्ट्रांस स्वप्न पडतें, त्या सर्वांना असेंही वाटतें कीं, जगांतील सर्व लोकांपेक्षां त्या वेळीं आपल्यालाच जास्त लाभ मिळेल. आनंदाच्या सहस्रसंवत्सराची अपेक्षा करणाऱ्या मंडळीची ही निरिच्छपणाची कल्पना खरोखरच विलक्षण आहे!

आपल्याला जगांत सुखाची अगर दुःखाचीही भर टाकतां यावयाची नाहीं. इहलोकींच्या सुखदुःखांची बेरीज नेहमीं सारखीच राहील. आपण हीं सुखदुःखें इकडून तिकडे व तिकडून इकडे लोटतों, पण त्यांच्या प्रकृति-गुणांमुळें तीं तशींच व तितकींच राहतील. ही (सुख-दुःखाची) भरती व ओहटी—हा चढ व उतार—जगाच्या अंगचाच गुण आहे. ह्याच्या उलट कल्पना करणें ह्मणजे मृत्यूवांचून जीवित आहे असें ह्मणण्यासारखेंच होय. अशी कल्पना अगदींच मूर्खपणाची आहे; कारण मृत्यूशिवाय जीविताची व दुःखाशिवाय सुखाची कल्पनाच नाहीं. सतत जळत राहणें हें दिव्याचें जीवन आहे. त्याच प्र-माणें तुम्हांस जीवित हावें असेल तर त्याकरितां तुम्हांस प्रतिक्षणीं मेलें पाहिजे. एकच वस्तु भिन्न दृष्टीनें पाहिल्या-मुळें तिला जीवित व मृत्यु हीं दोन निरनिराळीं नांवें प्राप्त झालीं आहेत; एकाच लाटेचे हे उत्पात व अधःपात होत, व हीं दोन्हीं मिळून एकच वस्तु बनते. अधःपाताकडे पा-

हणाराला हें जग वाईट आहेसें वाटतें व उत्पाताकडे बघणारा हें जग फार उत्तम आहे असें ह्मणतो. मुलगा शाळेंत जाऊं लागला, व आईबाप त्याची काळजी वाहूं लागले ह्मणजे त्यास सर्व कांहीं सुखपूर्ण भासतें. त्यावेळीं त्याच्या गरजाही अगदीं साध्या असतात. पण वृद्ध मनुष्याची गोष्ट तशी नसते. नाना प्रकारच्या अनुभवांनीं त्याचें डोकें शांत होतें व त्याची तरतरी बरीच थंड पडते. ह्याच न्यायानें जुन्या राष्ट्रांस आपल्या ऱ्हासाचीं चिन्हें दिसूं लागून त्यांची आशा नवीन राष्ट्रांपेक्षां पुष्कळ कमी होते. हिंदुस्थानांत 'हजार वर्षें शहर व हजार वर्षें अरण्य' अशी एक ह्मण आहे. हें रूपांतर—शहराचें अरण्य व अरण्याचें शहर—सर्वत्र चालू आहे; व ज्या दृष्टीनें लोक ह्या जगाचा विचार करितात त्या दृष्टीनें तें त्यांस उत्तम अगर कनिष्ठ भासतें.

आतां आपण समानतेच्या कल्पनेबद्दल विचार करूं. वरील सहस्रसंवत्सराच्या कल्पना प्रचंड कर्मप्रवर्तक शक्ती बनल्या; त्यांच्या आधारावर पुष्कळ धर्मांनीं जगास असा उपदेश केला कीं, परमेश्वर सकल विश्वावर राज्य करण्यास येईल त्यावेळीं एकमेकांच्या स्थितींत मुळींच फरक राहणार नाहीं. ह्या मताचा उपदेश करणारे लोक भ्रांतबुद्धि असतात व हेच मनुष्यजातींत सर्वांपेक्षां अधिक कळकळीनें काम करितात. भ्रांतबुद्धीच्या मोहरूपी पायावरच ख्रिस्ति धर्माच्या उपदेशाची इमारत उभारली गेल्यामुळें ती

ग्रीक व रोमन गुलामांस इतकी मोहक वाटली ! ह्या गुलामां
असें वाटलें कीं, ख्रिस्ताचें सहस्रवार्षिक साम्राज्य सु
झालें ह्मणजे गुलामगिरीचा अजिबात लय होऊन खाण्य
पिण्याची अगदीं चंगळ उडून जाईल. ह्या आशेनेंच
ख्रिस्ती धर्माच्या पताकेखालीं जाऊन उभे राहिले. प्रथमत
ज्यांनीं ह्या कल्पनेचा उपदेश केला ते खरोखरच केवद
अज्ञानी होते; पण त्यांची कळकळ मात्र पराकाष्ठेची असे
अर्वाचीन कालीं ह्या सहस्रसंवत्सराचे आशेस निराळे
स्वरूप प्राप्त होऊन, त्यास 'स्वतंत्रता, समानता व बंधुता
ही संज्ञा प्राप्त झाली आहे. हेंही एक प्रकाराचें वेडच
आहे. खरी समानता या पृथ्वीवर आजपर्यंत कधींही झाली
नाहीं व या पुढेंही ती होणें शक्य नाहीं. इहलोकीं
आपण सर्वजण समसमान कसे होऊं? ही अशक्य
समानता ह्मणजे मरणच होय. हें जें जग आपण पाहतों
तें कशानें बनलें आहे? ह्या समतोलपणा नाहींसा झाल्या-
मुळेंच. ज्या प्राथमिक स्थितींत अस्ताव्यस्तपणा आहे असें
आपण ह्मणतों तींतच पूर्ण समतोलपणा आहे. तसें नसेल
तर विश्वघटक सर्व शक्ती कोठून येतात? अर्थात् एकमेकांशीं
झटपट करून, लढून व वरचढ करूनच. कल्पना करा कीं,
कोणत्याही पदार्थांतील सर्व परमाणू समतोल आहेत;
अशा स्थितींत त्यांजपासून कांहीं निष्पत्ति होईल काय?
तसें होणें अशक्य आहे, हें आपणांस पदार्थविज्ञानशास्त्रा-
मुळें कळतें. पाण्याच्या पृष्ठभागाला चलन द्या; ह्मणजे

तुह्मांस असें आढळून येईल कीं, जलबिंदूंतील प्रत्येक परमाणु इतरांशीं झगडून पूर्ववत् शांत होण्याचा प्रयत्न करीत आहे. त्याचप्रमाणें ज्यांना आपण विश्व ह्मणतों ते सर्व दृग्विषय व त्यांतील सर्व वस्तू पूर्ण समतोलपणा मिळविण्याकरितां एकमेकांशीं झगडत आहेत. चलनवलन होऊन पुनः परमाणू एकत्र होणें व त्यांपासून उत्पत्ति होणें हा अनुक्रम सतत चालावयाचाच. विषमता—असामनता—हा उत्पत्तीचा पायाच आहे. आणखी हेंही ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, उत्पत्तीला समानता नष्ट करणाऱ्या शक्तींची जितकी जरूर आहे, तितकीच समानता मिळविण्याकरितां झगडणाऱ्या शक्तींचीही आहे.

विश्वांतील सर्व झगडणाऱ्या शक्तींचा पूर्ण समतोलपणा अथवा परिपूर्ण समानता या जगांत असणें शक्यच नाहीं. ह्या स्थितीप्रत पोंचण्यापूर्वीं जग कोणत्याही प्रकारच्या जीवितधारणेस अगदीं नालायक बनेल व त्यांत कांहींच शेष राहणार नाहीं. यावरून असें सिद्ध होतें कीं, ह्या परिपूर्ण समानतेच्या व सहस्रसंवत्सराच्या कल्पना अशक्य आहेत इतकेंच नव्हे, तर त्या अंमलांत आणण्याचा आपण प्रयत्न केल्यास आपणा सर्वांचा विनाशकाल अगदीं समीप आला आहे असें खास समजावें. मनुष्यामनुष्यांत जो फरक आहे तो बहुतांशीं मेंदूचाच आहे. जन्मतःच सर्वांच्या मेंदूची शक्ति सारखी असते असें ह्मणणारा मनुष्य हल्लींच्या काळीं वेड्याखेरीज दुसरा कोणी

आढळणें दुरापास्त आहे. आपलें बुद्धिवैभव जन्मतःच कमी जास्ती असतें. आपण जन्मतःच लहान मोठे असतों; ही स्थिति आपल्या जन्मापूर्वींच नक्की झालेली असते; म्हणून तींतून सुटण्याची आपणांस आशाच नको. अमेरिकन इंडियन हजारों वर्षें अमेरिकेंत होते. तुमचे शें दोनशें पूर्वज ह्या अमेरिका खंडांत कांहीं दिवसांपूर्वीं आले.* त्यांनीं ह्या देशाचें स्वरूप किती तरी बदलून टाकिलें! तेथील मूळच्या लोकांत व तुमच्या पूर्वजांत कांहीं फरक नाहीं असें म्हणावें तर, मूळच्या इंडियन लोकांनीं आपल्या देशांत सुधारणा करून मोठमोठालीं शहरें कां वसविलीं नाहींं? तुमच्या पूर्वजांबरोबर भिन्न बुद्धिवैभव या देशांत आलें व तें त्यांच्या मनावर पूर्वसंस्कारानें झालेल्या परिणामामुळें व्यक्त झालें. भिन्नत्वाचा पूर्ण अभाव म्हणजे मृत्यु होय. ह्या जगाच्या हयातीपर्यंत भिन्नता राहणार व ती राहिली पाहिजे. जगाच्या उत्पत्तीचा फेरा पुरा होऊन तें लयास गेलें ह्मणजेच पूर्ण समानतेचें सहस्रसंवत्सर येईल. त्यापूर्वीं समानतेचें नांव घेणेंच नको. ही समानता मोठी कर्मप्रवर्त्तक शक्ति आहे यांत मात्र संशय नाहीं. उत्पत्तीला असमानतेची जितकी जरूर आहे तितकीच तिला मर्यादित करण्याकरितां झगडणाऱ्या शक्तींची आवश्यकता आहे. बंधमुक्त होऊन ईश्वराकडे जाण्याकरितां खटाटोप होणार नाहीं तर, उत्पत्तिही बंद राहील. ह्या दोन शक्तीं-

* हें बोलणें अमेरिकन लोकांस उद्देशून आहे.

तील भेदांमुळेंच मनुष्याचे हेतू कोणत्या प्रकारचे आहेत, हें निश्चित होतें. ह्या कर्मप्रवर्तक हेतूंपैकीं कांहींची प्रवृत्ति नेहमीं बंधनाकडे व कांहींची मोक्षाकडे राहील.

हें चक्रांत चक्र असलेलें जगाचें यंत्र फारच भयंकर आहे. यांत आपण हात घातला व तो सांपडला कीं, आपली भरपाई झाली म्हणून समजावें! आपणां सर्वांना वाटतें कीं, आपण अमुक एक कर्तव्य केलें म्हणजे आपणांस विश्रांति मिळेल; पण तें कर्तव्य संपण्यापूर्वींच दुसरें आपली मार्गप्रतीक्षा करीत असतें. हें अवजड व घोंटाळ्याचें जगरूपी यंत्र आपणां सर्वांस त्याजबरोबर ओढीत असतें. त्यांतून पार पडण्यास दोनच मार्ग आहेत. एक मार्ग ह्मटला म्हणजे, ह्या जगाशीं असलेले सर्व संबंध सोडून देऊन जगापासून अगदीं अलिप्त राहणें, हा होय. अर्थात् ह्या मार्गाचें अवलंबन करणें म्हणजे सर्व वासनांचा परित्याग करणें होय. असें ह्मणणें फार सोपें आहे, पण त्याप्रमाणें वर्तणें बहुतेक अशक्यच आहे. एक दोन कोटींच्या लोकसंख्येंत अशा रीतीनें वागणारा एकही मनुष्य सांपडेल कीं नाहीं याबद्दल मला शंका आहे. जगांत अगदीं निमग्न होऊन कर्माचरणाची गुरुकिल्ली काय आहे हें नीट समजावून घेणें हा दुसरा मार्ग होय. हाच 'कर्म-योगा'चा मार्ग आहे. जगद्यंत्राच्या चक्रांपासून दूर न पळतां त्यांतच राहून कर्माचें गुह्य काय आहे, तें ह्या मार्गानें नीट समजून घेतलें पाहिजे. ह्या जगचक्रांत

राहून योग्य रीतीनें कर्माचरण केल्यानें आपणांस त्यांतून पार पडतां येणें शक्य आहे. ह्या यंत्रांतूनही बाहेर पडण्याचा मार्ग आहे.

कर्म ह्मणजे काय हें आतां आपणांस समजलें आहे. कर्म ह्मणजे सृष्टीच्या पायांपैकीं एक भाग असून, तें सतत चालू असतेंच. जे आस्तिक आहेत, त्यांना तें इतरांहून अधिक चांगलें कळतें; कारण, ईश्वराला आपल्या मदतीची जरूर लागेल इतका तो असमर्थ नाहीं हें त्यांस पूर्णपणें समजतें. हें विश्व सतत चालू राहिलें तरी, आपल्या महत्वाकांक्षेची परमावधि मोक्ष अथवा निष्कामता यांतच आहे. कर्मयोगाच्या दृष्टीनें हें मोक्ष किंवा निष्कामत्व संपादण्यास कर्माचरणच केलें पाहिजे. जगाला पूर्णपणें सुखी करण्याच्या सर्व कल्पना माथेफिरू मंडळीस प्रवर्तक शक्ती या दृष्टीनें चांगल्या वाटतील; पण त्यांच्या ह्या वेडाचे जितके चांगले तितकेच वाईट परिणाम घडतात, हें आपणांस लक्षांत ठेविलें पाहिजे. कर्मयोगी असा प्रश्न करील कीं, कर्माचरण करण्यास मोक्षाविषयींच्या नैसर्गिक प्रेमाशिवाय दुसऱ्या हेतूची काय जरूर आहे? तुह्मी जगांतील सामान्य हेतूंच्या अगदीं पलीकडे असा. 'कर्म करण्यांस तुह्मांला अधिकार आहे, पण तज्जन्य फलाविषयीं नाहीं.' ह्या तत्वाचें ज्ञान करून घेऊन त्याप्रमाणें आचरण करण्यास मनुष्य आत्मशिक्षणानें तयार होऊं शकेल, असें कर्मयोग्याचें ह्मणणें आहे. सत्कार्य करणें हा

मनुष्याच्या अस्तित्वाचाच एक भाग बनला ह्मणजे, त्याला बाह्य हेतूंची अपेक्षाच राहत नाहीं. सत्कर्म करणें चांगलें ह्मणूनच सत्कर्म करा. स्वर्गप्राप्तीकरितां सुद्धां जो सत्कर्म करितो, तो आपणांस बंधनांत टाकतो, असें कर्मयोग्याचें म्हणणें आहे. अगदीं यत्किंचित् स्वार्थदृष्टीनें कोणतेंही कृत्य केलें तरी, तें आपणांस विमुक्त करण्याऐवजीं, आपल्या पायांत आणखी एक शृंखला अडकवितें!

तेव्हां, कर्मफळांची आशा न धरितां, त्या सर्व फलांचा त्याग करणें हाच काय तो एक मार्ग आपणांस उरला आहे. हें जग म्हणजे आपण किंवा आपण म्हणजे हें जग नव्हे. आपण शरीर नव्हों व वस्तुतः आपण कर्माचरण करीत नाहीं. आपण नेहमीं शांत व स्थिर असें ब्रह्मरूप आहों. आपण कसलेंही बंधन कां करून घ्यावें? आपण डोळ्यांत आसूंही आणूं नये; कारण आत्म्याला, ब्रह्माला, दुःखाश्रूच नाहींत. कळवळ्यानें आपल्या डोळ्यांत अश्रुधारा येऊं नयेत. आपल्याला अश्रू गाळणें योग्य दिसतें व परमेश्वरही आपल्या सिंहासनावर कळवळ्यानें अश्रुधारा गाळीत असेल असें आपणांस वाटतें. असा ईश्वर प्राप्त करून घेण्याच्या लायकीचा नाहीं. ईश्वरानें कां अश्रू गाळावे? रडणें ही बंधनाची व दुर्बलतेची खूण आहे. आपण पूर्णपणें अनासक्त असावें असें म्हणणें फार चांगलें, पण त्याप्रमाणें कृति घडण्यास फार परिश्रम केले पाहिजेत. बाह्य हेतु मनांत न धरतां आपण जें जें सत्कृत्य करूं तें नवीन शृंखलेनें

आपणांस बद्ध न करितां पूर्वीच्या बंधनशृंखलेंतीलच एक सांखळी कमी करील. फलाची अपेक्षा न धरितां जो जो सुविचार आपण जगाकडे पाठवूं तो जगांत राहून आपल्या बंधनांतील एकेक सांखळी कमी करील. अशा रीतीनें आपण दिवसेंदिवस अधिकाधिक शुद्ध बनत जाऊं व शेवटीं आपलें आचरण अत्यंत शुद्ध होईल. हें सर्व सकृद्दर्शनीं केवळ तात्विक, काल्पनिक व असंबद्ध आणि अधिक औपपत्तिक दिसेल; श्रीमद्भगवद्गीतेविरुद्ध मीं कित्येक मतें ऐकिलीं आहेत व पुष्कळांचें असें म्हणणें आहे कीं, हेतूशिवाय कर्माचरण करणेंच अशक्य आहे. असे लोक मायेफिरूपणाच्या तावडींत सांपडले म्हणजेच त्यांस निष्काम कर्म दिसूं लागतें; त्याशिवाय त्याची त्यांस कल्पनाही नसते. म्हणूनच ते असें ह्मणतात.

आतां उपसंहार करण्यापूर्वीं, कर्म–योगाचा उपदेश ज्यानें खरोखर अमलांत आणिला, त्या महात्म्याबद्दल चार शद्ब सांगतों. हा महात्मा बुद्ध होय. ह्यानेंच कर्मयोगाचें तत्व पूर्णपणें अमलांत आणिलें. बुद्धाशिवाय इतर जे सिद्ध-पुरुष या जगांत होऊन गेले, त्यांनीं बाह्य हेतूंनीं प्रेरित होऊन निष्काम कर्म केलें. हा एक अपवाद खेरीज करून बाकीच्या सर्व सिद्ध पुरुषांचे दोन वर्ग करितां येतील. एका वर्गांतील पुरूष स्वतःला पृथ्वीवरील ईश्वरी अवतार समजतात व दुसऱ्या वर्गांतील पुरुष आपण देवदूत आहों असें मानितात. ह्या दोहोंसही कर्म करण्यास बाह्य सूत्रींतून

प्रोत्साहन मिळतें; मात्र त्यांची भाषा कितीही अध्यात्मिक असली तरी, त्यांस बाह्य सृष्टीकडून कांहीं फलप्राप्ति होत नाहीं. सिद्ध पुरुष बुद्ध ह्यानें एकव्यानेंच असें म्हटलें कीं, 'परमेश्वराविषयीं तुमचे निरनिराळे सिद्धांत काय आहेत हें समजून घेण्याची मला दरकार नाहीं. आत्म्यासंबंधाच्या सर्व सूक्ष्म मतांची वाटाघाट करून काय करावयाचें आहे? सत्कृत्य करा व सदाचरणी व्हा. त्या योगानें तुम्ही विमुक्त होऊन तुह्मांस सत्यप्राप्ति होईल.' बुद्धानें आपल्या आयुष्यक्रमांत स्वतःकरितां कसलीही अपेक्षा केली नाहीं, व त्याच्यापेक्षां कोणीही अधिक कार्य केलें नाहीं. बुद्धाइतकें उच्चपद ज्यानें संपादन केलें, असा एकतरी सिद्धपुरुष इतिहासांत दाखवा. सर्व मनुष्यजातींत बुद्ध हा एकच सिद्धपुरुष निर्माण झाला. त्याचें तत्वज्ञान व त्याचा कळवळा ह्यांना साम्यच नाहीं. ह्या महातत्वज्ञान्यानें अत्युच्च तत्वज्ञानाचा उपदेश केला, तरी, त्याचे पोटांत कनिष्ठ प्रतीच्या प्राण्यांविषयीं अत्यंत कळवळा असे व त्यानें कोणत्याही गोष्टीबद्दल आपला हक्क दाखविला नाहीं. हाच अतिश्रेष्ठ कर्मयोगी होय. ह्याचें वर्तन केवळ अहेतुक असे. मानवी जातीचा इतिहास पाहिला तर असा सिद्धपुरुष आजपर्यंत या जगांत निर्माण झाला नाहीं असें ह्मणावें लागेल. बुद्धाचे ठायीं दयार्द्र अंतःकरण व विशाल बुद्धिवैभवाचें अद्वितीय संमेलन दृष्टीस पडतें. त्याचप्रमाणें बुद्धाची परमात्मशक्तिही अलौकिक आहे. या जगांत बुद्ध

ह्या एकच—पहिला व सर्वश्रेष्ठ सुधारक होऊन गेला. "प्राचीन हस्तलेखांवरून, राष्ट्रीय श्रद्धेवरून, किंवा बाल्यावस्थेपासून तुह्मांस तशी संवय लागली आहे ह्मणून, कोणत्याही गोष्टीवर तुमची श्रद्धा बसतां कामा नये; प्रत्येक गोष्टीसंबंधानें विचार करा; तिचें पृथक्करण करा व तिजपासून तुह्मांसर्वांचें कल्याण होईल, अशी तुमच्या मनाची खात्री झाली तरच तिजवर विश्वास ठेवा, त्याप्रमाणें आपलें वर्तन ठेवा व इतरांसही तद्वत् आचरण करण्यास सांगा," असे उद्गार काढण्याचें धैर्य प्रथमतः बुद्धानेंच केलें. जो मनुष्य अहेतुक कर्म करितो, तोच उत्तम कर्म आचरितो; कारण, त्याला द्रव्याची, कीर्तीची अगर कसलीही अपेक्षा नसते. कोणत्याही मनुष्याचे अंगीं असें करण्याचें सामर्थ्य आलें कीं, तो बुद्ध बनला ह्मणून समजावें. अशा मनुष्यापासून सर्व जगाचें स्वरूप बदलून टाकणारी शक्ति प्रकट होईल. असा पुरुष ह्मणजे कर्मयोगाच्या सर्वश्रेष्ठ कल्पनेचें प्रत्यक्ष स्वरूपच होय.



सुलभपरमार्थज्ञानमाला.

पुष्प २ रें.

# भक्तियोग.

लेखक,

गुणग्राही.

प्रकाशक

दामोदर सांवळाराम आणि मंडळी.

बडोदें

" पूर्णचंद्रोदय " छापखाना.

सन १९००.

किंमत ६ आणे.



# प्रस्तावना.

मूकं करोति वाचालं पंगुञ्ज लंघ्यते गिरिम् ।
यत्कृपा तमहं वंदे परमानंदमाधवम् ॥ १ ॥

श्रीमद्भगवद्गीता.



अमावास्येची रात्र; बारांचा अंमल; काळोख घन तिमिर; डोळ्यांत तेल घातलें तरी कांहीं दिसत नाहीं; तशांत जलप्रवास; समुद्राचें पाणी अपरंपार; एकटें जहाज; त्यांतही तुफान वारा; आकाशांत अभ्रें दाटलेलीं; लाटापर्वतप्राय उसळत आहेत; केवळ वर आकाश व खालीं पाणी; जवळ पास झाड नाहीं, झुडूप नाहीं, डोंगर नाहीं, बत्ती नाहीं, कीं किनाऱ्याचा कांहीं मागमूस नाहीं. जहाज वर खालीं आदळतां आदळतां केव्हां कलंडेल, व त्यास केव्हां जलसमाध मिळेल, किंवा तें कोणीकडे भडकेल याचा कांहीं नेम नाहीं. अशा दुर्धरप्रसंगीं वरील उतारूची स्थिति

किती बरें करुणास्पद असेल? तीस कांहीं पारावार असेल काय? मुळींच नाहीं. त्याचप्रमाणें नानाप्रकारच्या उपाधी-रूप प्रचंड लहरींनीं गरजणाऱ्या, मनोविकारात्मक तुफान वाऱ्यानें खवळलेल्या, त्रिविध तापांच्या कुंद अभ्रांनीं दाट-लेल्या, व अज्ञानरूप घन तिमिर अंधःकारानें ग्रासलेल्या ह्या संसार समुद्रामध्यें आम्हां मानवांची—संसारिकांचीही अ-त्यंत करुणास्पद स्थिति आहे, असें ह्मटल्यास कांहीं प्रत्य-वाय नाहीं. कारण उघडच आहे कीं, संसार ह्मटला ह्मणजे त्यांत किती व्याप असतो, किती संताप असतो, किती संकटें असतात, केवढाले जिवास बद्ध करणारे प्रचंड पाश असतात, व सन्मार्ग व ईश्वरभक्ति ह्यांपासून मनोवृत्ति हटविणारीं किती कचाटें असतात, याचा अनुभव प्रत्येक संसारिकास पदोपदीं येत असतोच. तेव्हां संसार ह्मणजे एक अफाट समुद्रच आहे असें ह्मटल्यास कांहीं हरकत नाहीं. आयुःक्रमण हा त्याचा जबरा प्रवाह, व आपला देह, हें त्यांत हेलकावे खाणारें जहाज होय. हातपाय ह्या त्या जहा-जाच्या डोलकाठ्या; सदसद्विवेक हें त्याचें सुकाणूं; आणि आपला जीव हा त्यावरील दीनवाणा उतारू होय. असें हें ईश्वरनिर्मित नानाविध साहित्यानें भरलेलें जहाज, ह्या जबऱ्या प्रवाहांत लोटलें आहे. जहाज फार उमदें खरें; पण प्रवाहाची ओढ पडली अनिवार! त्यामुळें त्यास ‘ धड ऐल तीर ना पैल तीर ’ अशी दशा प्राप्त झाली आहे. बरें; इतकें असूनही त्या बिचाऱ्यावर इतर कचाटें किती! सांगून सोय नाहीं. एकीकडून तुफान लाटा असल्यामुळें, त्यास घडोघडीस प्रचंड धक्के बसत आहेत; व दुःखोक्तांची

तीव्र खडपें समोर नाळीवरच येऊन; जणों काय नाळच चिरीत आहेत; तों दुसरीकडून 'कृतांतकटकीनें चारी बाजूनें गराडा घातला आहे, तशांत दुर्बुद्धिरूप मगरी व इतर भयंकर जलचरें 'स्वाहा' करावयासाठीं 'आ' पसरून बसलीं आहेत! तितक्यांत कामक्रोधासारखे भुजंग पिळखे देऊन गरळानळानें अगदीं भाजून काढीत आहेत; ह्यामुळें जहाजाच्या फळ्यान् फळ्या खिळखिळ्या होऊन, व सुकाणूं परतें ढिलें पडून; निमिषार्धांत त्याचा चुराडा होतो कीं काय, अशी क्षणोक्षणीं भीति असते. तेंही असो; निदान इतक्यावरच भागतें काय? तर तेंही नाहीं. पुढें जन्ममरणाच्या अनेक प्रचंड भोंवऱ्यांत सांपडून, उतारूंच्या चिंधड्या उडावयाच्या असतात, (त्या वेगळ्याच!) उतारूस तर पैलथडीस जाऊन सत्यसूर्याच्या दिव्यप्रकाशकिरणाखालीं परमात्मसुखाच्या खाशा वाळवंटांत रहावें; व सच्चिदानंदाच्या शीतळ छायेंत अक्षय्य आराम घेत पडावें, असेंच सारखें वाटत असतें. आणि 'आज जाऊं; उद्यां जाऊं; परवां तिकडे नाळ फिरवूं' असें तो नेहमीं मनांत घोकीत असतो. परंतु पाण्याची सारी ओढ पुढें; यमराज बंदराकडे! तिकडेच जहाज अगदीं दोरी लावल्याप्रमाणें सरासर खेंचीत जात असतें; आणि तें बंदर पडलें मनस्वी खडकाळ! तेथें गेल्यावर चुराडा ठेवलेलाच! कोणचीही मात्रा तेथें चालत नाहीं. मग तेथें ह्या लटक्या सुकाणाचा काय पाड? ब्रह्मानंदाचा सुखकर व रमणीय किनारा राहतो भलतीकडेच! आणि खरेंच! तो किनारा तरी सहजासहज मिळतो कसा? मध्यें तर वर सांगितलेल्या शें-

कडों अडचणी, तेव्हां तडीस केव्हां व कसें जावें, हाच मुळीं गहन प्रश्न! असें होतां होतां सर्वच मुसळ केरांत जातें. ह्मणजे अखेरचा जो काय निकाल लागावयाचा तो लागतोच! आणि जहाज मात्र व्यर्थ रसातळास जातें. हाय! हाय! अशीं हजारों जहाजें ह्या संसार तुफानांत सांपडत आहेत, सांपडलीं आहेत, व आज केक वर्षे गोते खात आहेत. त्यांस ना दिशा; ना रोख; ना होका; ना बत्ती! तीं भलतीकडच्या भलतीकडे भटकत आहेत! आपलें पहिलें मकाण कोणतें, अर्थात् आपण आलों कोठून? सध्यां कोठें व कोणत्या कचाटांत आहों? पुढें कोठें जावयाचें, अर्थात् कोणता मुक्काम गांठावयाचा? पुढें बत्ती (लाईट हाउस) आहे किंवा नाहीं? असेल तर कोणीकडे व कशी? आपली दिशा बरोबर आहे, किंवा चुकीची आहे? ह्याचाही—जीव—उतारूंस, ठाव ठिकाण नसतो. सारे, 'रिक्ता भवन्ति भरिता, भरिताश्च रिक्ता' किंवा 'पुनरपि जननं पुनरपि मरणं' ह्या सृष्टीचक्राच्या भोंवऱ्यांत गरगरा गिरक्या खात असतात. सारांश, सारेंच फुटकें व अशाश्वत! ह्या संसारांत आह्मां जीवांची इतकी करुणास्पद स्थिति आहे यांत तिळमात्र संदेह नाहीं.

आतां आम्हांस तर ह्या अशा विपन्नावस्थेंतून पार पडलें पाहिजे. तेव्हां ह्या अफाट व दुःखमय संसारसमुद्रांतून पैल थडीस जावयाचें तर आह्मांस खरी दिशा दाखविणारा एक होका, व बंदर करावयास एक बत्ती, दिसावयास कांहीं साधन हवें. हा होका व बत्ती ह्मणजे भक्ति व ज्ञान, हीं होत. भवजाळांत भ्रमलेल्या आह्मां मानवी प्राण्यांस, हीं

दोन्हींही दाखवून देणें हें महत्कार्य आहे;—नव्हे महत्पुण्याई आहे, आणि हीं दाखवून देईल तो महात्मा होय. असे महात्मे पूर्वकाळीं किती तरी होऊन गेले; आज आहेत; व पुढेंही होतीलच. पूर्वीच्यांनीं जे सत्य व सुखप्रद असे ब्रह्मपद प्राप्तीचे मार्ग आंखून ठेवलेले असतात, तेच मार्ग पुढचेही दाखवून देतात. त्यांत नवीन असें कांहीं नाहीं. तथापि पुढच्यांत विशेष ह्मणून एवढेंच कीं, पूर्वीच्यांनीं दाखविलेले मार्ग जेथपर्यंत मळलेले असतात, तेथपर्यंत कांहीं नड नाहीं; पण पुढें तें, कालांतरानें बरेच मळीण होतात, त्यांजवरचा सारा केरकचरा, घाणसाण, सर्व झाडून टाकून, हे स्वच्छ करून ठेवतात; त्यांतील खांचखळगे सर्व दुरुस्त करतात; आणि जाणारांस ते मार्ग सुलभ, निर्भय, सत्य व सुखावह आहेत ह्मणून दाखवितात. असे जे कोणी सन्मार्गदर्शक महात्मे आजवर होऊन गेले, त्यांतच हल्लीं श्रीमद्विवेकानंद स्वामी हे अवतीर्ण झाले आहेत. जिव्हाग्रीं साक्षात् वागीश्वरी स्थापून स्वामींनीं, अमेरिका व इंग्लंद ह्यांसारखे सर्व कलासंपन्न व ज्ञानाच्या कळसास पोंचलेले देशास सुद्धां डुलावयास लावलें, हें तर हल्लीं सर्वांस विदित झालेंच आहे. तेव्हां त्यांचें माहात्म्य काय सांगावें? त्यांनीं ज्ञानयोग, भक्तियोग, राजयोग, व कर्मयोग ह्या योगचतुष्टयावर अत्यंत रसभरित, व अध्यात्मिक ज्ञानानें भरलेलीं व्याख्यानें दिलीं, आणि अमेरिकेंतील व इंग्लंदांतील श्रोतृवंदाच्या चित्तवृत्ती हिरावून घेतल्या. तो, स्वामींच्या अनुभविक ज्ञानाचा; अस्खलित व हृदयंगम वक्तृत्वाचा; बहुश्रुत व भारदस्त विवेचनाचा;

मधून मधून हृदयांत सत्याचा प्रकाश पाडणाऱ्या, आत्म्यास आनंदाचा चटका लावून सोडणाऱ्या, आणि नादान चोंचल्यावर मृदु पण कठोर प्रहार करीत जाणाऱ्या विनोदी भाषणाचा लाभ, खरोखरीच अनुपमेय होय! तेव्हां अर्थातच ह्या सृष्टिचक्रांत भ्रमण पावलेल्या मानवांच्या अंतःकरणांत जमलेलीं अज्ञानपटलें पार काढून टाकून, स्वा ।नीं सत्यसूर्याचीं दिव्य प्रकाशकिरणें आंत शिरकाँ लीं आहेत; आपल्या पूर्वापार अद्वैतसिद्धांतांची, व वेदमार्गाची, स्वच्छ, खरीखुरी निशाणी त्यांनीं आह्मांस उजेडांत आणून दाखविली आहे; आणि संसारसागरांत गटकळ्या खाणाऱ्यांस त्यांनीं आपल्या वाणीरूपानें अंशतः तरी हात दिला आहे, असें ह्मटल्यास वावगें होणार नाहीं. ह्मणजे वर सांगितलेलें महत्कार्य त्यांनीं बरोबर करून दाखविलें आहे, व ती महत्पुण्याईही त्यांनीं पुरी जोडली आहे, यांत कांहीं संशय नाहीं. असो.

ज्यांस थोडेसें इंग्रजीचें ज्ञान आहे, त्यांसच **स्वामी विवेकानंद** ह्यांच्या वर सांगितलेल्या रसाळ वाणीचा अनुपम लाभ मिळणार. परंतु आंग्लभाषानभिज्ञांसही तो लाभ मिळणें फार अगत्याचें आहे. यासाठीं तसा प्रयत्नही मोठमोठ्या विद्वानांनीं व लेखनपटूंनीं आरंभिला आहे, व कोणा राजयोग, कोणी कर्मयोग, कोणी ज्ञानयोग, अशा निरनिराळ्या लेखकांनीं निरनिराळ्या प्रतिकृति हातीं घेतल्या आहेत. त्यांतच प्रस्तुत लेखकानें भक्तियोगाचें प्रतिबिंब उठविण्याचा हा अल्पसा प्रयत्न केला आहे.

भक्तियोग हें केवळ प्रेमाचें भांडार, ज्ञानाचा सागर; आनंदाचा निधि, सत्याची मूस; आणि मूर्तिमंत भगवानास प्रयत्न करून घेण्याचा अगदीं राजमार्ग होय. ह्या योगांत **श्रीमद्विवेकानंद स्वामींनीं**, मानवजातीचा खरा कळवळा घेऊन, हें जग भ्रमाच्या भोंपळ्यांत कसें बुडालें आहे, हें निरनिराळ्या उदाहरणांनीं, स्पष्ट दर्शविलें आहे. आणि परमेश्वर प्रेमस्वरूप आहे, तो प्रेमानेंच त्वरित वश होणारा आहे, ह्मणजे 'भगवंत भुकेला भक्तीचा पाहुणा' किंवा 'दयाघन भक्तीनें आकळिला' ह्या कविवचनाप्रमाणें देव भावाचा भुकेला व भक्तीनें आकळलेला आहे; हें परमतत्व मोठ्या प्रेमळवाणीनें सिद्ध केलें आहे. तेव्हां अर्थातच भक्तियोगाच्या परिशीलनानें, आबालवृद्धांच्या मनोमंदिरांत प्रेमाची दिव्य ज्योत प्रज्वलित होईल; कालावधीनें जिकडेतिकडे प्रेमाचेंच रोप वाढीस लागून त्याच्या प्रभावानें व्यापसंताप विलयास जातील; तंटेबखेडे, चोरचिलटें, यांचा नायनाट होईल; 'क्रूर, उन्मत्त, भांडखोर' वगैरे कठोर शब्द कोशांत नांवास सुद्धां राहणार नाहींत; कलहाचें बीज मोडेल; घरादारांत आनंदीआनंद खेळेल; मनें गंगाजळवत् होतील; शत्रूसुद्धां मित्रत्व धरतील; सौख्यनिधीस भरती येईल; आत्मतत्वाचा सुंदर मोड उगवेल; नीतीचा उगम, साधूंचा समागम, सत्याचा उदय, व परमानंदाचा लाभ होईल; आणि अखेरीस प्रेमाचा पुतळा जो परमात्मा—सच्चिदानंद, त्याची गांठ पडेल. असें ह्या भक्तियोगाचें—अर्थात् प्रेमाच्या शास्त्राचें—महात्म्य आहे. आणि महानुभाव **स्वामी विवेकानंद** ह्यांनीं त्यावर आपल्या

अमृतोपम शब्दांनीं स्वाद आणिला आहे. मग त्याची गोडी काय सांगावी? केवळ अप्रतिम!! असो.

आधींच एखादा पदार्थ फार आवडीचा असावा, व तो अनायासें प्राप्त व्हावा, ह्मणजे मनास जो आनंद वाटतो, तो केवळ अप्रतिम होय. तद्वत्च प्रस्तुत लेखकास जो विषय अत्यंत प्रिय; ज्याचें त्याच्या मनांत अहोरात्र चिंतन; ज्याच्या सत्यस्वरूपदर्शनाची त्याच्या मनांत फार फार उत्कंठा; तोच ईश्वरविषयक प्रेमाचा—भक्तीचा—विषय त्याच्या हातीं आला, व 'मूकं करोति वाचालं, पंगुम् लंघ्यते गिरिं,' अशा भगवत्प्रसादानें त्याच्या हातून तो निर्विघ्नपणें शवटास गेला, ह्याबद्दल प्रस्तुत लेखकास फार समाधान वाटलें आहे. प्रस्तुत लेखकानें आपणांकडून मुळचा विषय होईल तितका सुगम, चटकन् वाचकांच्या मनांत भरे असा, आणि मुळांतील अर्थाचा, व विचाराचा विपर्यास न व्हावा, असा वठविण्याचा यथामति यत्न केला आहे. आतां इतक्याउप्परही त्यांत कांहीं विसंगतपणा दिसून येईल, तर तो दोष मुळांतला नव्हे, तर प्रस्तुत लेखकाचा ह्मणजे भक्तियोगाचें प्रतिबिंब उठविणाराच्या अज्ञानाचा आहे, असें समजावें. तसेंच, भक्तियोगाचें हें तंतोतंत प्रतिबिंबच वठविलें आहे, अशांतला अर्थ नव्हे, तर तें रूपांतर केलें आहे, असें समजावें. प्रस्तुत लेखकाचा हा पहिलाच प्रयत्न असल्यामुळें, व भाषाभिन्नत्वामुळें मूळचें स्वारस्यांत बरीच कमतरता आली असेल, तरीही ह्या अल्पशा प्रयत्नानें रसिक व श्रद्धाळू वाचकांच्या गोडीची, व प्रेमाची कळा चढण्यास यत्किंचित् तरी साधन होईल,

अशी आशा आहे. ह्या यत्नांतील गुणाचा भाग प्रेमानें ग्रहण करून, निःपक्षपातानें यथोचित दोषस्थळें कोणी दाखवून दिल्यास, त्यांचा प्रस्तुत लेखक फार फार आभारी होईल. असो. आतां, एवढें सांगून प्रस्तुत यत्नांत एका मार्मिक विद्वान् गृहस्थांनीं ( नांव प्रसिद्ध न करावें, अशी त्यांची इच्छा आहे, याबद्दल फार वाईट वाटतें! ) मनस्वी साहाय्य केलें, व हस्तलिखित प्रत लक्षपूर्वक अथपासून इतिपर्यंत अवलोकन करण्याची फार तसदी घेतली, याबद्दल त्यांचे फार फार आभार मानून, शेवटीं ज्या परमेश्वरानें ही सत्सेवा मजसारख्याच्या हातून घडविली, त्याची साधुवर्य तुकारामाच्या एका सुप्रसिद्ध अभंगानें पुन्हा एक वार प्रार्थना करून, हा प्रास्ताविक लेख पुरा करतों.

हेंचि दान देगा देवा । तुझा विसर न व्हावा ॥
गुण गाईन आवडी । हेंचि माझी सर्व जोडी ॥
नलगे मुक्ति धन संपदा । संतसंग देगा सदा ॥
तुका म्हणे गर्भवासीं । सुखें घालावें आम्हांसी ॥१॥
बोलिलीं लेंकुरें । वेडीवांकडीं उत्तरें ।
क्षमा करा अपराध । महाराज तुम्हीं सिद्ध ॥

गुणग्राही.

# अनुक्रमणिका.



ॐ

# भक्तियोग.

## प्रकरण १ लें.

स तन्मयो ह्यमृत ईशसंस्थोज्ञःसर्वगोभुवनस्यास्य गोप्ता।
य ईशे अस्य जगतो नित्यमेव नान्यो हेतुर्विद्यते ईशनाय ॥
यो ब्रह्माणं विदधाति पूर्वं यो वै वेदान् प्रहिणोति तस्मै ।
तं ह देवं आत्मबुद्धिप्रकाशं मुमुक्षुर्वै शरणमहं प्रपद्ये ॥

"तोच एक विश्वात्मा; तोच अजरामर; तोच सर्व सत्ताधीश; तोच सर्वसाक्षी; सर्वव्यापी; ब्रह्मांडपालक; ज्याला आदिही नाहीं, व अंतही नाहीं, असा सनातन प्रभुही तोच. हें-जगड्व्याळ सृष्टिचक्र चालवावयास त्या एका **परमात्म्या**वेगळा दुसरा कोणीही समर्थ नाहीं. ज्यानें सृष्टीच्या उत्पत्तिकालीं **ब्रह्म्यास** निर्माण करून **वेद** त्याच्या स्वाधीन केले, त्या एका **परमात्मबुद्धिप्रकाशकाला**, कीं ज्याच्या प्रकाशानें (ज्ञानानें) बुद्धि **आत्म्याकडे** धांव घेते त्या **परमेश्वरास** मी मुमुक्षु शरण आहें."

**श्वेताश्वतर उपनिषद् ६-१७-१८.**

# भक्तीचें लक्षण.



भक्तियोग हा परमेश्वरास शोधण्याचा, अस्सल, अगदीं खराखुरा मार्ग होय. तो भक्तींतून उगम पावून, तींतच निरंतर वास्तव्य करून शेवटीं तींतच लय पावणारा आहे. निस्सीम ईश्वरभक्तीचें एक क्षणभर जरी वेड लागलें, तरी तें सनातन मोक्षपदाची प्राप्ती करून देतें. **नारदमुनि** आपल्या **भक्तियोगाच्या** टीकेंत ह्मणतात कीं, **"भक्ति ह्मणजे परमेश्वराविषयीं आत्यंतिक अढळ प्रेम.** अशा प्रकारचें प्रेम जेव्हां मनुष्याच्या अंगीं बाणतें, तेव्हां सर्वभूतां वर त्याचें प्रेम जडतें; तो कोणाचाही तिरस्कार करीनासा होतो; आणि त्याच्या अंतरीं सदासर्वकाळ समाधानवृत्ति खेळत राहते."—"ह्या प्रेमापासून कोणत्याही ऐहिक सुखाचा लाभ घेतां येणार नाहीं." कां कीं, जावत्काळपर्यंत ऐहिक विषयोपभोगाच्या इच्छा मनांत वागत आहेत, तावत्काळपर्यंत तशा प्रकारचें प्रेम प्राप्त होण्याची आशाच नको!

"भक्ति ही कर्माहून श्रेष्ठ, व योगाहूनही उच्चप्रतीची आहे. कारण त्या दोहोंत, कर्मांत व योगांत, कांहीं एक तिसरा हेतु साधावयाचा असतो. पण तीच भक्ति पहा! तीच तिचें प्रतिफल; तीच तिचें साधन; व तीच तिचा लय होऊन राहते."

भक्ति हा एक आमच्या ऋषिवर्यांचा ठरीव विषय झालेला आहे. भक्तीचें वर्णन करणारे कांहीं विशिष्ट ग्रंथकार, उदाहरणार्थ शांडिल्य, नारद, इ० बाजूस ठेवले तरी, व्याससूत्राचे महान् महान् टीकाकार, उघड उघड ज्ञानयोगाचें प्रतिपादन करणारे, अशांनींही 'भक्ती' संबंधानें बऱ्याच गोष्टी सुचविल्या आहेत. कित्येक टीकाकारांचा झोंक असा असतो कीं, सर्वच नव्हे तरी पण बहुतेक मूळ वाक्यांचा अर्थ, शुष्क ज्ञानपर करूं लागावयाचें. तथापि 'पूजनविधी' वरील ईश्वरभक्तिविषयक कांहीं सूत्रांचा तसा ज्ञानपर अर्थ लावतांनां त्यांची बरीच त्रेधा उडालेली दिसून येते.

केव्हां केव्हां, ज्ञान व भक्ति ह्यांत बरेंच अंतर आहे, असें लोकांस वाटत असतें. पण खरोखरी तसा कांहीं त्या दोहोंत तादृश फरक नसतो. आपण जसजसे त्यांची सरहद्द गांठीत जाऊं तसतसें आपणास कळून येईल कीं, त्या दोहोंचेही—भक्तीचे व ज्ञानाचे—मोहरे एकाच केंद्राकडे वळले आहेत; आणि शेवटीं तीं मिळतात, तींही एकाच बिंदूंत! त्याचप्रमाणें राजयोगाचीही तीच गत आहे. मुक्ति मिळावी, ह्मणून त्याचा जेव्हां एकसारखा अभ्यास चालवावा, मात्र तो भोळ्या बापड्यांस भोंदून टाकण्यासाठीं, किंवा लोकांच्या डोळ्यांत धूळ फेंकण्यासाठीं (दुर्दैवाची गोष्ट ही कीं, छांछूं, जारणमारणें, मंत्रतंत्रादि करणारांच्या हातून वारंवार तसें होतें खरें!) नव्हे,—तेव्हां तो राजयोग आपणांस त्याच बिंदूपाशीं, ह्मणजे जेथें भक्ति व ज्ञान एकवटतात, तेथेंच नेऊन सोडतो.

भक्तीची मोठी सोय म्हटली म्हणजे ही कीं, **तीं अगदीं सोप्यांत सोपी आहे,** आणि ती **ईश्वराच्या सन्निध जाऊन ठेंपण्याचा अगदीं राजमार्ग आहे.** तिचा एक मोठा दुर्गुण आहे, तो हा कीं, तिच्या अगदीं पहिल्या पहिल्या—खालच्या—पायऱ्यांशीं हिडिस् धर्म—वेडेपणा, माथे-फिरूपणा, उत्पन्न होण्याचा संभव असतो. **हिंदु, मुसलमान,** व **ख्रिस्ती** इत्यादि धर्मांतही नेहेमीं जे कित्येक धर्मवेडे आढळून येतात त्यांच्या त्या धर्मवेडेपणाची उत्पत्ति तरी भक्तीच्या ह्या खालच्या पायरीपासूनच झालेली असते. आपल्या ध्येय वस्तूवर—म्हणजे जिच्यावर प्रेम ठेवावयाचें त्या वस्तूवर—ईश्वरावर—जी एकनिष्ठा ठेवावी लागते, कीं जी असल्याशिवाय खरें प्रेम, भक्ति म्हणून जें काय असतें, त्याचा मोड उगवायाचाच नाहीं, तीच बहुशः हर-एक अन्य गोष्टीस विघातक होऊन बसते. खालच्या प्रतीचे जे लोक असतात, त्यांची आपल्या ध्येय वस्तूवर भक्ती करण्याची तऱ्हा हीच एक असते, ती म्हणजे दुसऱ्या ध्येय वस्तूंचा—अन्य देवांचा, किंवा मूर्तींचा—तिरस्कार करणें ही होय. कित्येक वेळां असें पाहण्यांत येतें कीं, जो मनुष्य आपल्या आवडत्या परमेश्वरस्वरूपावर निस्सीम प्रेम ठेवतो, तोच मनुष्य एखादी अन्य देवाची प्रतिमा त्याजपुढें नेल्यास किंवा तीविषयीं त्यानें ऐकल्यास तो लागलाच वेताल होऊन अद्वातद्वा बरळूं लागतो. हें असें कां व्हावें? ह्या प्रश्नाचें समाधान वरच्या वाक्यांत आढळून येईल. अशा तऱ्हेची भक्ति म्हणजे कांहींशी 'ज्याची खावी भाकरी, त्याचीच करावी चाकरी' अशा श्वानबुद्धी-

पैकींच होय. आपल्या धन्याच्या मालमत्तेवर सक्त पाहरा ठेवावयाचा; तिऱ्हाइतास आपल्या वईच्या आंत पाय ठेवूं द्यावयाचा नाहीं. पण ती श्वानबुद्धिच एक परी बरी म्हणावयाची! कारण, कुत्रा, आपला धनी कसल्याही वेषानें–पोषाखानें आला, तरी तो त्यास ओळखतो, कीं, हा आपला धनी आहे, शत्रु नव्हे. पण तेंच मनुष्याचें पहा! त्याजपुढें तोच एक ईश्वर जर निरनिराळ्या स्वरूपानें आला तर त्यास त्याची ओळख पटत नाहीं! त्या धर्मवेड्यांस सद्‌सद्विवेक मुळीं बियांससुद्धां नसतो. अशा लालांस व्यक्तिविषयक विचार ह्मणजे इतके कांहीं निर्णायक वाटतात कीं त्यांचें सर्वस्व काय तें, तें! मग, दुसरा काय म्हणतो, त्याच्या म्हणण्यांत कांहीं तथ्य आहे किंवा नाहीं, इत्यादि विचारांस त्यांच्या मनांत थारा कोठून मिळणार? त्यांस विशेषतः पाहिजे असतें तें हेंच कीं, हा असें बोलणारा कोण बरें असावा? ज्यांचीं मतें आपल्या मतांशीं जुळतात, अशा मंडळींत ज्याची वर्तणूक सभ्यपणाची, प्रेमाची, व दयालुत्वाची असते, तोच मनुष्य, आपल्याहून ज्यांचीं मतें भिन्न आहेत, किंवा ज्यानें आपल्या धर्मास मिठी मारलेली नाहीं, अशा अन्य गृहस्थाशीं, थोरपणा, व धर्ममर्यादा खुंटीस गुंडाळून, बेताल वागण्यास मागें पुढें पाहत नाहीं.

भक्ति ही जेव्हां आपल्या **गौणी**–खालच्या–स्वरूपांत असते, तेव्हांच फक्त ह्या वर सांगितलेल्या गोष्टीचें भय बाळगावें लागतें. परंतु एकदां का ती परिपक्व झाली, व आपल्या **परा**–उच्च–स्वरूपास जाऊन पोंचली म्हणजे त्या धर्मवेडेपणाचा कोठें मागमूससुद्धां लागत नाहींसा होतो.

ह्या उच्चस्वरूपी भक्तीनें एकदां आत्मा भरून गेला म्हणजे तो **परमेश्वर**स्वरूपाच्या इतका निकट जाऊन भिडलेला असतो कीं, तेथें द्वेषभावाला मुळीं वाटच मिळत नाहीं.

ह्या इवल्याशा आयुःक्रमामध्यें आपल्या **स्वभावाची** ठी जुळविण्याची कला—म्हणजे स्वभाव चांगला बनविण्यास, जीं जीं उत्कृष्ट तत्वें—साधनें—लागतात, तीं सर्व एकवटून ठेवण्याचें—सर्वांसच साधत नसतें. तथापि, जेथें भक्ति, ज्ञान, व योग हीं समप्रमाणानें एकवटलीं आहेत, तेथें सर्वोत्कृष्ट स्वभावाची सुरेख प्रतिमा वठली आहे, असें म्हटल्यास हरकत नाहीं. पक्ष्यास उडावयाचें झालें तर, तीन साधनें आवश्यक असतात. दोहोंकडे दोन पंख, व सुकाणूंसारखें उपयोगी पडणारें एक शेंपूट—दूम. तसेंच, **ज्ञान** हा एक पंख, व **भक्ति** हा दुसरा जोडीदार—आणि **योग** हें त्या दोहोंसही एका तरवारींत चालविणारें मार्गदर्शक दूम होय. तेव्हां अर्थातच हीं तिन्हीही ज्यांना समप्रमाणानें चालविण्याचें साधत नाहीं त्यांस सर्वांत सोपा, आपला भक्तिमार्गच बरा ह्मणन तोच पत्करावा लागतो. परंतु ह्या सर्वांत हें एक अवश्य व नेहमीं ध्यानांत वागविलें पाहिजे कीं, पूजाविधि, व त्यास लागणारीं मंत्रतंत्रें हीं सर्व जरी आत्म्याच्या प्रगतीस अति आवश्यक आहेत, तरी वर सांगितलेली ईश्वराविषयीं उच्च तऱ्हेची भक्ति (परा) मात्र त्यांच्यायोगानें अंगांत बाणते, यापलीकडे त्यांत कांहीं जीव नसतो.

ज्ञानवादी व भक्तिवादी–भक्त–हे दोघेही भक्तीच्या अंगीं एक प्रकारची विलक्षण शक्ति आहे, हें कबूल करतात, तरी त्या दोघांचा थोडासा मतभेद असतो. ज्ञानी लोक भक्ति हें नुसतें मोक्षाचें साधन समजतात, परंतु भक्त, ती केवळ मोक्षाचें साधन असें समजूनच राहत नाहींत, तर तिनें साध्य करण्याची (केवळ) वस्तुही तीच, असें ते समजतात. पण मला वाटतें ह्या वादांत कांहीं विशेष तथ्य नाहीं. खरें पाहतां, भक्ति जेव्हां साधनस्वरूपी असते, तेव्हां तो एक खालच्या प्रतीचा पूजनप्रकार होतो. पण त्याहून जरा उच्च पायरीच्या पूजनविधींनीं सत्य उमगलें–किंवा अनुभव साक्षात्कार झाला–ह्मणजे दोन्हीही एकाच स्वरूपास मिळतात. वरील दोन्हीही पक्ष आपआपल्या विशेष पूजनप्रकाराविषयीं, ‘ माझें तेंच खरें ’ असा आग्रह धरितात. पण त्यांस ह्या तत्वाची कशी भूल पडते कोण जाणे? कीं ईश्वरविषयक प्रेम किंवा भक्ति पूर्णतेस पावल्यावर ज्ञान हें त्या मागून आपोआप–दोरी लावून ओढल्याप्रमाणें येतेंच; तसेंच ज्ञान पूर्ण झालें कीं तें प्रेमाशीं ऐक्य पावतेंच.

हें लक्षांत ठेवून, आतां मोठमोठे वेदांतटीकाकार ह्या विषयावर काय काय ह्मणतात, तें पाहूं या. ‘ **आवृत्तिरसकृदुपदेशात्** ’ ह्या सूत्रावरील भाष्यांत **भगवान् शंकराचार्य** ह्मणतात “ लोक केव्हां केव्हां असें ह्मणतात कीं, ‘ त्यानें आपला देह स्वामीस–प्रभूस–वाहिला आहे, किंवा तो गुरूस ‘ जीवकीं प्राण ’ भजतो. ’ आतां हे जे धन्यवाद लोकांच्या तोंडून निघतात, ते कोणाविषयीं निघतात?

कीं, जो आपल्या गुरूपदेशास अनुसरून, त्यास अनन्य–गुरु हेंच आपलें सर्वस्व अशा भावानें भजतो,–ह्मणजे गुरु–दर्शनप्रसादाविना ज्याचा दुसरा कोणताही मनोरथ पूर्ण व्हावयाचा नसतो–त्याविषयींच. तसेंच 'पतिव्रतेच्या मनांत आपल्या प्रियपतीचेंच ध्यान सतत खेळत असतें,' असेंही ह्मटलेलें आपण ऐकतों. ह्या वाक्यांचा इत्यर्थ काय तो, सतत चिंतन–निदिध्यास–ह्मणजे एक तऱ्हेचें अखंड व प्रेमपुरःसर स्मरण, असाच असतो." ह्मणजे अशा तऱ्हेचें स्मरण हीच **शंकराचार्यां**च्या मताप्रमाणें **भक्ति** होय.

"बरें, ध्यान किंवा चिंतन ह्मणजे तरी काय? चिंतन ह्मणजे आपल्या ध्येय किंवा प्रिय वस्तूविषयीं जें अव्याहत किंवा अखंड स्मरण तेंच होय. जसें एका भांड्यांतून दुसऱ्या भांड्यांत एकसारखें तेल ओततांनां, त्याच्या धारेस खळ पडत नाहीं, तसेंच हें स्मरणही संतत किंवा अढळ पाहिजे म्हणजे तें चालूं असतां त्यांत खळ पडतां कामा नये. व हें अशा तऱ्हेचें एकनिष्ठ चिंतन जेव्हां **परमेश्वरा**चेंही घडेल, तेव्हां हे संसारबंध खळाखळ तुटून जातील. ह्मणूनच **श्रुती**मध्यें अशा तऱ्हेचें अखंड चिंतन हें एक मोक्षाचें साधन गणलेलें आहे. आणि अशा तऱ्हेचें चिंतन हीच साक्षात्काराची निशाणी होय. कारण वर चिंतनाचा जो अर्थ दिला आहे, त्याच अर्थानें 'साक्षात्कार' हा शब्द खालील वाक्यांत योजिलेला आहे, असें दिसतें. 'जो जवळही आहे; व दूरही आहे, अशा त्या **परमेश्वरास** साक्षात् पाहिल्यावर जीवाचे सर्व मायापाश तुटून जातात; सर्व संशयाचा निरास होतो; व सर्व कर्मभोगास कायमची

रजा मिळते." ( जो जवळ असेल तो आमच्या दृष्टीस पडेल, पण जो दूर असेल, त्याच्या संबंधानें आपणास फक्त स्मरण मात्र करतां येईल. तरीही **वेदां**मध्यें त्या जवळ व दूर असलेल्याही-**परमेश्वराचें** आपणास साक्षात् दर्शन घडलें पाहिजे, अशीं वाक्यें आहेत. त्यावरून वर सांगितल्या तऱ्हेचें चिंतन व परमेश्वराचें साक्षात् दर्शन हीं दोन्हीही एकच होत. )—"हें स्मरण किंवा चिंतन जेव्हां उच्च पदास चढतें, तेव्हां त्यास साक्षात् दर्शनाचेंच स्वरूप प्राप्त होतें........पूजन हेंच अखंड चिंतन होय, असें मूळ **वेदां**वरून दिसून येतें. पूजा हेंच निरंतरचें चिंतन होय; व हें जाणणें, ह्मणजेच ईश्वरभजनांत सदोदित मग्न होऊन राहणें असें ह्मटलें पाहिजे....अशा प्रकारें जें स्मरण, साक्षात् प्रतीतिरूप बनून जातें, तेंच मुक्तीचें साधन होय, असें **श्रुतीं**त ह्मटलें आहे. 'आत्मप्राप्ति जी व्हावयाची, ती 'अनंतपार' शास्त्रांचें जरी परिशीलन केलें, बुद्धिसर्वस्व जरी खर्ची घातलें; अगर स्वाध्याय जरी 'अपरसूर्यवत्' झाला, तरीही होणार नाहीं. ज्या प्राण्यावर ह्या **परमतत्वाचा—आत्म्या**चा कृपाकटाक्ष फिरतो, त्यालाच त्याचा लाभ होतो; आणि त्यालाच तें आपण होऊन भेट देतें.' ह्याव्यतिरिक्त, श्रवण, मनन, किंवा चिंतन हीं निवळ असाधनें होत, इत्यादि सांगितल्यावर पुढें ह्मटलें आहे, "ज्यावर ह्या **परमात्म्याचें** प्रेम जडतें, किंवा त्याचा ज्यास प्रसाद घडतो, त्यालाच तें—परमतत्व—साध्य होतें." जो आपणास फार प्रिय असतो, त्याविषयींच आपल्या मनांत लालसा उत्पन्न होते. ह्मणून जो ह्या **आत्म्या**वर निस्सीम भक्ती

ठेवतो, तोच त्याचा अगदीं ताईत होऊन बसतो. आपल्या **प्रिय भक्तांस आत्म्या**ची प्राप्ती करून द्यावी, ह्मणून **प्रभू** स्वतः त्यास हात देतो. कारण त्या **परमात्म्या**चेंच असें वाक्य आहे कीं, ' जे मजवर निरंतर एकनिष्ठा ठेवून मला प्रेमानें पूजतात, त्यांच्या इच्छेस मी असें वळण देतों कीं, त्यायोगानें त्यांनीं मजपाशींच येऊन मिळावें.' ह्मणून असें ह्मटलेलें आढळून येतें कीं, ज्यांना ज्यांना साक्षात् प्रतीतिरूपच असें जें हें अखंड चिंतन तें अगदीं मनापासून आवडत असतें, त्यांजवरच ह्या **परमात्म्याचें** प्रेम जडतें. कारण त्या **प्रभूस** ह्या अखंड चिंतनाची फारच आवड आहे; व अशालाच हा **परमात्मा** साध्य होतो. ह्या अखंड चिंतनाचेंच दुसरें नांव **भक्ति** होय. "

ह्याप्रमाणें **भगवान् रामानुजांनीं ' अथातो ब्रह्मजिज्ञासा'** ह्या सूत्राची मीमांसा—व्याख्या—करतांनां ह्मटलें आहे.

**'ईश्वरप्रणिधानाद्वा'**—ह्मणजे 'ईश्वराच्या पूजनें करून' ह्या **पतंजलीच्या** सूत्रावर व्याख्या करतांना **भोज** ह्मणतात, " प्रणिधान—पूजन—ही एक तऱ्हेची भक्तिच होय, कीं जीमध्यें विषयोपभोगादि फलांची इच्छा न धरितां, त्या परात्पर गुरूलाच—**परमेश्वरास**—सर्व कर्मे अर्पण केलेलीं असतात. " त्याचप्रमाणें **भगवान् व्यासांनीं** वरील सूत्रावर टीका करितांनां ' प्रणिधान ' शब्दाची खालीलप्रमाणें व्याख्या केली आहे. " प्रणिधान म्हणजे भक्तीचाच एक प्रकार होय. व त्याच्यायोगानें **प्रभूची** योग्यावर कृपा होऊन, त्याच्या सर्व कामना पूर्ण करून, **प्रभु** त्यास संतोषवितो. " **शांडिल्याच्या** मताप्रमाणें " भक्ति ह्मणजे ईश्वर-

विषयक अनन्य प्रेम होय." तथापि ह्या सर्वांतही भक्त-शिरोमणि जे **प्रल्हाद**, त्यांची व्याख्या सर्वोत्कृष्ट आहे:—**या प्रीतिरविवेकानां विषयेष्वनपायिनी। त्वामनुस्मरतः सा मे हृदयान्मा समर्पतु॥** "क्षणिक अशा विषयांवर विषयांध लोक जसे एका प्रकारच्या अंध ममत्वानें लोलुप होऊन जातात, तशाच तऱ्हेचें तुझ्यावरील माझें प्रेम, तुझ्या चरणीं मिलिंदायमान असा जो मी त्या माझ्या हृदयांतून कधींही न चळो." प्रेम! प्रेम खरें; पण तें कोणावर? त्या एका **परमेश्वरा**वरच. दुसऱ्या विषयावर किंवा जीवावर जर प्रेम जडेल, तर ती भक्ति होणार नाहीं; कारण **रामानुजाचार्यांनीं** आपल्या '**श्री**भाष्या'मध्यें एका प्राचीन आचार्यांचा—गुरूचा—उतारा घेऊन येणेंप्रमाणें म्हटलें आहे:—

**आब्रह्मस्तम्बपर्यन्ताः जगदन्तर्व्यवस्थिताः।**
**प्राणिनः कर्मजनितसंसारवशवर्तिनः॥**
**यतस्ततो न ते ध्याने ध्यानिनामुपकारकाः।**
**अविद्यान्तर्गताः सर्वे तेहि संसारगोचराः॥**

" प्रत्यक्ष **ब्रह्मदेवा**पासून तों तहत् एका क्षुद्र गवताच्या काडीपर्यंत या जगांतील यच्चयावत् वस्तू जन्ममृत्यूच्या गुलाम होऊन गेलेल्या आहेत; हा सर्व कर्माचा प्रभाव होय. याकरितांच त्या निरंतरभक्तीचे विषय होण्यास योग्य नव्हत. कारण ह्या सर्व वस्तु मुळीं विकारवश असून अज्ञानांधःकारांत गुरफटलेल्या असतात." **शांडिल्यांनीं** आपल्या 'भाष्यां'त एके ठिकाणीं 'अनुरक्ति' ह्या शब्दाची योजना केली आहे. त्यावर त्यांचे टीकाकार **स्वप्नेश्वर** ह्मण-

तात कीं अनु ह्मणजे पश्चात्, आणि रक्ति ह्मणजे निष्ठा. यावरून अनुरक्ति ह्मणजे **परमेश्वराचें** वैभव पाहिल्यावर व सृष्टीचें ज्ञान झाल्यावर, **परमेश्वरा**विषयीं जी एक तऱ्हेची निष्ठा—प्रेमभाव—उत्पन्न होते ती भक्ति होय. नाहींतर आपल्या पुत्रावरील किंवा गृहिणीवरील अंध प्रेमसुद्धां भक्तिच होऊन बसेल!

ह्यावरून आपणास स्पष्ट कळून येतें कीं, **भक्ति** ही एक मानसिक प्रयत्नांची माळा होय; आणि सार्थे भजनपूजन हा तिचा पहिला एक शेवट—आरंभ; व ईश्वरविषयक अलोट व निःसीम भक्ति हा तिचा दुसरा शेवट—किंवा शेवटच—लयच—होय.



# प्रकरण २ रें.

## तात्विकदृष्ट्या ईश्वरस्वरूपाचा विचार.



बरें, ईश्वर म्हणजे तरी कोण? 'जन्माद्यस्य-यत:–' म्हणजे सृष्टिस्थितिलयकर्ता, तोच ईश्वर होय. सनातन, शुद्धस्वरूप, सर्वतंत्रस्व-तंत्र, सर्वशक्तिमान्, सर्वज्ञ, दयाघन आणि सर्वांतर्यामीं वास करणारा तोच होय. इत-केंच नव्हे तर "स ईश्वरः अनिर्वचनीयप्रेमस्वरूपः"–म्हणजे अनिर्वचनीय–शब्दांनीं जें व्यक्त करतां येत नाहीं–असें प्रेम हेंच ज्याचें स्वरूप आहे, तोच ईश्वर.

हीं वरील सर्व लक्षणें ईश्वराच्या सगुणस्वरूपाचीं होत. तर मग ईश्वर अनेक आहेत काय? असा प्रश्न साहजिकच येतो. 'नेति नेति' असें म्हणून निर्गुणत्वेंकरून ज्याचें वर्णन करितात, तो तत्वज्ञान्यांचा सच्चिदानंद आणि भक्तांचा हा प्रेमस्वरूप ईश्वर हे भिन्न भिन्न कीं काय? छे:! ते मुळींच भिन्न नव्हत. ज्याला ज्ञानी सच्चिदानंद म्हणतात, तोच तो प्रेमस्वरूप ईश्वर होय. सगुण व निर्गुण हीं दोन्हीही रूपें, त्या एकाचींच. नेहमीं हें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, भक्त ज्याचें पूजन करितात, तो सगुणस्वरूपी ईश्वर, व ज्ञान्याचें निर्गुण ब्रह्म हीं दोन्हीही अगदीं अ-भिन्न होत. सर्व कांहीं त्या एका–अद्वितीय–ब्रह्मामध्यें समावेश पावतें. परंतु ब्रह्म हें यच्चयावत् वस्तूंचें केवल-स्वरूप किंवा एकच–अद्वितीय स्वरूप, अशा दृष्टीनें

पाहतां, त्याचें निर्गुणत्व भजनपूजनास अशक्य आहे, असें दिसून येतें. म्हणून भक्त हा त्याच ब्रह्माच्या सगुणरूपाची निवड करून घेतो, व हें सगुणरूप, हाच जगन्नियंता ईश्वर होय. ह्यावर दृष्टांतः—समजा कीं, ब्रह्म हा एक चिखलाचा गोळा आहे, कीं ज्यापासून हरतऱ्हेचे असंख्य पदार्थ घडवितां येतात. चिखल ह्या दृष्टीनें पाहतां, हे सर्व पदार्थ एकच होत, परंतु त्यांचे आकार व स्वरूप पाहतां, एक घोडा, एक गाय, एक बाई, एक बाहुली अशीं निरनिराळीं रूपें होतात. हीं सर्व त्या चिखलाच्या गोळ्यापासून उत्पन्न होण्यापूर्वीच आपल्या संभवरूपानें वास करीत होतीं. पण तीं एकदां घडविलीं गेल्यावर जेथपर्यंत त्यांचे आकार, आहेत तसेच राहतील, तेथपर्यंत तीं एकमेकांपासून भिन्नच होत. जसें, एखादें उंदराचें चित्र असलें तर तें आपोआप हत्तीचें चित्र बनेल काय? नाहींच बनणार. कारण, त्यांचें व्यक्त स्वरूप किंवा आकार हीं जोंपर्यंत भिन्न भिन्न आहेत, तोंपर्यंत तें तसेंच असणार. तरी त्या वस्तूंच्या संभवीं अथवा अव्यक्त स्वरूपाच्या मुळाशीं चिखल हा एकच पदार्थ आहे. तीच गोष्ट ईश्वराची. ईश्वर हा त्या निर्गुण केवलस्वरूपाचें अत्युच्च तऱ्हेचें व्यक्त स्वरूप किंवा सगुणरूप होय, किंवा ईश्वर हा आमच्या मनाला ग्रहण करतां येण्यासारखा, त्या अखंड ब्रह्माचा जो सर्वांत मोठा भाग तो होय. ही सृष्टिही अनादि असल्यामुळें, तो अनंतही तसाच आहे.

व्यासांनीं आपल्या सूत्रांतील चवथ्या अध्यायाच्या चवथ्या पादांत आत्मा मुक्त झाल्यावर, त्यास अनंत ज्ञान

व शक्ति येते, इत्यादि सांगून नंतर म्हटलें आहे कीं, सृष्टीची उत्पत्ति, स्थिति किंवा लय इत्यादि करण्याचें सामर्थ्य इतर कोणालाही असावयाचें नाहीं, तें त्या एका **ईश्वरा**सच आहे. ह्या सूत्रावर टीका करतांनां द्वैतवाद्यांस सहजरीत्या असें प्रतिपादन करतां येतें कीं, व्यक्तिमात्राच्या क्षुद्र जीवास **ईश्वरा**चें अखंड स्वातंत्र्य व अतर्क्य कर्तृत्व हीं येणें अशक्य होय. द्वैतवाद्यांचे अध्वर्यु **मध्वाचार्य** यांनीं नेहमींच्या पद्धतीस अनुसरून, त्या सूत्रावर **वराह**-पुराणांतील एका श्लोकाचें अवतरण घेऊन, त्याची द्वैत-वादास धरून टीका केली आहे.

ह्याच वाक्यावर व्याख्या करतांनां **रामानुज** म्हणतात, “आतां असा प्रश्न निघतो कीं, मुक्त झालेल्या जीवाला ज्या शक्ती प्राप्त होतात, त्यांमध्यें **ईश्वरा**ची सृष्टिस्थितिलय-नियामक शक्ति व त्याचें प्रभुत्व, ह्यांचा समावेश होतो किंवा काय? कारण तो न झाल्यास मुक्त जीवांचें वैभव काय तें, त्या **परमात्म्या**ची साक्षात् प्रतीति घडणें, हेंच होय. ह्यापलीकडे कांहीं नाहीं. त्याच बाजूनें आम्हांस आणखी असेंही म्हणतां येईल कीं, “मुक्त जीवांस जग-न्नियंतृत्व मिळणें सयुक्तिक दिसतें. कारण **श्रुतीं**त म्हटलें आहे, ‘**शुद्ध परमात्म्या**शीं तो एकरूप होऊन जातो.’ तसेंच त्याच्या सर्व इच्छा पूर्ण होतात, असेंही आणखी त्यांत प्रतिपादिलेलें आहे. तेव्हां अशा तऱ्हेचें **परमेश्वरा**शीं ऐक्य आणि सर्व कामनांची पूर्तता होण्यास, मुक्त जीवास जगन्नियंतृत्व हें असलेंच—आलेंच—पाहिजे.” ह्यावर आमचें उत्तर असें कीं, मुक्त झालेल्यांस जगन्नियंतृत्व खेरीज करून

बाकी सर्व कांहीं सिद्धी प्राप्त होतात. जगाचें नियमन करणें म्हणजे मुक्त जीवांखेरीज, झाडून साऱ्या अचेतन व सचेतन पदार्थांस–जीवांस–इच्छा, कामना, जीवित–नानाविध स्वरूपें–इत्यादिकांस एक प्रकारचें वळण देणें होय. मुक्तजीव मात्र **ईश्वराशीं** एकरूप झाल्याकारणानें, त्यांच्या व **ईश्वरा**च्या इच्छेमध्यें विरोध नसतो. आणि त्याप्रमाणें ते अखंड ब्रह्मानंदसुखांत निमग्न असतात. **वेदांत**ही ह्याचें असेंच प्रतिपादन केलें आहे. **श्रुतींत** असें म्हटलेलें आढळतें कीं, "ज्यापासून यच्चयावत् पदार्थ निर्माण झाले, ज्याच्या सामर्थ्यानें ह्या निर्मिलेल्या सर्व पदार्थांचे व्यापार सुरळीत चालले आहेत, व ते सरशेवटीं ज्यांत मिळतात, त्याविषयीं विचार कर. तेंच **ब्रह्म** होय." जर जगन्नियंतृत्व हा गुण, **परमेश्वरा**प्रमाणें मुक्त जीवांसही असेल, तर वरील वाक्यावरून **ब्रह्मा**चा बोध होणार नाहीं. कारण त्या वाक्यांत तर जगन्नियंतृत्व हेंच त्या **ब्रह्माचें** लक्षण ध्वनित केलें आहे. एखाद्या वस्तूची व्याख्या करतांना, तिच्या अंगीं जो विशिष्ट गुण असतो, तोच मुख्यतः दिलेला असतो. म्हणून माझ्या लाडक्या मुला! तें एक अद्वितीय तत्व, एकीं एक, आत्मानंदांत निमग्न व सर्वांच्याही आधीं विद्यमान होतें. त्यालाच आपण पुष्कळ (वस्तू) उत्पन्न करूं, अशी स्फूर्ति उद्भवली. त्यापासूनच उष्णता–म्हणजे तेज–निर्माण झाली.' आधीं तर **ब्रह्म**च काय तें एकटें होतें. त्याचेंच उद्भवन सुरू झालें; व त्याच्याचपासून क्षत्र हें सुखकर स्वरूप उदयास आलें. हें सर्व **वरुण, सोम, रुद्र, पर्जन्य** इत्यादि देव हे क्षत्रच

होत.' 'सर्वारंभीं **आत्माच** काय तो खरोखरी होता; त्यावेगळें दुसरें कोणतेंही तत्व अस्तित्वांत नव्हतें. त्याच्याच एका दृष्टिक्षेपानें हें सर्व जगत् उद्भवलें; म्हणजे मागून जगाची उत्पत्ति झाली.'—'तो एक **नारायणच** कायतो (प्रथम) होता. **ब्रह्मा** नव्हे, **ईशान** नव्हे, **द्यावापृथिवी, तारका, उदक, अग्नि, सोम** कीं **सूर्य** ह्यांपैकीं कोणीही नव्हे. होता काय तो तोच एकटा. त्याला एकटेंच राहून सुख घेववेना, म्हणून ध्यान करून, त्यानें एक मुलगी, दहा इंद्रियें इत्यादि निर्मिलीं.' वरील वाक्यांत व अवांतर कित्येक ठिकाणींही—'पृथ्वीवर राहणारा प्राणी पृथ्वीहून भिन्न असेल काय? तसेंच, **आत्म्या**मध्यें राहणारा जो कोणी आहे, तो त्याहून भिन्न असेल काय?' इत्यादि वाक्यांतही **श्रुतीनें**, जगाचा नियमनकर्ता **ईश्वर** आहे, असें म्हटलें आहे. इतकेंच नव्हे, तर विश्वचालकत्वासंबंधीं जेथें वर्णन आलें आहे, तेथें कोठेंही मुक्त जीवांस विश्वचालकत्वाचा अधिकार दिलेला नाहीं." पुढील सूत्रावर व्याख्या करितांनां, **रामानुजाचार्य** म्हणतातः—"**श्रुतीं**मध्यें ह्याच्याउलट वाक्यें असल्यामुळें, जरी हें कोणी नाकबूल केलें तरी, ह्याविरुद्ध वाक्यांमध्यें मुक्तजीवांना कनिष्ठ देवतांच्या साम्राज्यांत जें वैभव लाभतें, त्याजविषयीं मात्र वर्णन केलेलें आढळतें." हेंही ह्मणणें बरेंच सयुक्तिक दिसतें. **रामानुजाचार्यांच्या** मताप्रमाणें जरी सर्व जग हें एक आहे, तथापि अनादि असे कांहीं भेद त्याच्या पोटांत आहेत, असें त्यांनीं कल्पिलें आहे. म्हणूनच **रामानुजाचार्यांस**,

त्यांचें मत व्यावहारिक दृष्ट्या द्वैतच असल्याकारणानें, जीवात्मा व सगुण **ईश्वर** ह्या दोहोंमधील भेद सहज कायम राखतां आला.

आतां अद्वैतवाद्यांचे अग्रणी यासंबंधीं काय म्हणतात, तें पाहूं. आपणांस असें दिसून येईल कीं, अद्वैत हें नेहमीं द्वैताच्या सर्व आशा व महत्वाकांक्षा, तशाच्या तशाच कायम ठेवून, त्यांजबरोबरच मनुष्यजातीच्या दैविक किंवा अत्युच्च महत्वाकांक्षानुसार पुढें आलेल्या प्रश्नांचा निवाडा करून देतें. ज्यांना मुक्ति मिळाल्यावरही आपलें व्यक्तित्व कायम राखावयाचें असेल, ह्मणजे ज्यांना **ईश्वराहून** भिन्न राहावयाचें असेल, त्यांना तसें राहण्यासही सवड चांगली मिळते, आणि त्यास त्या सगुण **ब्रम्हाचें** यथेच्छ सुख भोगावयास सांपडतें. **भागवत** पुराणांत "हे राजा! ह्या **ईश्वराचे** गुण असे अलौकिक–मनोहर–आहेत कीं, ज्यांना आत्मसुखाशिवाय दुसऱ्या कशांतही गोडी वाटत नाहीं; व ज्यांचे सर्व मायापाशही तुटून गेलेले असतात, असे **ऋषीसुद्धां** त्या **प्रभूवर**, कोणत्याही फलाची इच्छा न धरितां, लुब्ध होऊन जातात." हें ज्यांविषयीं वर्णन केलेलें आहे, ते **ऋषी** वरील प्रकारचे होत. **सांख्यामध्यें**, ह्या अशा प्रकारच्या पुरुषांस 'ह्या कल्पांत सृष्टींतच मुरून राहणारे, व पूर्णत्व पावल्यावर दुसऱ्या कल्पांत कांहीं भुवनांचे नियामक बनून जाणारे म्हणजे अढळपदीं बसलेल्या **ध्रुवा**-सारखे–'असें म्हटलेलें आहे. परंतु कोणासही त्यांना **ईश्वरा**-समान ह्मणतां येणार नाहीं. जेथें सृष्टि, स्रष्टा व सृज्य ह्यांचें नांव नाहीं; ज्ञान, ज्ञेय, व ज्ञाता हा भाव नाहीं; मी, तूं, तो, ह

भेदाभेद नाहीं, कर्ता, कर्म, व क्रिया ही संबंधपरंपरा नाहीं; आणि जेथें कोणीं कोणाला पहावयाचें? हाच मुळीं प्रश्न उद्भवतो, अशा अत्युच्च स्थितीस जे पोंचलेले असतात, त्या महात्म्यांची,—सर्व जगताच्या पलीकडे जेथें शब्दांची व मनाची गति नाहीं, व ज्याचें वर्णन श्रुतींना 'नेति नेति' 'हें नव्हे व तें नव्हे' ह्या शब्दांनीं करावें लागतें, अशा ठिकाणीं—गति झालेली असते. परंतु ज्या कोणास हा मार्ग साधतां येत नाहीं, किंवा ज्यांस तो साधण्याची इच्छाच नसते, अशा लोकांस मात्र त्या एका अभिन्न ब्रम्हाचे, सृष्टि, जीव व त्या दोहोंचाही पालक—सर्वव्यापी जो **ईश्वर** तो, असे तीन भेद त्यांच्या दृष्टीनें अवश्य राहिलेच पाहि-जेत. म्हणून **प्रल्हाद** जेव्हां आपलेपणासच विसरला, तेव्हां विश्व, व त्याचें आदिकारण हेंही त्याला दिसेनासें झालें. ह्या स्थितींत त्याला नामरूपादि भेदरहित एकच, अखंड, व अनंत असें **ब्रम्ह** दिसत होतें. पण आपण **प्रल्हाद** अशी जेव्हां त्याला स्फूर्ति झाली, तेव्हां पुन्हां सृष्टि व सृष्टिकर्ता म्हणजे 'अनेक सद्गुणांचा केवळ निधिच,' असा जो **ईश्वर,** तोही त्याजपुढें दत्त करून उभा राहिला. त्या धन्य झालेल्या **गोपी**चीही स्थिति त्याप्रमाणेंच होती. त्या जेथपर्यंत आपलेपणास विसरत, तेथपर्यंत **कृष्णरूप**च बनून जात. परंतु त्या जेव्हां त्याची पूजा करण्याचें मनांत आणीत, तेव्हां त्या आपल्या पूर्व स्वरूपाप्रत पावत (म्हण-जे पुन्हां **गोपी** होत.) आणि असें होतांचः—

**तासामाविरभूच्छौरिःस्मयमानमुखांबुजः।**
**पीतांबरधरःस्रग्वीसाक्षान्मन्मथमन्मथः॥**

" आधींच कमलासारखें वदन, त्यांत किंचित् हास्याची छटा वर उमटली आहे. कंठांत वनमाळा रुळत आहे; कटीस पिवळा पीतांबर परिधान केलेला; आणि सौंदर्यानें तर प्रत्यक्ष मदनालाही लाजवीत आहे, असें ज्याचें हृदयंगम रूप, तो **भगवान् श्रीकृष्ण**, साक्षात् त्यांजपुढें येऊन उभा राही–" **भागवत**पुराण.

आतां आपण पुन्हां **शंकराचार्यां**कडे वळूं. ते म्हणतात:—" जे सगुणरूपाची पूजा करून त्या **प्रभू**शीं ऐक्य पावतात, व आपलें व्यक्तित्वही कायम राखतात, त्यांच्या वैभवास कांहीं पार आहे किंवा नाहीं? हा प्रश्न उद्भवून त्या बाजूचीं प्रमाणें म्हणून कांहीं **श्रुतीं**तील वचनें दिलीं जातात तीं अशीं:–' त्यांना आपलें राज्य मिळतें,'–त्याची सर्व देव पूजा करितात''इत्यादि. ह्यावर **व्यास** उत्तर देतात:— "विश्वचालनशक्ति खेरीज करून बाकी सर्व **अणिमादि** अष्टसिद्धी-किंवा शक्ती-मुक्तांस प्राप्त होतात. परंतु राहतांपैकीं ही जी, सृष्टीचें रहाटगाडगें सुरळीत चालविण्याची एक शक्ति आहे, ती मात्र एका त्या ब्रह्मांडचालकास–**ईश्वरा**सच आहे. कारण **श्रुतीं**नीं मुळीं विश्वोत्पत्तीविषयीं बोलतांनां विश्वाचें कर्तृत्व त्याजकडेस दिलेलें आहे, परंतु मुक्तांसंबंधानें अशा तऱ्हेचें कोठेंच वर्णन नाहीं. तो **प्रभु**, सृष्टीचे व्यवहार सुयंत्रित चालविण्याच्या कामांत सर्वदा गुंतलेला असतो. सृष्टीसंबंधानें ज्या ज्या वाक्यांत उल्लेख आहे, त्या त्यांत सर्व सृष्टिकर्तृत्व **ईश्वराचें** होय, असें म्हटलेलें आढळतें. शिवाय त्यास 'सदापूर्ण' असें विशेषण दिल्याचें दिसून येतें. तसेंच **अणिमादि** सिद्धी ह्या ईश्वराच्या भजनानें व त्यास शोध-

त्यानें प्राप्त होतात, असेंही म्हटलेलें आहे. ह्यावरून जगा-चें नियामकत्व कोणत्याही रीतीनें मुक्त जीवांकडे जाणें संभवत नाहीं. आणखी, मुक्तजीवांचें व्यक्तित्व कायम राहि-ल्यानें मुक्तांच्या निरनिराळ्या इच्छा, परस्पर विरोधी असणें साहजिक आहे. ह्मणजे एकाला जर उत्पत्तीची इच्छा असे-ल, तर दुसऱ्याला संहाराची नाहीं का होणार? परंतु सृष्टी तर चालली पाहिजे. मग हा विरोध असल्यावर ती कशी चालेल? ह्याकरितां एक इच्छा मुख्य धरून बाकी सर्व तिच्या ताबेदार असल्या पाहिजेत. ह्यावरून कयास काय निघतो कीं, मुक्तांच्या इच्छा ह्या त्या प्रभूच्या इच्छेवर अव-लंबून असतात."

तर सगुणोपासनेनेंच भक्तीस ब्रम्हाकडे सहज वळवि-तां येईल. 'अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते' (गीता.)—'ज्याचें मन निर्गुणस्वरूपाकडे वेधलेलें आहे, त्याचा मार्ग बराच कठिण असतो.' भक्तीचा मार्ग म्हणजे नुसतें आपल्या नैसर्गिक ओघाप्रमाणें सहजरीत्या वहावत जावयाचें. आतां हें खरें कीं, आपण ब्रम्हाविषयीं कल्पना करूं लागलों तर, आपणास तीवर मानवी गुणांचा आरोप केल्याशिवाय, ती यावयाची नाहीं. पण हरएक वस्तूची कल्पना करतांनां आपण असेंच करतों. सर्वात श्रेष्ठ—अज्ञात-पूर्व—अध्यात्मज्ञानी जे कपिलमुनि, त्यांनीं अनेक शतकां-पूर्वीं असें सिद्ध केलें आहे कीं, आपल्या अंतर्बाह्य पदा-र्थांच्या कल्पना, व त्यांचें साक्षात् ज्ञान होणें, हें आपल्या जाणीव शक्तीवर अवलंबून असतें. आपल्या शरीरापासुन तों तहत् ईश्वराच्या कल्पनेपर्यंत आपल्या सर्व कल्पना व

अनुभव, हीं आपली ज्ञानशक्ति किंवा जाणीवशक्ति, व ते पदार्थ खरोखरी जे काय असतील, ती स्थिति ह्यांचें मिश्रण असतें, आणि ह्या चिच्छक्ति व पदार्थांच्या खऱ्या स्वरूपाच्या मिश्रणास आपण सत्य म्हणून समजतों. आणखी जेथपर्यंत मनुष्याच्या मनाची धांव आहे, तेवढ्यांत त्याला हेंच सत्य असें भासणार. म्हणून **ईश्वरावर** मानवी गुणांचा आरोप केल्यानें, त्याला खरें अस्तित्व नाहीं, असें मानणें हें निव्वळ मूर्खपण होय!! हा वाद **पाश्चात्य** देशांतील कल्पनावादी व सत्यवादी यांच्यामधील वाग्युद्धाप्रमाणेंच म्हटला पाहिजे. कारण हा **पाश्चात्य** देशांतील वाद म्हणजे दिसण्यांत कडाक्याचा, व फक्त सत्य शब्दाच्या ह्या द्व्यर्थी कल्पनेवरच त्याचा पाया रचलेला असतो. तीच तऱ्हा ह्याची. सत्य शब्दामध्यें जेवढ्या कांहीं कल्पनांचा व अनुभवांचा समावेश होईल, त्या सर्व अर्थांवरून **ईश्वर** हा खरा आहे, व सृष्टींतील कोणताही पदार्थ ज्या रीतीनें खरा आहे, त्याच अर्थानें **ईश्वर**ही सत्य व खरा आहे. सत्याचा अर्थ आणखी यापलीकडे तो काय असणार? असो.

येथवर **ईश्वरा**संबंधीं तत्वज्ञानदृष्ट्या विचार झाला.

## प्रकरण ३ रें.

## भक्तियोगाचा रोख अथवा ईश्वरी साक्षात्कार.



भक्ताला ह्या कोरड्या तत्वज्ञानाचा उपयोग म्हटला म्हणजे त्याची इच्छाशक्ति दृढ होणें, एवढाच कायतो होईल. यापलीकडे हीं सर्व तत्वें त्यास गंधर्वनगराप्रमाणेंच निरर्थक होत. कारण तो ज्या मार्गानें जात असतो, तो मार्ग त्याला लौकरच तमोव्याप्त व गढूळ अशा बुद्धिसागराच्या पैलतीरास, साक्षात्कारसाम्राज्यांत, नेऊन पोंचवितो. त्या **दयाघनाची** एकदां भक्तावर दयार्द्र दृष्टि फिरली कीं, अहंमन्य परंतु दुर्बल अशा बुद्धीचा जेथें रिघाव होत नाहीं, आणि बुद्धिरूप काजव्याचें तेज फिकें पडून, जेथें साक्षात् प्रतीतिरूपी उज्वल सूर्यप्रकाशांतून पर्यटन करावयास मिळतें, असें अत्युच्च स्थान त्यास लागलेंच प्राप्त होतें. तेथें गेल्यावर त्यास बुद्धि किंवा विश्वास यांच्या ओंजळीनें पाणी पिण्याची गरजच राहत नाहीं, तर तो सर्व कांहीं प्रत्यक्ष पाहत असतो. मग त्याला खऱ्याखोट्याची भवति न भवति करण्याचें कांहीं कारणच उरत नाहीं. कारण सत्य ह्मणून जें काय आहे, तें त्याजपुढें मूर्तिमंत हात जोडून उभें असतें. अशा तऱ्हेचें त्या **परमात्म्याचें** दर्शन किंवा साक्षात् प्रतीति,

व त्याजपासून होणारा अप्रतिम आनंद, ह्यांपासून भक्तास जें काय सुख लाभत असतें, तें इतर सर्व सुखांपेक्षां श्रेष्ठ असतें. इतकेंच नव्हे, तर कैक भक्त असेही पाहण्यांत येतात कीं, त्यांस ह्या सुखापुढें, प्रत्यक्ष मोक्षसुद्धां कांहींच नव्हेसा वाटत असतो. तर मग त्रिभुवनांतही अनुपम लाभ तो हाच नव्हे काय? जगामध्यें असे कांहीं लोक आहेत,—कांहीं कां? पुष्कळ कां म्हणाना? कीं त्यांस विषयसुखोपभोग मिळविण्यांतच मोठें पर्व वाटत असतें, आणि ज्यांच्या योगानें ते प्राप्त होतील, तींच काय तीं खरीं फायद्याचीं कलमें, असें त्यांच्या मनानें घेतलेलें असतें. धर्मानें चालावयाचें तें कशाकरितां? तर चार पैसे मिळतील ह्मणून; किंवा ऐंद्रिय सुखाचा उपभोग घ्यावयास मिळेल ह्मणून. तसेंच कीर्तन, व ईश्वरभजन हीं तरी कशाकरितां? त्यांत जर ऐंद्रिय सुखार्जनाच्या साधनांचा ठेवा असेल, तरच त्यांच्यापाठीं लागावयाचें, असा त्यांचा बाणा असतो. अशा लोकांस ज्या ज्या गोष्टींनीं इंद्रियांच्या तृष्णा भागत नाहींत, किंवा विषयेच्छा तृप्त होत नाहीं, त्या त्या अगदीं कवडीमोल वाटत असतात. **तात्विक फायदा हा ज्याच्या त्याच्या मनावर अवलंबून असतो.** ह्मणजे ज्यास जो पदार्थ हवासा वाटतो, तो मिळविण्यांतच तात्विक फायदा आहे, असें त्यांस वाटत असतें. खावें, प्यावें, इंद्रियवासना तृप्त कराव्या व केव्हां तरी **यमाजीभास्करांच्या** भक्ष्यस्थानीं पडावें! या गोष्टींपलीकडे ज्यांच्या दृष्टिकक्षेची मर्यादा पोंचत नाहीं, त्यांस इंद्रियसुखावांचून दुसरा कोणता बरें अलभ्य लाभ असणार? इंद्रिय सुखापेक्षां

उच्च तऱ्हेच्या सुखाची नुसती इच्छा उद्भवण्यासच, त्यांस किती तरी दम धरला पाहिजे, आणि अशा जन्ममृत्यूंचे अनेक फेरे खाऊन आलें पाहिजे. त्यावांचून तीं उद्भवण्याचें नांवच घ्यावयास नको! परंतु ज्यांना ह्या आत्मप्राप्तीच्या अगाध सुखाची किंमत, क्षणभंगुर ऐहिक सुखापेक्षां जास्ती वाटते, व ज्यांना विषयसुख म्हणजे केवळ पोरखेळ वाटतो, त्यांना **ईश्वर** व त्याची भक्ति ह्यांतच कायतें जन्माचें साफल्य आहेसें वाटतें. असे नरश्रेष्ठ या जगामध्यें थोडे कां होईनात परंतु आढळतात, ही तरी **परमेश्वराची** कृपाच समजली पाहिजे!

मागें सांगितल्याप्रमाणें **भक्तियोगाचे** दोन भेद कल्पिलेले आहेत. एक **गौणी** (आरंभींचा) व दुसरा **परा** (श्रेष्ठ). जसजसें आपण पुढेंपुढें पाऊल टाकूं लागूं, तसतसें **भक्तीच्या** पहिल्या पहिल्या पायऱ्या चढतांना, आपणास प्रथम आपली प्रगति होण्यासाठीं जड, साकार किंवा दृश्य वस्तूंची अवश्यकता असते. धर्माचे गाथा व मंत्रतंत्र असे जे दोन स्वाभाविक भेद आहेत, ते प्रथम मुमुक्षूंचें चित्त **भक्तीकडे** बरोबर वेधण्यास व त्यांस **ईश्वर**प्राप्तीचा मार्ग खुला करून देण्यास साहाय्यभूत होतात. पण त्याबरोबर आपणास हेंही ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, ज्या धर्मामध्यें मंत्रतंत्राची व सुंदर पौराणिक कथांची रेलचेल असते, त्याच धर्मामध्यें मोठमोठाले ब्रह्मज्ञानी अवतरले आहेत. कित्येक धर्मशास्त्रांमध्यें, कविप्रतिभालंकृत जें जें कांहीं सुंदर व मनोल्हादक म्हणून असेल कीं, ज्याच्या योगानें परमार्थपथावरून रांगत जाणाऱ्या

बालमानसांस भक्कम टेका मिळतो, किंवा जें केवळ धर्म-रूपी गृहाच्या अड्याचे खांबच म्हणावयास हरकत नाहीं, तें तें सर्व काढून टाकण्याचा ते प्रयत्न करितात. ह्या शाखांचे लोक धर्मरूपी वृक्षाला जें जें काय जीवन देणारें आहे, किंवा ज्यांच्या ज्यांच्या योगानें त्या वृक्षाचीं खोडें व पानें बनावयाचीं असतात, तें तें सर्व, ते आपल्या अज्ञानपटलाच्छादित बुद्धीस अनुसरून, हट्टानें समूळ उपटून टाकण्यास झटत असतात. अशा सर्व धर्मशाखांस लौकरच कळून चुकतें कीं, हें सर्व काढून टाकल्यावर, म्हणजे सुंदर पौराणिक कथा व मनास उदात्त विचारांची स्फूर्ती करून देणारीं मंत्रतंत्रें इत्यादिकांची विल्हेवाट लाविल्यावर ज्ञानाचा गीर रसातळास जाऊन, बाकी पोकळ शब्दाडंबराचें टरफलच काय तें हातीं लागतें; आणि त्यांत थोडीशी वरकरणी जी गोडी म्हणून दिसते, ती त्यांत समाजसुधारणेचें पिल्लूं ढकलल्यानेंच आलेली असते.

ज्या असंख्यात मनुष्यजातीचा समाज अशा तऱ्हेचा म्हणजे परंपरया जडवादीच ( Materialist ) असतो, इहपरलोकीं जन्माची इतिकर्तव्यता व इष्टापूर्त—इष्टदेवता—म्हणजे ऐंद्रिय विषयोपभोग हीच ज्यांस वाटत असते, कीं ज्यांवांचून त्यांस आपला जन्म असला काय व नसला काय सारखाच वाटतो, त्यांनाच फक्त—त्या सुखाच्या प्राप्त्यर्थ—अशा तऱ्हेची समाजसुधारणेची झाडलोट करण्यांत अथपासून इतिपर्यंत सार्थक्यसें भासतें. ह्या अशा तऱ्हेच्या अज्ञान व धर्मवेडेपणाच्या गंगाजमनासंगमाचें पुतळे, हे जर लौकरच आपलीं पांघरलेलीं सिंहचर्में दूर झुगारून

देतील, व आपल्या खऱ्या स्वरूपानें जगापुढें येतील तर जगाचें बरेंच कल्याण होईल! कारण अशा लोकांमध्यें व जडवादी किंवा नास्तिक ह्यांमध्यें वास्तविक कांहींच भेद नसतो, तेव्हां त्यांनीं उघड उघड रीतीनें त्यांच्या मालिकेंत आपणांस ओंवून घेणें, हें बरेंच हितावह होय! मूर्ख-पणाचीं हजारों मतें धारण करून, उगाच तोंडाची खंडी-भर वाफ दवडण्यांत अर्थ कोणता? तेंच आध्यात्मिक सिद्धांताचा अनुभव व सच्छीलता, यांचा थोडासा अभ्यास केला तरी, त्यांच्या पाव रती वजनाचें पारडेंदेखील त्या खंडीपेक्षां जड भरेल, यांत तिळमात्र संदेह नाहीं. ह्या असल्या अज्ञानप्रचुर धर्मवेडेपणापासून निदान एक एक तरी महात्मा निपजला असल्यास दाखवा पाहूं? जर तुमची दाखविण्याची छाती नाहीं, तर तोंडें आवळून धरा, व आपलीं मनोगवाक्षें खुलीं करून, ज्ञानरूपी सूर्याचे किरण आंत घेण्यास तयार व्हा, आणि ज्या **भरतखंड-वासी ऋषिवर्यांना** अध्यात्मतत्वाची साक्ष पटला आहे, त्यांच्या चरणीं लागून, त्यांजपासून ही विद्या शिष्याप्रमाणें शिकून घ्या. तर मग आतां ते काय म्हणतात, तें चित्त देऊन ऐकूं.



## प्रकरण ४ थें.

### गुरूची अवश्यकता.

पूर्ण दशा प्राप्त होणें हें प्रत्येक आत्म्यामागें लागलेलेंच आहे, आणि प्रत्येक प्राणिमात्रास अंतीं पूर्णावस्था म्हणून येणारच. सध्या आम्ही म्हणून जे काय आहों, तें तें सर्व आमच्या गतकालीन कर्मांचा व विचारांचा विपाक होय; आणि पुढेंही आमचीं जीं जीं काय स्थित्यंतरें होणार, तींही, हल्लीं आमचा ज्यांविषयीं विचार चालला आहे, जीं जीं कर्में आम्ही करीत आहों, त्यांचीच फलश्रुति म्हटली पाहिजे. परंतु ह्यावरून पाहतां, आम्ही जरी आपल्या नशीबाचे पूर्ण धनी आहों, तरी तेवढ्यावरच बाहेरून कांहीं मदत मिळाल्याशिवाय आपलें चालेल, असें नाहीं. इतकेंच नव्हे तर बहुतेकांना ह्या मदतीची जरूर लागतेच लागते, व ही मदत मिळाल्यावर आपल्या आत्म्याच्या ज्या कांहीं उच्च तऱ्हेच्या अंतःशक्ती आहेत, त्यांस एक तऱ्हेचा वेग मिळतो, आणि जें जें कांहीं आपल्या आत्म्याकडून घडण्याचा संभव असतो, तें तें लौकर घडून येईल अशी त्यास गति मिळते; त्यास जागृति प्राप्त होऊन, त्याच्या वाढीस एक प्रकारचा जोम येतो; व मनुष्य आज ना उद्यां पवित्र व पूर्ण होऊन जातो.

हा जोम ज्या मदतीनें मिळावयाचा, ती मदत कांहीं पुस्तकें वाचून येत नाहीं. आत्म्याला वेग मिळणें तो दुसऱ्या आत्म्याकडूनच मिळेल. एरवीं वेग मिळणेंच दुरापास्त! पुस्तकें वाचण्यांतच जर आमचें सर्व आयुष्य वेंचलें, तर आपल्या बुद्धीची मात्र वाढ होईल; पण आपल्या आत्म्याची स्थिति पूर्ववत्च राहील. बुद्धीची वाढ कितीही उच्च तऱ्हेची झाली, तरी आत्म्याची वाढ त्या मानानें होते, असें मुळींच नाहीं.

पुस्तकांचें अध्ययन करीत असतां, कधीं कधीं आपल्या आत्म्याचीही वाढ झाली, असें आपणास भ्रमानें वाटतें; पण खरें तथ्य शोधूं गेलें असतां, आपणास असें दिसून येईल कीं, त्या वाचनापासून कांहीं फायदा झाला असेल तर तो बुद्धीलाच, परंतु आपल्या अंतरात्म्यांत त्यापासून क्वचितशाही फरक झालेला नसतो. आपणांपैकीं पुष्कळ जणांस अध्यात्म विषयावर चटकदार भाषण करतां येतें, तरी बोलल्याप्रमाणें चालण्याची, म्हणजे साधुवृत्तीनें व शुद्धाचरणानें राहण्याची वेळ आली कीं त्यांची गाळण होऊन जाते, त्याचें कारण तरी हेंच. तेव्हां आत्म्यास कोणत्याही रीतीनें चालन मिळण्यास दुसऱ्या परिपूर्ण आत्म्याकडूनच त्यास धक्का किंवा वेग मिळाला पाहिजे.

ज्या पवित्र पुरुषाच्या आत्म्याकडून हा वेग मिळतो, किंवा हें चालन प्राप्त होतें, त्यास गुरु असें म्हणतात. व ज्याच्या आत्म्यास हें चालन मिळतें, त्याला शिष्य असें म्हणतात. हा वेग मिळण्यास गुरूच्या अंगीं दुसऱ्या आत्म्याला वेग देण्याचें सामर्थ्य पाहिजे; आणि दुसरे

पक्षीं ज्या आत्म्यास हा वेग मिळावयाचा असतो, त्यास तो पूर्ण अधिकारी पाहिजे. प्रथमतः बीं जिवंत पाहिजे; आणि शेतही पण नांगरून कुळवून तयार असलें पाहिजे. ह्या दोन्हीही गोष्टींची सिद्धता झाली असेल तरच धर्मवृक्ष झपाट्यानें वाढीस लागतो. **गुरुशिष्यांच्या** अधिकाराविषयीं असें वचन आहे कीं:—

'**आश्चर्यो वक्ता कुशलोस्य श्रोता**' म्हणजे—

"खरा **गुरु** जो असेल, त्याच्या अंगीं विलक्षण सामर्थ्य पाहिजे, व **शिष्य** चाणाक्ष असला पाहिजे." हे दोन्हीही विलक्षण तऱ्हेचे पुरुष असतील, तेव्हांच त्या हृदयंगम **आत्मतत्वाचा** सुंदर मोड उगवेल. नाहीं तर उगवणार नाहीं. वर सांगितल्या प्रकारचे जे **गुरु** असतील, तेच खरे **गुरु**, व त्या प्रकारचेच जे **शिष्य** असतील, तेच खरे **शिष्य** होत. बाकीचे सर्व **अध्यात्मज्ञानाची** केवळ थट्टाच करीत असतात, ह्मटल्यास चालेल! त्यांच्या मनांत धर्माविषयीं किंचित् जिज्ञासा उत्पन्न झालेली असते, व त्यांची बुद्धिरूप ज्योत नुकती कोठें प्रज्वलित होऊं लागलेली असते, ही गोष्ट खरी! परंतु खरा धर्म ह्मणून जो काय असतो, त्याच्या क्षितिजाच्या कक्षेजवळही त्यांची मजल जाऊन ठेपलेली नसते. आतां एवढी गोष्ट खरी कीं, त्यांच्या ह्या कृतींत अगदींच अर्थ नाहीं, असें ह्मणतां येत नाहीं. कारण, आज ना उद्यां, त्यांस धर्मरूपी जीवनाची तृषा लागल्याशिवाय राहणार नाहीं. सृष्टीचा तर असा एक विलक्षण नियम आहे कीं, शेत तयार झाल्यावर बीं हें कोठून ना कोठून तरी येऊन पडतेंच. त्याप्रमाणें एखादा

आत्मा धर्माचा खरा अधिकारी झाला म्हणजे त्यास गुरु कोठंना कोठें तरी भेटलाच पाहिजे व तो तसा भेटतोही. धर्मजिज्ञासु आत्म्याची, धर्मप्रकाशास आंत येऊं देण्याची शक्ति जसजशी वाढूं लागते, तसतसे त्याला प्रकाश देणारे जे गुरू, तेही अर्थात् तशाच प्रभावाचे भेटूं लागतात.

तथापि ह्यांतही पुष्कळ संकटें व अडचणी हीं आहेतच. पहा! मनाच्या क्षणिक लहरींना, जिज्ञासेचें खरें बीज समजून पुष्कळ शिष्य फसून जात असतात. येथच्या येथेंच कां पहाना? एखाद्या वेळीं आपला एखादा अगदीं जिव्हाळ्याचा मनुष्य इहलोक सोडून जातो, त्यामुळें आपल्या मनास धक्का बसतो; डोळ्यांपुढें जगाची क्षणभंगुरता व नश्वरपणा हीं ढळढळीत दिसूं लागतात; आणि आपणास ह्यापेक्षां उच्च प्रतीच्या व शाश्वत जगांत जाऊंन राहावेंसें वाटूं लागतें. म्हणजे आपल्या मनाची प्रवृत्ति पारमार्थिक दिशेकडे वळते. पण किती केलें तरी तें स्मशानवैराग्यच. थोडके दिवस गेले नाहींत तोंच ही मनानें घेतलेली उसळी पार जिरून जाते, आणि पुन्हां 'येरे माझ्या मागल्या' झालेंच सुरू; म्हणजे पुन्हां आपण पूर्वीं होतों तसे कोरडे पाषाणच बनून राहावयाचे. आपणांपैकीं पुष्कळांस ह्या ज्या लहरी येतात, त्याच खऱ्या धर्मजिज्ञासेच्या दर्शक होत, असें वाटतें; परंतु जोंवर ह्या क्षणिक लहरी म्हणजे धर्माची खरी व अखंड अशी तृष्णा होय असें मानून आम्ही फसत आहों, तोंवर आमच्या बुद्धीवर प्रकाश पाडणारा व आमच्या आत्म्यास प्रबुद्ध करणारा, खरा

गुरु आपणास भेटणार नाहीं. तर, सत्याची आपणास जिज्ञासा असतांही त्याचा शोध किंवा पाठलाग करण्यापासून कांहींच तथ्यांश हातीं लागत नाहीं, ह्मणून जेव्हां जेव्हां आपलें मन कुरकुर करूं लागतें, तेव्हां तेव्हां आपलें पहिलें कर्तव्य ह्मटलें म्हणजे, हें रडगाणें बाजूस ठेवून आपल्या अंतःकरणांतील खऱ्याखऱ्या स्थितीचा शोध करणें, हें होय. त्याचप्रमाणें आपल्या अंतःकरणांत जो सत्याच्या जिज्ञासेचा अंकुर फुटलासा भासतो, तो खरा आहे किंवा नाहीं, हेंही पाहिलें पाहिजे; आणि शोधाअंतीं आपणांस असें आढळून येईल कीं, आपणांपुढें असलेल्या पुष्कळ उदाहरणांमध्यें, हे अशा प्रकारचे लोक, सत्यप्रकाशाची प्राप्ति होण्यास खरोखर पूर्णाधिकारी नसतात. म्हणजे धर्मतृष्णेचें—परमार्थिकज्ञानाचें—खरें बीज त्यांच्या मनांत रुजलेलें नसतें.

पण गुरूच्या मार्गांत ह्याहीपेक्षां मोठालीं संकटें आडवीं पडलेलीं असतात. आपणांस असे पुष्कळ लोक आढळतील कीं, ते स्वतः जरी अज्ञानसागरांत गटकळ्या खात असले, तरीही अहंमन्यतेनें ते आपणास सर्वज्ञ समजून आपली शेखी मिरवीत असतात, इतकेंच नव्हे तर दुसऱ्यांना सत्यमार्ग दाखवून देण्याचीसुद्धां हमी घेतात; आणि मग आंधळ्यास जसा आंधळ्यानें मार्ग दाखवावा, तशी गत होऊन, ते आपल्याबरोबर आपल्या शिष्यांसही खड्ड्यांत पाडतात. म्हटलेंच आहेः—

"अविद्यायामन्तरे वर्तमानाः
स्वयं धीराः पण्डितंमन्यमानाः ।

जङ्घन्यमानाः परियन्ति मूढा
अन्धेनैव नीयमाना यथान्धाः ॥"

" अज्ञानी लोक आपणास पंडितंमन्य मानून, आपल्या कोरड्या ज्ञानानें फुगून जाऊन अज्ञानांधकारांत ठेंचा खात पडले असतांही, आंधळ्यास आंधळ्यानेंच वाट दाखवावी, तद्वत्‌च ठोंकरा घेत घेत, त्या अंधकारांतच गिरक्या मारीत बसतात.

(मांडुक्योपनिषद् १।२।८).

ह्या असल्या वेडगळ लोकांनीं जग कसें अगदीं गजबजून गेलें आहे! प्रत्येकास गुरु होण्याची हांव असते. पण ही हांव ह्मणजे एखाद्या भिकाऱ्यानें कोट्यावधि रुपये दान करावयाचें मनांत आणावें, अशापैकींच हास्यास्पद् होय!!



# प्रकरण ५ वें.

## गुरुशिष्यांचीं लक्षणें.



तर मग सद्गुरु कसा ओळखावा? अहो, सूर्य पहावयाला मशालीची का जरूर लागते? छेः! मुळींच नाहीं लागत. तो उगवला कीं पुरे, हा सूर्योदय झाला असें आपण चटकन् ओळखतों; तें कांहीं कोणीं सांगावें लागत नाहीं. तद्वतच, जेव्हां एखादे सद्गुरु, पतितांच्या उद्धाराकरितां, ह्या मृत्युलोकीं अवतरतात, तेव्हां आपल्या आत्म्यास कोणी देवदूत येऊन कानमंत्र देतो, अशांतला अर्थ नव्हे, तथापि तो आपण होऊनच, आपणांवर सत्य-ज्ञानाचा प्रकाश पडला आहे, अशी खूणगांठ बांधूं लागतो. **सत्य हें स्वतःप्रमाण आहे.** तें सिद्ध करण्याकरितां, बाह्य प्रमाणांची मुळींच गरज नाहीं. **इतकेंच केवळ नव्हे तर तें स्वयंप्रकाश आहे.** आपल्या अंतरंगांतील अगदीं कोनाकोंपऱ्यांत सुद्धां त्याचे किरण फांकत असतात. ह्या विश्वावर, ह्याप्रमाणें, त्याचा प्रकाश एकदां पडला पुरे, कीं, हें जग जणों काय आपल्या गाढ तमोमय निद्रेतून खडबडून जागें होतें, आणि 'हेंच तें सत्य,' 'हेंच तें सत्य' म्हणून डोलूं लागतें. तर ज्या गुरूंचें ज्ञान व सत्यनिष्ठा हीं सूर्यप्रकाशाप्रमाणें अप्रति-

हत तळपत असतात, ते अतिश्रेष्ठ,—जगद्वंद्य—जगद्गुरू होत, म्हणूनच सर्व लोक त्यांस देवाप्रमाणें भजतात. तरी ह्यापेक्षां कमी प्रतीच्या गुरूपासूनही आह्मांस आपला कार्य-भाग साधून घेतां येईल; परंतु ज्या अर्थी आह्मांस आपल्या गुरूची किंवा मार्गदर्शकाची—वाटाड्याची कसोटी नसते, तो बरा कां वाईट हें उमजण्याची शक्ति नसते, त्या अर्थी त्या जगद्गुरूची खूण पटावयास, कांहीं विशिष्ट पडताळे, किंवा लक्षणेंही अवश्य हवीं. तसेंच, शिष्यांसही तशींच कांहीं असलीं पाहिजेत.

आतां शिष्याच्या अंगीं लक्षणें पाहिजेत तीं हीं:—**शुद्धाचरण,** खरी **ज्ञानतृष्णा,** व **अढळ निश्चय.** अशुद्धाचरणी आत्म्यास खरें परमार्थज्ञान किंवा आत्मानुभव व्हावयाचा नाहीं. आचारशुद्धि तीन प्रकारची आहे. ते तीन प्रकार, म्हणजे कायिक, वाचिक व मानसिक शुद्धि, मुमुक्षूच्या किंवा शिष्याच्या अंगीं बाणले पाहिजेत. ज्ञानतृष्णेसंबंधीं पाहतां, पूर्वीपासूनच असा एक ठरीव नियम चालत आला आहे कीं, ‘ इच्छा असेल, तेथेंच फल हात जोडून उभें राहतें. ’ ज्याच्या लाभाची आपणास मुळीं इच्छाच नाहीं, तें कालत्रयीं तरी आपणास प्राप्त होईल काय? छे:, नांवच नको. खरी धर्मतृष्णा जागृत होणें, हें बरेंच कठिण आहे. निदान आपण नेहमीं जितकें समजतों, तितकें सुलभ तर तें खास नव्हे. आपण नेहमीं पारमार्थिक भाषणें कथापुराणें श्रवण करतों; किंवा तद्विषयक ग्रंथ वाचितों, म्हणून कांहीं तेवढ्यानें खरें परमार्थज्ञान अंतरीं बिंबलें, असें झालें नाहीं; तर त्याच्या इच्छे-

चा खरा अंकुर फुटे तोंपर्यंत व आपल्या स्वाभाविक मनःप्रवृत्तींवर पूर्ण शक चालेपर्यंत, त्या प्रवृत्तींशीं सारखें झगडत राहिलें पाहिजे. ही गोष्ट कांहीं एकदोन दिवसांत किंवा चारसहा वर्षांत बिलकुल साध्य होणारी नव्हे. हेंचसें काय पण चारदोन जन्मांतही सिद्धीस जाईल कीं नाहीं, याचा सुद्धां वानवाच! हा झगडा आपले शेंकडों जन्म जरी गेले तरी चालू ठेवलाच पाहिजे; तथापि अशा अनिश्चित स्थितीमध्यें युगेंही कंठण्यास आपण शांतपणानें तयार झालें पाहिजे. अशा अढळ निश्चयानें व अशा विलक्षण हिंमतीनें शिष्य अभ्यास करूं लागेल, तर त्याला शेवटीं जयश्री माळ घालतेंच घालते, व त्यास परमार्थज्ञान किंवा आत्मानुभव होऊन तो परमपदास पोंचतो.

आतां गुरूच्या लक्षणांपैकीं पहिलें लक्षण हें कीं, **तो आपल्या धर्मपुस्तकाशीं एकजीव झाला पाहिजे.** सर्व पृथ्वीवर वेद, कुराण, बायबल इत्यादि धर्मग्रंथांचीं पारायणें चाललेलीं असतात. पण तीं कशाकरितां? तर कोणास व्युत्पत्ति पाहिजे असते; कोणास भाषेचा इतिहास पहावयाचा असतो; कोणास त्यांतील भाषेची रचना म्हणजे पदलालित्य, शब्दसौष्ठव इत्यादि हवें असतें; तर कोणास नुसत्या वैय्याकरणी वाक्यरचनेवरच समाधान मानून घ्यावयाचें असतें, म्हणून. परंतु हा सर्व धर्माचा नुसता खटारखानाच म्हटल्यास हरकत नाहीं. कित्येकांचें नुसतें शब्दपांडित्यच तेवढें पाहून घेण्यासारखें असतें. अशा वाचाळ शिक्षकांच्या वाक्तांडवानें मूळ अर्थाचें मात्र गुळखोबरें होऊं लागतें! तेव्हां धर्मशास्त्राचा खरा अर्थ

**किंवा त्याचें रहस्य समजलेलें असणें हें एक गुरू-च्या लक्षणांपैकीं आद्यलक्षण होय.** धर्मपुस्तकांचें शब्दजाल हें एक निबिड अरण्य आहे. ह्यांत मानवी अंतःकरण एकदां सांपडलें कीं, तें आपला मार्ग चुकून भलतीकडेच भटकत सुटतें, आणि मग त्यांतून बाहेर निसटावयास त्यास एकही तोड सुचत नाहींशी होते. म्हटलें आहेः—'**शब्दजालं महारण्यं चित्तभ्रमणकारणं**'—'शब्द जाल हें एक मोठें अरण्य होय. त्यापासून चित्त भ्रमाच्या फेऱ्यांत सांपडतें' नानाविध शब्दांची रचना,—जिव्हाग्रावर साक्षात् वागीश्वरी स्थापून श्रोत्यांस गारींगार करून टाक-णारें हृदयंगम वक्तृत्व, तऱ्हेतऱ्हेचें शास्त्रीय प्रतिपादन, इत्यादि प्रकार पंडितांच्या वादविवादांत अत्युपयोगी होत, व त्यांस हें एक करमणुकीचें साधनच होऊन जातें; परंतु त्यापासून पारमार्थिक अनुभवांत लवलेशही भर पडत नाहीं. वचनच आहे कीं—

**वाग्वैखरी शब्दझरी शास्त्रव्याख्यानकौशलम्।**
**वैदुष्यं विदुषां तद्वत् भुक्तये न तु मुक्तये॥**

लोकांच्या मनांत धर्मज्ञान भरवून देतांनां, जे लोक वर सांगितलेली पद्धती स्वीकारतात, त्यांचा हेतु दुसरा तो काय असणार? लोकांत आपली पंडितगिरी मिरवावी; लोकांनीं 'पंडित पंडित' म्हणून डिंडिम पिटावा; किंवा पौरजनांनीं आपले स्तुतिपाठ गावे, देव्हारें माजवावें, एव-ढाच. आजतागायत जगामध्यें जे महान् महान् पुरुष गाजून गेले, त्यांनीं अशा पद्धतीचा कधींही अंगीकार केला

नाहीं, व ते करीतही नव्हते. ते धर्मशास्त्रांतील वाक्यांचा कधींही ओढून ताणून अर्थ करण्याच्या भरीस पडत नसत; किंवा शब्दार्थ, त्यांच्या व्युत्पत्ती व त्यांवर अनेकविध कोट्याही काढण्याच्या नादीं ते मुळींच लागत नसत; परंतु असें असतांही त्यांनीं लोकांस बावनकशी धर्मशिक्षण दिलें, असें आपणांस दिसून येईल; परंतु दुसरे जे कित्येक असतात, त्यांजपाशीं नवीन शिकविण्यासारखें कांहींच नसतें! त्या बहादुरांनीं केव्हांकेव्हां तर एकच शब्द पुढें घ्यावा, व त्यावर दोनदोन तीनतीन व्हाल्यूमचे जंगी ग्रंथ लिहावे. बरें; त्यांतील मुद्दे तरी किती बहारीचे! पुढें घेतलेला शब्द कसा आला, ह्मणजे प्रथमतः कोणत्या मनुष्यानें त्याचा कसा उपयोग केला, इत्यादि सांगून, नंतर तो मनुष्य काय काय खात असे, व किती झोंप घेत असे, ह्या व अशाच अति महत्वाच्या बाबींचा त्यांत परिपूर्ण विचार केलेला असावयाचा!!

भगवान् रामकृष्ण हे एक फारच मजेची गोष्ट सांगत असत. ती अशीः—कांहीं मंडळी एका आंबराईत गेली. कोणी झाडांचीं पानें, त्यांच्या शाखा, व उपशाखा, इत्यादींची मोजदाद करूं लागले; कोणी त्यांच्या रंगाची पारख करूं लागले, तर कोणी लांबीरुंदीचें प्रमाण काढूं लागले, आणि ह्याप्रमाणें बारीक रीतीनें नखशिखांत निरीक्षण झाल्यावर, ह्या बहारीच्या मुद्यांवर—अर्थातच हे विषय त्यांस मोठे बहारीचे वाटले असावे—वरील पंडितमंडळांत कडाक्याचा वादविवाद चालू झाला. परंतु त्यांतच एक गृहस्थ होते, त्यांची विद्वत्ता पडली कमी! पण

त्यांच्या तारतम्यज्ञानाची पायरी मात्र पंडितांपेक्षां जरा वरची होती, त्यांनीं ह्या वादाकडे ढुंकूनही न बघतां भराभर पुढें पडलेल्या मधुर आम्रफलांचा रसास्वाद घेण्यास आरंभ केला! आतां ह्या गोष्टींत अधिक शहाणपण कोणाचें? फलांचा उपभोग घेणारा जास्ती शहाणा नव्हे काय? आपणही डहाळ्या, पानें वगैरेंची गणती करण्याचें काम पंडितवांरच सोंपवूं. आतां हें काम अगदींच निरुपयोगी आहे, असें नाहीं. परंतु अध्यात्मसाम्राज्यांत त्याची एक कवडीसुद्धां किंमत नाहीं. अशा ह्या पानांचा हिशोब करणाऱ्यांत एकही महात्मा निपजलेला आपणांस आढळणार नाहीं. **धर्म हा सर्वार्थांचा मुकुटमणि, आणि मानवी बुद्धिवैभवाची निशाणी होय.** त्यास हा पल्लवगणिताचा अट्टहास कशास हवा? आपणास जर भक्तच बनावयाचें आहे, तर **कृष्ण मथुरेंत** जन्मला कां **व्रजांत** जन्मला? तो काय करीत होता? त्यानें **गीता** रचिली, तो काळ कोणता? ह्या गोष्टींशीं आपणास काय करावयाचें असतें? आपणांस हवें असतें, तें एवढेंच कीं, **गीते**मध्यें जीं काय तत्वें सांगितलीं आहेत, त्यांतलें मर्म कळलें ह्मणजे झालें. बाकी सर्व गोष्टी—ह्मणजे तिचा कर्ता कोण, तो केव्हां व कोठें जन्मला, इत्यादि—पंडितांच्या करमणुकीच्या होत. तेव्हां भक्तानें, ते सर्व विषय पंडितांचच आवडते असल्यामुळें, त्यांचे त्यांजवरच सोंपवून, त्यांच्या वादास 'ॐ शांतिः—शांतिः—शांतिः' ह्मणून आपल्या पुढ्यांत पडलेल्या आम्रफलांवर ताव मारण्यास आरंभ करावा.

आतां गुरूच्या अंगीं दुसरा जो गुण लागतो, तो **पवित्राचरण** हा होय. "गुरूच्या आचरणाशीं आपणांस काय करावयाचें आहे?" असा एक प्रश्न नेहमीं विचारण्यांत येतो. तसेंच, "गुरु जें काय शिकवीत असेल, तें बरोबर आहे किंवा नाहीं, हें पहावयाचें, व बरोबर असल्यास ग्रहण करावयाचें, एवढेंच काय तें आपलें काम असतें," असेही त्यावर उद्गार निघतात. परंतु हें ह्मणणें बरोबर नाहीं. **रसायनशास्त्र, गतिशास्त्र,** (Dynamics), **सृष्टिशास्त्र** इत्यादि शास्त्रें शिकवितांनां शिक्षकाची वर्तणूक कशीही असल्यास चालते. कारण, त्यांत बुद्धीस प्रगल्भता आणावयाची, हा काय तो मुख्य उद्देश असतो; परंतु अध्यात्मशास्त्राची गोष्ट अगदीं निराळी. त्यांत ज्याचा आत्मा शुद्ध नाहीं त्याजकडून आपल्या आत्म्याची प्रगति होणें, दुरापास्त असतें. तेव्हां अशुद्धाचरणी मनुष्य शिकविणार तो काय? **अध्यात्मज्ञान** स्वतः मिळविणें झाल्यास किंवा दुसऱ्यास त्याचा लाभ करून देणें झाल्यास चित्तशुद्धी—आत्मशुद्धी—शिवाय एक केंसभरही पुढें पाऊल टाकतां येणार नाहीं. आत्मशुद्धि झाल्याशिवाय **परमात्म्याचें** दर्शन होणें किंवा इंद्रियातील अनंताकडे ओझरती नजर फेंकतां येणेंसुद्धां कठीण! ह्मणून धर्मगुरूचें प्रथमतः लक्षण पाहावयाचें तें हें कीं, **तो कसा आहे?** नंतर मग तो काय ह्मणतो याचा विचार. **पहिली गोष्ट ह्मणजे तो पवित्र असला पाहिजे.** तरच त्याच्या शब्दांना कांहीं तरी किंमत येते. असा असेल तोच भवसागरांतून पैलपार नेणारा खरा नावाडी—खरा गुरु—समजला पाहिजे. नाहीं तर

'आडांतच जर नाहीं, तर पोहऱ्यांत कोठून येणार?' ह्या ह्मणीप्रमाणें, गुरूला स्वतःलाच आत्मशक्ति नसेल तर तो दुसऱ्यास तरी कोठून देणार? आधीं गुरूचा आत्मा परमपदास पोंचलेला पाहिजे, तरच त्याच्या समागमानें शिष्यास उन्नत दशा प्राप्त होईल. **गुरूचें मुख्य काम ह्मणजे आत्मोन्नती करून देणें हें होय.** नुसत्या असलेल्या मूळच्या बुद्धीस निराळें वळण देणें नव्हे, कांहीं तरी नव्याच व खऱ्या ज्ञानाचा प्रवाह गुरूकडून शिष्याकडे जावयाचा असतो; याकरितां **गुरु पूर्ण पवित्राचरणी पाहिजे.**

गुरूचें तिसरें लक्षण ह्मणजे त्याचा **हेतु शुद्ध असणें,** हें होय. गुरूनें ज्ञान द्यावयाचें तें आपल्या कांहीं ऐहिक फायद्याकरितां—ह्मणजे पैसा, नांव, कीर्ति ह्यांच्या आशेनें—देऊं नये. त्याचा हेतु फक्त भवत्रस्तांस तारणें, एवढाच असावा. त्यानें आपला कार्यभाग, हजारों मनुष्यजातीचा कळवळा येऊन, अगदीं शुद्ध प्रेमानें केला पाहिजे.—ह्मणजे तो केवळ प्रेमाचा पुतळाच बनलेला पाहिजे. कारण, **अंतर्यामीं अध्यात्मिक शक्तींचा प्रवेश होण्याचें द्वार काय तें प्रेमच होय.** द्रव्यलोभ किंवा कीर्तिलोभ ह्यांचें वारें गुरूच्या मनांत संचरलें कीं, हें द्वार उलथून पडलेंच! ईश्वर हा प्रेमस्वरूप आहे. तेव्हां त्या प्रेमस्वरूपाची ज्यास ओळख पटली, त्यालाच दुसऱ्यास अध्यात्मिक विषय चांगला समजावून देतां येईल, व परमपदाची वाट दाखवितां येईल.

आपल्या गुरुमध्यें हीं सर्व लक्षणें, परिपूर्ण भरलीं आहेत असें दिसून आल्यास, मग तुह्मांस कशाचीही भीति उरली नाहीं; परंतु तसें नसल्यास त्याचें शिष्यत्व पत्करणें फार भयावह होईल! कारण, मग त्याच्या संगतीनें तुमच्या अंगांत सात्विकपणा बिंबण्याचें तर नांवच नको, पण उलटें दुष्ट बुद्धीचें बीजारोपण मात्र होण्याचा संभव असतो. तर ह्या कामीं होतां होईल तों जपलें पाहिजे. 'श्रोत्रियोऽवृजिनोऽकामहतो यो ब्रह्मवित्तमः' । :-“ जो विद्येनें—ज्ञानानें परिपूर्ण, आचरणानें—निष्कलंक, आणि ज्याच्या मनास विषयाचा विटाळसुद्धां झाला नाहीं, तोच ब्रह्मज्ञानी समजावा.”

वरील प्रतिपादनावरून आपणास हें कळून चुकलेंच असेल कीं, आपल्या मनांत धर्माविषयीं जिज्ञासा, प्रेमभाव, व एके प्रकारची लालसा उत्पन्न होणें, ही गोष्ट सर्वांनाच सर्वत्र, सर्वदा, साधते असा नेम नाहीं. 'झुळझुळ वाहणाऱ्या नदीनाल्यांचें पाणी, हीच शाई करून, काष्ठलोष्ठादि वस्तू हेच कागद घेऊन धात्यानें त्यांजवर स्तुती व प्रार्थना लिहून ठेविल्या आहेत,' 'आणि तो स्वतः सर्वांत विद्यमान आहे' असें कविजन वर्णितात, हें सर्व जरी खरें आहे, तरी एका मनुष्यानें, दुसऱ्या मनुष्यास सत्योदधींतील एक थेंबही जरी देऊं ह्मटलें, तरी त्याच्या स्वतःच्या अंगीं सत्य बाणल्याशिवाय तो मुळींच देतां येणार नाहीं. दगडांपासून व झुळझुळ वाहणाऱ्या नदीनाल्यांपासूनसुद्धां ईश्वरज्ञान होईल. पण तें कोणास? ज्या मनुष्याचें हृत्कमल, अंतःकरणाच्या पवित्रतेमुळें प्रफुल्ल झालें असेल, त्यालाच. बरें; ज्या प्रकाशानें हृत्कमल प्रफुल्ल होतें, तो तरी आपोआप येतो काय? छेः—

तो सद्गुरुरूपी सूर्यावांचून यावयाचा नाहीं. एक वेळ हें कमळ प्रफुल्ल झालें कीं मग काय विचारावें? मग त्यास दगड काय, धोंडे काय? नदीनाले काय? सूर्य काय? चंद्र काय? आणि सृष्टींतील कोणतीही वस्तू घेतली तरी काय? 'जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं' त्यास देव हा दिसावयाचाच!! परंतु सद्गुरुप्रकाशानें ज्यांचें हृत्कमल विकास पावलें नाहीं, त्यांना मात्र दगड ते दगडच व नाले ते नालेच!! एखादा आंधळा मनुष्य प्रदर्शन पाहावयास गेला तर त्या बिचाऱ्यास तेथें काय दिसणार? प्रथमतः त्यास दृष्टिज्ञान झालें पाहिजे, तरच त्यास प्रदर्शनांत काय काय वस्तू मांडल्या आहेत त्या दिसतील, नाहीं तर 'रामाय तस्मै नमः'.

गुरु हा शिष्यास अशा प्रकारची ज्ञानदृष्टी देत असतो. तेव्हां गुरूचा व आपला संबंध म्हटला म्हणजे, पूर्वज व वंशज यांच्यामधील नात्यासारखाच होय. आपल्या मनांत गुरुविषयीं पूज्यभाव किंवा भरंवसा जर वागणार नाहीं, तर, व आपण त्याशीं नम्रतेनें वागलों नाहीं तर मात्र धर्मबुद्धीची वाढ होणें अशक्य होय. आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे, ती ही कीं, जेथें गुरुशिष्यांत विलक्षण प्रेम वसत असतें, तेथेंच अतर्क्य शक्तीचे महात्मे निपजतात. पण ज्या देशांत अशा प्रकारचा गुरुशिष्यसंबंध विलयास गेलेला असतो तेथें धर्मगुरु म्हणजे निव्वळ उपदेशक बनून गेलेले असतात. म्हणजे त्यांस सारी दहापांच छदामांची प्राप्ति असते, व तेवढ्या किंमतीचा मोबदला म्हणून शिष्य आपल्या शिक्षकांच्या शब्दांनीं मेंदूचा खजिना भरून टाकतात आणि मग, असले

परमहंस व त्यांचे पट्टछात्र, दोघेही आस्या वाटेनें निघून जातात. अशा वस्तुस्थितींत खरें आध्यात्मिक ज्ञान काय तें शपथेससुद्धां मनास शिवत नाहीं. कारण, खरे शिष्य व खरे गुरु ह्या दोहोंचाही शून्याकार असतो! अशा कपींस धर्म म्हणजे नित्याच्या धंद्यांपैकीं एक धंदासा वाटत असतो, व तो पैसे देऊन घेतां येईल, अशी ह्या मुमुक्षुबहादुरांची कल्पना असते! पारमार्थिक ज्ञान अशा सोप्या रीतीनें लोकांस मिळावें, अशी माझीही ईश्वरास प्रार्थना आहे. परंतु आमच्या दुर्दैवानें वस्तुस्थिति तशी नाहीं, त्यास इलाज काय?

छेः! छेः! बाबांनो! **धर्म हें एक ज्ञानाचें उच्च शिखर, व परमार्थाचें भांडार आहे. तें पैसे देऊन घेतां येईल, किंवा ग्रंथ वाचल्यानें मिळेल, हें स्वप्नींही आणूं नका.** जगाचे सर्व कानेकोपरे धुंडाळा; आल्प्स्, कॉकेशस, हिमालय अशा कोणत्याही पर्वताचें उच्च शिखर गांठा; अगाध रत्नाकराचा ठाव काढा; आणि हवें तर गोबीचें अरण्य, व तिबेटाचा कोंपरान्‌कोंपराही काकदृष्टीनें न्याहाळून पहा; कांहीं करा, पण जेथपर्यंत आपलें अंतःकरण परमात्मज्ञानास अधिकारी झालें नाहीं, किंवा सद्गुरुप्रसाद घडला नाहीं, तेथपर्यंत तुम्हांस परमार्थज्ञान ब्रम्हांडांतही सांपडावयाचें नाहीं. त्या देवदत्त गुरूची भेट झाल्यावर त्याची एखाद्या पितृभक्त मुलाप्रमाणें सेवा करा; तो जें जें काय सांगेल, ते ते शब्द झेलण्यास मनापासून तयार व्हा; आणि गुरु म्हणजे एक ईश्वराची सगुण

मूर्तिच आहे, असें समजून त्याची पूजा करा. अशा प्रेमरसानें जेव्हां अंतःकरण थबथबतें, व आदरानें रंगून जातें, आणि मग आपण सत्यशोधनार्थ त्याजकडे जातों, तेव्हांच सत्याचा अतीव पुतळा जो प्रभु, ईश्वर, तो साक्षात्, सत्य, सौजन्य, व सौंदर्य इत्यादि गुणांनीं डवरलेल्या अनेक अद्भुत गोष्टींचें ज्ञान करून देतो.





# प्रकरण ६ वें.

## अवतारी पुरुष.



त्या प्रभूच्या नामाचा जेथें जेथें घोष चालत असतो, तें तें स्थल पवित्रच होय. तर मग ज्याच्या तोंडून तें श्रवण करावयास मिळतें त्याची पवित्रता काय सांगावी ? आणि ज्यापासून त्या प्रभूचें खरेंखरें ज्ञान प्राप्त होतें, त्या सद्गुरूविषयीं आपल्या मनांत केवढा बरें पूज्यभाव वागावा ? ह्या भूमंडलावर असें परमार्थज्ञान देणारे महात्मे खरोखरच फार थोडके असतात. परंतु अगदींच नसतील, असेंमात्र कधींही घडावयाचें नाहीं. कारण ह्या पृथ्वीवर त्यांचें एक निमिषमात्र जर वास्तव्य नसेल, तर हें जगत् एक भयंकर नरककुंड होऊन, त्यास तत्काल मोक्षाची वाट सुधारावी लागेल ! ! गुरू हे निरपेक्ष, दयासागर ' अहेतुक दयासिंधु ' असे असून, ह्या मानवी जीवितवृक्षास ते अतिसुंदर मोहोर चढल्याप्रमाणें शोभतात. भगवान् श्रीकृष्णांनीं गीतेंत ह्मटलेंच आहे.–' आचार्यं मां विजानीहि–' ' मीच तो गुरु, असें समज. '

ह्याहूनही श्रेष्ठतर अशा गुरूंचा एक वर्ग आहे. ते गुरू ह्मणजे साक्षात् ईश्वरी अवतारच होत. ह्यांच्या

योगानें परमार्थज्ञानप्राप्ति होते ती नुसत्या स्पर्शानें, केवळ इच्छामात्रेंकरूनही होते. ते आपल्या इच्छाबलानें अधमाधमांचेही क्षणार्धात साधू बनवून सोडतात. ते सर्व गुरूंचेही गुरू, व मानवजातींत ईश्वराचे अतिश्रेष्ठ अंश, विभूती, होत. आम्हांस त्यांचें भजन केल्याशिवाय राहवतच नाहीं, आणि भजनपूजनास योग्य असे पुरुष काय ते तेच असतात.

ईश्वराचें दर्शन घडणें तें अशा ईश्वरी अंशाच्या द्वारेंच घडावयाचें. इतरथा कोणत्याही अन्य रीतीनें आम्ही त्यास पाहावयास जाऊं, तर ईश्वर भेटण्याचें लांबच राहो, परंतु त्या ऐवजीं एखादा सैतान मात्र मोठा छान भेटतो, म्हटल्यास चालेल; आणि खरा परमेश्वर तो तोच, असें आपण मूर्खपणानें समजूं लागतों. एका अडाणी मनुष्याकडे, एक शिवाची मूर्ती करून देण्याचें काम आलें. त्या बिचाऱ्यानें अविश्रांत श्रम करून, ती मूर्ती एकदांची तयार केली. पण पाहतो तों हुबेहुब माकडाची प्रतिमा वठली ! ! त्याचप्रमाणें आपण जेव्हां त्या कैवल्यधाम सर्वगुणसंपन्न प्रभूची कल्पना करूं लागतों, तेव्हां बहुधा आपणास ती साधतच नाहीं. कारण जोंपावेतों आपला मनुष्यस्वभाव कायम आहे, तोंपावेतों त्या मानवी कल्पनातीत परमेश्वराची कल्पना होणें अशक्य होय; परंतु अशी एक वेळ येईल कीं, आपण मानवस्वभावातीत स्थितीस पोंचून, ईश्वर जसा आहे तसा पाहूं लागूं. परंतु जेथपर्यंत मनुष्यमात्र आहों, तेथपर्यंत आपण तो ईश्वर, मनुष्यांपैकीं एक अतिश्रेष्ठ मनुष्य कल्पून, म्हणजे त्याज-

वर उत्कृष्ट मानवी गुणांचा आरोप करूनच, त्याचें आम्हीं भजनपूजन केलें पाहिजे. तुम्ही पाहिजे तितकीं भाषणें करा; कीं हवा तेवढा जिवाचा अट्टहास करा; पण मानवी गुणांविरहित ईश्वराची कल्पना तुम्हांस होणार नाहीं. मोठमोठालीं युक्तिवादप्रचुर अशीं भाषणें, ईश्वरासंबंधीं किंवा हव्या त्या विषयासंबंधीं, आपणांस करतां येतील; आपण बुद्धिवादीही व्हाल; आणि मनुष्यांच्या ईश्वरी अवतारासंबंधीं ज्या कल्पना आहेत, त्या सर्व झूट आहेत, असें मनाचें समाधानही करून घ्याल. पण क्षणभर व्यावहारिकदृष्ट्या आपण सारासार विचार करूं कीं, ह्या एवढ्या बुद्धिवादांतून तथ्य तें काय निघालें? तर शून्यच! अर्थात् कांहीं नाहीं! सारा अभावाचा भोंपळा!! तेव्हां हा बुद्धिवाद म्हणजे व्यर्थ बडबड होय! जेव्हां आपण एखादे वेळीं ह्यासंबंधानें एखादा मनुष्य भाषण करीत असतांनां ऐकाल, तेव्हां त्यास गांठून, ईश्वर, त्याची शक्तिमत्ता, त्याची सर्वव्यापकता इत्यादीविषयीं त्याची कल्पना, हीं शब्दांबाहेर कांहीं आहे किंवा काय तें विचारून पहा. म्हणजे आपणास कळून येईल कीं, त्या शब्दांपासून, त्यास कांहींच ज्ञान झालेलें नसतें. कारण, त्यांचा अर्थ सांगणें तो, त्यास, आपल्या मानवी स्वभावानुरूप ज्या कांहीं कल्पना असतात, त्याबाहेर कांहीं सांगतां येत नाहीं. रस्त्यांतून भटक्या मारणारा, एखादा अक्षरशत्रु तरी बरा! त्याची व असल्या मनुष्याची स्थिति जवळजवळ सारखीच असते. फरक एवढाच कीं, अक्षरशून्य मनुष्य कोठें गडबड करून, जगांतील शांततेचा भंग

करीत नाहीं; पण हे दुसरे महान् पंडित उर्फ बडबडे-नंदन, तिचाही भंग करून, मनुष्यजातीस आगींतून काढून, फोपाव्यांत घालतात!! एकंदरींत **धर्म हें सत्यज्ञान आहे. तेव्हां नुसते तोंडाचे फवारे व खरेंखरें अध्यात्मिक ज्ञान किंवा सत्य, ह्यांच्यामध्यें सूक्ष्मदृष्ट्या जमीन-अस्मानाची तफावत आहे, हें आपण नेहमीं ओ-ळखून असलें पाहिजे. अंतःकरणाच्या अगदीं खोल-खोल विवरांत जेव्हां आपण कांहीं सत्य गोष्टींचा अनुभव घेतों, तेव्हां तीस साक्षात् प्रतीति असें म्हण-तात. ज्यास आपण साधारण ज्ञान म्हणून म्हणतों, त्याच्यासारखें विलक्षण किंवा असाधारण वस्तुतः दुसरें कांहींच नाहीं.**

आपल्या मनाची सध्यां जी विचारघटना आहे, ती-वरून पाहतां, किंवा ती आहे तशीच घेऊन चाललें तर, आम्हांस ईश्वराची कल्पना, त्यावर मानवी गुणांचा आरोप केला, तरच झाली तर होईल. कारण, आम्ही प्रत्येक अ-सामीं मानवी स्वभावाचेच बंदे गुलाम आहों. समजा, उद्यां एखाद्या रेड्याच्या मनांत ईश्वरभक्तीचें वारें शिरलें, तर त्याच्या उपजत मनोधर्मानुसार त्याला ईश्वर म्हणजे एक भला मोठा रेडा आहे, असेंच वाटूं लागेल. त्याचप्रमाणें एखाद्या माशाच्याही मनांत तसेंच करावयाचें असल्यास, त्यासही आपल्या जातिस्वभावाप्रमाणें ईश्वर म्हणजे एक अ-वाढव्य मासा आहे, असेंच भासूं लागेल. तीच गत मनुष्याची. **मनुष्यास ईश्वर म्हणजे एक सर्वांगपरिपूर्ण असा**

मनुष्य आहे असेंच वाटणार, त्यावांचून त्यास गत्यंतर नाहीं. तथापि ह्या सर्व कल्पना मृगजलवत् भासमान होत असें मात्र समजूं नये. मनुष्य, रेडे, गाई, बैल, मासे हीं सर्व निरनिराळीं भांडीं होत, असेंच धरून चाला. हीं सर्व भांडीं—पात्रें—आपला आकाररूप जलाचा निधि जो ईश्वर त्यांतून, आपआपल्या धारणाशक्त्यनुरूप भरभरून पाणी आणीत आहेत. तर मनुष्यरूपी पात्रांतील पाणी मनुष्याच्याच आकाराचें असावयाचें; महिषरूपी पात्रांतील महिषाकार; व मत्स्यरूपी पात्रांतील मत्स्याकारच असणार. आतां ह्या भांड्यांत पाण्याचे आकार व संचय जरी भिन्न भिन्न असले, तरी पाणी हें येथूनतेथून एकसारखेंच; म्हणजे एकाच ईश्वररूपी जलनिधींतून आणलेलें असावयाचें. त्याचप्रमाणें मनुष्याच्या मनांतील ईश्वराची कल्पना मानवीच असली पाहिजे, यांत शंका नाहीं, व इतर प्राण्यांनाही तो, त्यांस त्यांची कांहीं कल्पना आहे, असें घटकाभर धरून चालल्यास, त्यांच्या त्यांच्या धारणाशक्तीप्रमाणें किंवा विशिष्ट कल्पनेप्रमाणें, आपआपल्यापरी प्राणीच वाटणार. तेव्हां मानवी स्वभावाबरहुकूमच ईश्वराची कल्पना केल्यावांचून, आम्हांस तरी निदान निर्वाह नाहीं. म्हणूनच त्याला आपण मानवी स्वरूप कल्पून पूजिलें पाहिजे, हें निर्विवाद आहे.

आतां ईश्वरावर मानवी स्वरूपाचा आरोप करून पूजा न करणारे, जे लोक असतात, त्यातही दोन प्रकार आहेत. पहिला प्रकार ह्मणजे धर्मविहीन मनुष्यांचा. 'साक्षात् पशुः पुच्छविषाणहीनः' ही त्याची कोटि; आणि दुसरा

प्रकार, परमहंसांचा; ह्या प्रकाराच्या लोकांनीं मनुष्य-स्वभावाची कक्षा व तदनुषंगिक दोष—विकार—ह्यांच्या पलीकडे उडी मारलेली असते. ह्या परमहंसांस सर्व सृष्टि ह्मणजे आपणच अशी भावना झालेली असते. तेच काय ते निराकार, निर्विकार परमेश्वर स्वरूपास ओळखूं जाणत! व त्याच्या खऱ्या स्वरूपाची पूजा करणारेही तेच! हे दोन्हीही वर्ग परस्परविरोधी आहेत. एक ह्या टोंकास तर दुसरा त्या टोंकास—परंतु दोन्हीं टोकें जशीं एका रेषेंत मिळतात, तशींच ह्या दोन्ही वर्गांतील एक अगदीं अडाणी व दुसरा महाज्ञानी, या दोहोंसही एक गोष्ट साधारण आहे, ती ह्मणजे हे दोघेही सगुणोपासना करीत नाहींत. पण वर सांगितलेले मानवी पशु अज्ञानामुळें करीत नाहींत, व दुसरे जे जीवन्मुक्त (परमहंस) ते, ईश्वर हा स्वरूपीच आहे, ह्या परमतत्वाचा त्यांस अनुभव घडल्यामुळें, करीत नाहींत, आतां दोन्ही टोंकांच्या मध्यस्थितींत जे आहेत, त्यांपैकीं एखादा जर सगुणोपासना न करील, तर मात्र त्या लालांच्या जुक्तींबद्दल आपणास फार जपून वागलें पाहिजे. अगदीं मृदु शब्दांनीं त्यांची पूजा करावयाची ह्मणजे अशी—ते अद्वातद्वा बरळणारे होत; व त्यांचा धर्म ह्मणजे जे बुद्धीहीन वेडे पीर असतात, त्यांच्या पसंतीचा!!

मनुष्यजातीची अनिष्ट दशा ईश्वरास समजते; व तिच्या उद्धाराकरितां, तो त्याच रूपानें भूतलावर अवतरतो. गीतेंत भगवान् श्रीकृष्ण म्हणतातः—

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत।
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम्॥

**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ १ ॥**

"धर्माचा जेव्हां जेव्हां ऱ्हास होऊं लागतो, व दुर्गुणांचा फैलाव होतो, तेव्हां तेव्हां मी पृथ्वीवर अवतरतों." "धर्माची स्थापना करण्याकरितां, दुष्कृतांचा विध्वंस करण्याकरितां, व सत्त्वांचें रक्षण करण्याकरितां मी युगायुगाचे ठायीं जन्म घेतों."

**अवजानंति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् ।**
**परं भावमजानंतो मम भूतमहेश्वरम् ॥ २ ॥**

"मी जगताचा धनी आहें, हें माझें खरें स्वरूप न जाणतां, मी मनुष्यच आहें, असें समजून जे माझा उपहास करितात, ते मूर्ख होत." **भगवान् श्रीरामकृष्ण** म्हणतात:—एखादी मोठी समुद्राची लाट आली ह्मणजे लहान लहान खांचखळगे सहजींच अगदीं कांठोकांठ भरून जातात. त्याचप्रमाणें एखादा अवतार झाला म्हणजे जगतावर जणों काय अध्यात्मज्ञानाची लाटच उसळते, आणि लोकांना सर्व वातावरणच परमार्थज्ञानमय होऊन गेलें आहे असें दिसूं लागतें."



## प्रकरण ७ वें.

### मंत्र, ॐ शब्द व ज्ञान.



परंतु आतां आपण जो विचार करीत आहों, तो ह्या अवतारी महापुरुषांसंबंधीं नव्हे, तर फक्त सिद्ध गुरू, म्हणजे ज्यांनीं परमार्थज्ञानाची सीमा गांठली आहे, त्यांसंबंधीं होय. साधारण नियम असा आहे कीं, त्यांस मंत्रोपदेशाच्या साह्यानें शिष्यांच्या मनांत परमात्मज्ञानाचें बीज पेरावयाचें असतें. मंत्र म्हणजे काय तें आतां पाहूं. अखिल विश्वाच्या व्यक्त स्वरूपास **नाम** व **रूप** हीं कारणीभूत होत, असा आर्यतत्वज्ञानाचा सिद्धांत आहे. तसेंच मनुष्यमात्राच्या ह्या चिमुकल्या मानससृष्टींत (**चित्तवृत्तींत**)ही **नाम** व **रूप** ह्यांच्या आधाराशिवाय एकही विचारलहरी जागृत व्हावयाची नाहीं. आतां हें जर खरें असेल कीं, विश्व हें एकाच विभूवर—तत्वावर—उभारलेलें आहे, तर सर्व विश्वरचनेचाही पाया ह्या **नामरूपा**च्याच आधारावर रचलेला आहे, असें म्हटलें पाहिजे. '**यथा एकेन मृत्पिण्डेन विज्ञातेन सर्वं विज्ञातं भवति।**'—'मातीच्या एका ढेंकळाची माहिती झाली, तर सर्व मातीचीही झाल्याप्रमाणेंच असते' तेव्हां 'जें पिंडीं तें ब्रह्मांडीं' ह्या न्यायानें

आपल्या इवल्याशा मनःसृष्टीच्या ज्ञानावरून, ह्या अकटोविकट बाह्य विश्वाचेंही ज्ञान होईल. तर, ह्या ब्रह्मांडरूपी फळाची, **रूप** किंवा आकार ही बाह्य कवची आहे, आणि **नाम** किंवा कल्पना हा त्या फळाचा गाभा होय. **शरीर हें बाह्य रूप आहे, आणि मन किंवा अंतःकरण, हें नाम किंवा त्याचें कल्पनामय मूळ कारण होय.** ज्या ज्या प्राण्याला वाणी असते, त्या त्या सर्वांमध्यें कल्पनेची म्हणजे **नामा**ची आणि शब्दाक्षराची अगदीं सांगड जळलेली असते. व्यक्तिमात्राकडे नजर फेंकल्यास, असें दिसून येतें कीं, त्याच्या चित्तांत किंवा **महत्*** तत्वांत विचारलहरी उत्पन्न होऊन, त्या प्रथम शब्दरूपानें व नंतर अधिक व्यक्त अशा स्वरूपानें म्हणजे स्थूल आकारानें व्यक्त हातात.

**ब्रह्मा** किंवा **हिरण्यगर्भ** अथवा विश्वाचें चित्तत्व, ज्यास **महत्** अशी संज्ञा आहे, तें प्रथमतः **नाम** ( म्हणजे कल्पनासृष्टि ) व नंतर आकार किंवा **रूप** ( बाह्यसृष्टि ) ह्या दोहोंच्या रूपानें व्यक्त झालें. आपणास जें हें इंद्रियगोचर बाह्य विश्व, स्पष्टाकृति दिसत आहे, तें सर्व आकार किंवा **रूप** ह्यांतच अंतर्भाव पावतें, व त्याच्या मुळाशीं अनादि व अव्यक्त असा **स्फोट** म्हणजे व्यक्तीकरणशक्ति म्हणून एक शक्ति कल्पिलेली आहे, ती असते. हा जो अनादि **स्फोट** म्हणून वर सांगितला, तो सर्व **नाम** अथवा कल्पना ह्यांचें अनादि मूलद्रव्य होय. ईश्वर सृष्टी उत्पन्न

* ज्या द्रव्याचें मन बनलें आहे, त्यांस महत् म्हणतात.

करितो, किंवा प्रथमतः तो **स्फोट** बनतो, आणि नंतर इंद्रियगोचर अशा ह्या विश्वरूपानें व्यक्त होतो. ह्या **स्फोट-शक्ती**चा दर्शक असा एकच शब्द संभवतो व **त्यासच ॐकार** अशी संज्ञा देतात. पदार्थांचें पृथक्करण करण्याचें कोणतेंही व कसलेंही साधन असो, त्यानें कल्पना व शब्द ह्यांचें पृथक्करण कांहीं करितां येत नाहीं. त्या अर्थी **ओम्** आणि तो अनादि **स्फोट** हे भिन्न म्हणजे एकच असले पाहिजेत, आणि म्हणूनच, **सर्व नामरूपांचा जनिता,** आणि **पवित्रांतील पवित्र शब्द जो अनादि ओंकार** त्याजपासूनच ह्या सर्व विश्वाची उत्पत्ति झाली आहे, असें म्हणण्यास कांहीं प्रत्यवाय दिसत नाहीं. आतां यावर असा आक्षेप निघेल कीं, जरी शब्द आणि तद्विषयक कल्पना, ह्यांचें पृथक्करण करितां आलें नाहीं, तरी एकाच कल्पनेचें दर्शक म्हणून अनेक शब्द प्रचारांत असतात. तर याप्रमाणें पाहतां, ज्या मूल विचारशक्तीपासून सृष्टीची उत्पत्ति झाली, तिचा दर्शक म्हणून, केवळ प्रणव किंवा ओंकार हा एकच शब्द असण्याची तादृश जरूर दिसत नाहीं. ह्यावर आम्ही असें म्हणतों कीं, त्या मूल विचारशक्तीमध्यें (**स्फोटा**मध्यें) जितक्या कांहीं गोष्टींचा अंतर्भाव होतो, तितक्या सर्वांचा समावेश होईल, असा शब्द एक **ओंकारच** होय. त्याजसारखा दुसरा शब्दच मिळणें दुरापास्त! **स्फोट** हा मुळीं सर्व शब्दांचें मूळपीठ होय. परंतु व्यक्त व पूर्णावयवी शब्द जितके आहेत, त्यांत अमुक एक तो आहे असें म्हणतां येणार नाहीं. म्हणजे ज्या विशिष्टभेदामुळें—लक्षणामुळें—एका शब्दापासून दुसरा

शब्द निराळा आहे, असें चटकन् ओळखतां येतें, तें कारण किंवा तो भेद त्यांतून काढून टाकल्यास जें काय अवशिष्ट राहील, तोच **स्फोट** होय. म्हणून ह्या **स्फोटास नादब्रह्म** किंवा **शब्दब्रम्ह** असें म्हटलेलें आढळतें. ह्यावरून दिसून येईल कीं, कोणताही शब्द घेतल्यास त्याचें ( **स्फोटाचें** ) त्यांत एक विशिष्टच लक्षण दर्शविलें जाईल. म्हणजे **स्फोटाचें** स्फोटपणच त्या शब्दांत नाहींसें होतें. तेव्हां अशा तऱ्हेचें विशिष्ट वळण ज्यांत अतिशय कमी दर्शविलें जाऊन, त्यांचें खरें सामान्य स्वरूप बऱ्याच अंशानें ज्यांत प्रगट होईल, तोच शब्द त्या **स्फोट**शब्दाचा दर्शक, असें समजलें पाहिजे. आणि असा शब्द **ओंकार** हाच काय तो आहे. कारण **ओम्** हा शब्द अ, उ, व म् ह्या तीन **अक्षरांचा मिळून झाला आहे**, आणि तीनही अक्षरें सर्व निरनिराळ्या अक्षरांचें शक्य तेवढ्या साररूपानें सर्व साधारण रूपानें दर्शक किंवा अंशभूत आहेत. ज्यांमध्यें सर्व ध्वनींचें सार व जो सर्व शब्दांत किंवा अक्षरांत विशिष्ट विरहित आहे, असा कायतो अ हा स्वरच होय. ह्मणून **भगवद्गीतेंत** ह्मटलें आहे कीं, 'अक्षराणां अकारोस्मि, ह्मणजे 'सर्व अक्षरांत अकार तो मीच होय.' तसेंच, आपण जे जे उच्चार करतों, ते ते सर्व जिभेच्या बुडख्यापासून तों ओंठापर्यंत आपल्या तोंडाची जी पोंकळी आहे, तींत उत्पन्न होतात. जिभेच्या बुडख्यापासून उत्पन्न होणारें अक्षर अ व ओंठापासून होणारें म्; आणि जिभेच्या बुडख्यापासून तों ओंठापर्यंत शब्दाची जी प्रसरणक्रिया किंवा घुमणें

होते, तिचें बरोबर दर्शक उ हें अक्षर होय. प्रणवाचा बरोबर उच्चार केला असतां, शब्दोच्चारामध्यें ज्या क्रिया घडतील, त्या सर्वांचें दर्शक **ओम्** हें होईल. हें काम दुसऱ्या कोणत्याही शब्दानें भागणार नाहीं. तेव्हां **स्फोटशक्तीचा** यथायोग्य दर्शक तोच; व **ओम्चा खरा अर्थही स्फोटशक्ति हाच होय.** ज्या अर्थी शब्द व त्यांचें दर्शकचिन्ह ह्यांस वेगळें करतां येत नाहीं त्या अर्थी **ओम्** व **स्फोट** हे एकच असले पाहिजेत, आणि **स्फोट हें विश्वाचें आदिकारण आहे,** त्या अर्थी ईश्वराशींही त्याचें बरेंच साम्य आहे, व ईश्वराचें मूळचें व्यक्त स्वरूप तोच आहे, तेव्हां **ओम् हें जें त्याचें चिन्ह, तेंही खरोखरी ईश्वराचेंच चिन्ह होतें.** आणखी जसें, एकच, अखंड, व सच्चिदानंद अशा त्या ब्रह्माची कल्पना, मनुष्यांच्या अपूर्ण आत्म्यास एका विशिष्ट स्थितीमध्येंच व कांहीं विशिष्ट गुणांनींच मंडित दिसणार, तसेंच सृष्टि जी केवळ त्याचें शरीर होय, तिचा विचारसुद्धां ज्यानें त्यानें आपआपल्या विचारसरणीच्या किंवा मनःप्रवृत्तीच्याच अनुरोधानें केला पाहिजे.

भक्ताच्या मनाची प्रवृत्ति, प्राधान्येंकरून मनांतच असलेल्या तत्वांनीं बनलेली असते. त्यामुळें एखाद्याच्या मनांत ज्या तत्वाचें प्राधान्य असेल, तदनुसार एकच ईश्वर, पण त्यास कांहीं विशिष्ट गुणांनीं मंडित आहे, असें भासूं लागेल, व दुसऱ्या एखाद्यास तोच ईश्वर तिसऱ्याच कांहीं गुणांनीं युक्त असा दिसूं लागेल. त्याचप्रमाणें **एकच सृष्टि प्रत्येकास निरनिराळी भासत असते.** ज्याप्र-

माणें विशिष्टलक्षणविरहित व सर्व ब्रह्मास लागू होणारें चिन्ह, जें **ओम्**, त्यासंबंधीं पाहतां, विचार व तद्दर्शक शब्दचिन्ह, अभेदभावानें जुडलेलीं दृष्टीस पडतात, त्याप्रमाणेंच ह्या शब्दार्थाचें ऐक्य, ईश्वर आणि जगत् यांच्यासंबंधानेंही लागू करतां येईल. ह्मणजे प्रत्येक जगत्कल्पनेस व ईश्वरकल्पनेस निरनिराळे शब्द योजले पाहिजेत. पुर्वकालीन ऋषींनीं आपल्या अगाध अध्यात्मिक अनुभवानें हीं शब्दचिन्हें शोधून काढिलीं आहेत, व निरनिराळ्या जगत्कल्पना व ईश्वरकल्पना ह्यांचें रूप होतां होईतों स्पष्ट करून दाखविण्याची ह्या शब्दांचे ठायीं शक्ति आहे. **ओम् हें अखंड ब्रह्माचें दर्शक होय.** त्याचप्रमाणें वरील शब्द हे त्याच ब्रह्माचीं निरनिराळीं खंडरूपें करून, विशिष्टलक्षणयुक्त अशीं रूपें दर्शवितात. **हीं परिप्रकारचीं नामें ईश्वराराधनेस व सत्यज्ञानार्जनास साहाय्यकारी होत.**



# प्रकरण ८ वें.

## मूर्तिपूजन.



आतां विचार करण्यासारखे दुसरे मुद्दे ह्मटले ह्मणजे **प्रतीकांचा** किंवा ईश्वरी कल्पनेस आधारभूत अशा दुसऱ्या कोणत्याही वस्तूंची पूजा करणें, हे होत. तेव्हां **प्रतीकांच्या** साधनानें ईश्वरपूजा करणें ह्मणजे काय? तर '**अब्रह्मणिब्रह्मदृष्ट्यानुसंधानम्**' ह्मणजे ब्रह्म नव्हे अशा एकाद्या पदार्थाच्या ठायीं, '**हेंच ब्रह्म**' अशा दृष्टीनें मनाची योजना करणें' हा त्यांतील हेतु होय. **भगवान् रामानुज** ह्मणतात:—"मन हें ब्रह्म असें समजून त्याचें पूजन करावें, हें आंतील झालें; आणि आकाशही ब्रह्मच होय, पण ऐंद्रिय दृष्टीनें." **मन ही अंतःप्रतीका, व आकाश ही बाह्यप्रतीका होय.** तेव्हां ईश्वराऐवजीं ह्या दोहोंसही ईश्वर कल्पून, त्यांची पूजा आपणास केली पाहिजे. त्याचप्रमाणें—"सूर्य हाही ब्रह्मरूपच होय, असा आदेश आहे'........'त्याचप्रमाणें जो कोणी नाम हेंच ब्रह्म कल्पून, त्याची पूजा करितो'........इत्यादि इत्यादि वाक्यांवरून प्रतीकापूजनासंबंधानें शंका उद्भवते' असें **शंकराचार्य** ह्मणतात. **प्रतीका म्हणजे इच्छित पदार्थाकडे जाणें** आणि **प्रतीकापू-**

जन ह्मणजे तें अशा पदार्थाचें असावयाचें कीं, त्याच्या एका किंवा अनेक गुणांनीं ब्रह्माच्या विशिष्ट स्वरूपानुसार हुबेहुब प्रतीका करतां याव्या. परंतु हे पदार्थ प्रत्यक्ष ब्रह्म नव्हेत, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. **श्रुती**मध्यें जशा कांहीं **प्रतीका** सांगितल्या आहेत, त्याचप्रमाणें **पुराणां**त व तंत्रांतही सांगितल्या आहेत. अशा प्रकारच्या **प्रतीका**पूजनामध्यें **पितृपूजा** व **देवपूजा** ह्यांचा अंतर्भाव होतो.

परंतु **ईश्वराराधना करणें ह्यालाच मात्र भक्ति म्हणतां येईल. देव, पितृ,** किंवा अशा दुसऱ्या कोणत्याही तऱ्हेची पूजा ह्मणजे मुळींच भक्ति नव्हे! अशा प्रकारची विशिष्ट तऱ्हेच्या देवतांची, कांहींएक तऱ्हेनें पूजा करणें हें सर्व मंत्रतंत्रादि कर्मांत मोडतें, व अशा तऱ्हेचीं कर्में करणारांस स्वर्गसुखादिरूपी कांहीं विशिष्ट फल मात्र मिळतें; परंतु भक्ति किंवा मोक्ष, ह्यांचा लाभ मिळत नाहीं.

तथापि एक गोष्ट नीट ध्यानांत ठेवली पाहिजे, ती ही कीं, अत्युच तत्वज्ञानानें शोधून काढलेलें परब्रह्म तेंच **प्रतीका**पूजनांतील **प्रतीका** होय, आणि **प्रतीका** ह्मणजे पूजकाचा स्वतःचा आत्मा होय, अशी जी कित्येक पूजकांची केव्हां केव्हां भावना होते, ती चुकीची होय. कारण कोणतीही प्रतीका पूजकाच्या सत्य आत्मतत्वाची बरोबरी करूं शकणार नाहीं. परंतु जेथें **ब्रम्ह** हाच मुळीं भक्तीचा विषय असतो व **प्रतीका** ह्मणजे केवळ कल्पनेस आधारभूत असते, अर्थात् जेथें **प्रतीका**रूपी साधनानें **ब्रम्हा**चीच पूजा केली जाते ह्मणजे प्रतीकेबद्दल तिचें आदिकरण जें **ब्रम्ह** त्याचेंच

कल्पनेनें ग्रहण केलेलें असतें—तेथें अशा प्रकारची पूजा फार हितावह होते. इतकेंच नव्हे तर जेथपर्यंत पूजा करावयाला मनाची जी स्थिति असावी लागते, तिची पहिली पायरीही आपण ओलांडली नसते, तेथपर्यंत प्रतीकापूजन हें सर्व मनुष्यजातीस अवश्यक आहे. ह्मणूनच इतर देवतांची पूजाही तांत्रिक कर्मांत मोडत असते. शास्त्रदृष्टीनें पाहतां, आपणास त्या शास्त्रांचें किंवा विद्येचें फळ मिळतेंच. परंतु जेव्हां देवतांची 'ब्रह्म' या दृष्टीनें पूजा केली जाते, तेव्हां ईश्वरपूजेपासून जें फल मिळावयाचें, तेंच मिळतें. ह्यावरून श्रुतिस्मृतींमध्यें पुष्कळ वेळां एखादा ऋषि किंवा देव, अगर साधारण मनुष्यमात्र ह्यांची इतकी स्तुति केलेली आढळन येते कीं, त्या देवाचे व त्या ऋषीचे गुण बाजूस राहून, ब्रम्हाच्या निर्गुण कल्पनेचा त्यावर आरोप केला जाऊन, त्याची पूजा केलेली असते, म्हणून अद्वैतवादी विचारतो कीं, 'प्रत्येक पदार्थांतील नाम आणि रूप हीं दोन्ही काढून टाकल्यास बाकी ब्रह्मच राहत नाहीं काय?' व 'ईश्वर हा सर्वांचा अंतरात्मा नव्हे काय?' असें विशिष्टाद्वैती ह्मणतो. "फलम् आदित्याद्युपासनेषु ब्रह्मैव दास्यति सर्वाध्यक्षत्वात्:—" "आदित्य वगैरे देवतांच्या उपासनेचें फलसुद्धां ब्रह्म स्वतः होतें. कारण सर्व जगताचें नियामक तेंच आहे." तसेंच, शंकराचार्य आपल्या ब्रह्मसूत्रभाष्यांत ह्मणतातः—"ईदृशं चात्र ब्रह्मणः उपास्यत्वं यतः प्रतीकेषु तद्दृष्ट्याध्यारोपणं प्रतिमादिषु इव विष्ण्वादीनां"—

याप्रमाणें ह्या जगामध्यें ब्रह्म हें उपास्य विषय होऊन राहतें. कारण ब्रह्म अथवा तो **परमात्मा** ह्यांचा **प्रतीकांवर** आरोप केलेला असतो. **विष्णु** इत्यादि देवतांच्या मूर्तींची जशी पूजा करितां येते, तशीच ब्रह्माचीही पूजा करितां येते."

**प्रतीका**पूजेच्या मूळाशीं ज्या कल्पना असतात, त्याच **प्रतिमा**पूजेलाही लागू आहेत. ह्मणजे ती **प्रतिमा** जर एखाद्या साधूची किंवा लहानसहान विशिष्ट देवतेची असेल, तर त्या उपासनेस भक्ति असें ह्मणतां येणार नाहीं. व त्यापासून मोक्षप्राप्तिही तितक्यापुरतीच ! परंतु त्याच **प्रतिमे**वर जर परमेश्वरकल्पनेचा आरोप केला असेल, तर भक्ति व मुक्ति ह्या दोहोंचाही लाभ होईल. जगांतील मुख्य मुख्य धर्मांपैकीं, वेदांती, बौद्धधर्मी, व ख्रिश्चन धर्मीय शाखा (पंथ) हे प्रतिमांचा बराच उपयोग करितात. फक्त दोन पंथ ह्मणजे एक **प्रॉटेस्टंट** व दुसरा **महंमदी** धर्म, हे दोन्हीही **मूर्ति**पूजेचा अगदीं निषेध करितात. तथापि **मुसलमान**लोक आपल्या साधूंच्या व धर्मापायीं देहत्याग ज्यांनीं केला आहे अशा धर्मवीरांच्या कबरी बांधतात, त्या तरी त्यांच्या जवळ जवळ **प्रतिमा**च होत. आणि **प्रॉटेस्टंट** मताचें तर पाहावयासच नको. त्यांत धर्मास मजबुती आणणारी कोणतीही गोष्ट दिसली कीं, तीवर पाणी सोडावयाचें, असा त्यांचा शिरस्ता असल्यामुळें, तें **प्रॉटेस्टंट** मत वर्षानुवर्ष खऱ्या अध्यात्मिक ज्ञानास आंचवत चाललें आहे, आणि हल्लीं हल्लीं तर त्यांतील जरा पुढें गेलेले जे

लोक आहेत, त्यामध्यें व **ऑगस्ट कॉम्टे**,* या तत्त्ववेत्त्याचे अनुयायी, अथवा अज्ञातवादी—यांचा फक्त नीतिशास्त्रावरच भरंवसा आहे, ह्यांच्यामध्यें व त्यांच्यामध्यें आतां कांहीं भेदच उरला नाहीं. दुसरें असें. **महंमदी** व **प्रॉटेस्टंट**धर्मी यांस एकाच तऱ्हेची मूर्तिपूजा ठाऊक आहे, ती अशी कीं, **प्रतिमा** हाच ईश्वर अशी कल्पना करून प्रतिमापूजा करावयाची. परंतु **दृष्टिसौकर्य** ह्मणून पूजेचा प्रकार आहे, त्यांत परमेश्वराचें दर्शन घडण्यास मदत, किंवा साधन म्हणून **प्रतीका** किंवा **प्रतिमा** ह्यांची पूजा करण्यांत येते, हें कांहीं तद्धर्मीयांच्या ध्यानांत येत नाहीं. त्यांच्या दृष्टीनें जी **मूर्तिपूजा** मानली जाते, ती तांत्रिक कर्माप्रमाणें होय, याकरितां ती करणारांस भक्तीचा किंवा मुक्तीचा लाभ घडणार नाहीं. अशा तऱ्हेच्या **मूर्तिपूजेम**ध्यें ईश्वरावांचून इतर आत्म्यांसही प्रभुत्व दिलें जातें. ह्मणून **प्रतीका किंवा कबरी, देवळें, मंदिरें, मशिदी इत्यादि सर्व खरोखर मूर्तिपूजेचीं दर्शकें होत.** परंतु तेवढ्यावरून सरसकट मूर्तिपूजा दोषयुक्त किंवा घातक आहे, असें समजूं नये. ती एक प्रकारचें कर्म किंवा विधि होय, आणि उपासना करणारांस त्याचें फल मिळाल्यावांचून राहणार नाहीं.

---

* हा एक फ्रेंच अर्वाचीन तत्त्वज्ञानी होऊन गेला. हा पक्का अज्ञात—नास्तिक—वादी होता.

# प्रकरण ९ वें.

## इष्टदेवता अथवा ध्येय स्वरूप.



तां, इष्टनिष्ठा म्हणजे काय? ह्याचा विचार करूं. ज्यांना भक्त व्हावयाचें असेल, यांनीं हें एक ओळखून असावें कीं, निरनिराळीं मतें म्हणजे भिन्नभिन्न मार्ग होत. **भगवत्पदीं पोंचण्याचे हे निरनिराळे पंथ, अथवा वेगवेगळे धर्म हीं सर्व इतकीं या एकाच ईश्वराच्या वैभवाचीं व्यक्त स्वरूपें होत,** हेंही त्यानें समजून असावें. "हे ईश्वरा! सर्व जण तुला निरनिराळ्या नांवांनीं हांका मारितात, व निरनिराळ्या नांवांनीं तुझे ते विभाग करूं पाहतात, परंतु तुझी सर्वव्यापकता जेथें तेथें साक्ष देतेच. ह्यांपैकीं कोणत्याही रीतीनें तूं उपासकांस पावतोस, आणि जेथपर्यंत जीव तुझ्या 'भावाचा भुकेला' आहे, तेथपर्यंत काळाचीही कांहीं अट नाहीं, इतका तूं पावण्यास सुलभ आहेस. तुझ्यावर जर माझें प्रेम न बसेल, तर माझें दुर्दैवच समजलें पाहिजे!" इतकेंच नव्हे तर त्यानें, त्या निरनिराळ्या धर्मांची ज्या महात्म्यांनीं स्थापना केली, त्यांचा द्वेष करतां नये, हेंचसें काय, पण त्यानें अशी दुसऱ्या कोणीं केलेली टीकासुद्धां आपल्या कर्णीं न पडूं देण्याची खबरदारी ठे-

वावी. हृदयांत स्वमताचा खरोखर अभिमान; प्रेमरस तर ज्यांचा कांठोकांठ भरलेला; दुसऱ्या मतांविषयीं ज्यांची सहानुभूति; आणि अन्य मतांतील जें काय चांगलें असेल, तें अचानक हंसचंचुवत् उचलून घेण्याची ज्यांस पारख आहे, असे लोक फारच थोडे आढळतील. साधारणतः असा नियम आहे कीं, ज्यांची अन्य धर्माविषयीं सहानुभूति आहे, त्यांची स्वधर्मप्रीति बरीच उडून जाते, अशांच्या हातीं धर्म सांपडला म्हणजे त्याचा एखादा राज्यकारस्थानी क्लब ( Politico-social club ) होऊन बसावयाचा ! किंवा त्याचप्रमाणें एखादा समाजसुधारणेचा क्लब (समाज ) अवतीर्ण व्हावयाचा. दुसऱ्या पक्षीं कित्येक मंडळींचें आपल्या ध्येय वस्तू ( Ideal ) वर प्रशंसनीय प्रेम असतें; परंतु ती मंडळी जरा कोत्या मनाची व धर्मवेडी असते. जे कट्टे स्वमताभिमानी असतात, त्यांचा परधर्म द्वेषद्वाराच स्वधर्मश्रद्धा दृढ झालेली असते. खरोखर माझी हात जोडून परमेश्वरास प्रार्थना आहे कीं, ज्यांचें स्वधर्मप्रेम ह्या धर्मवेड्यांइतकें निस्सीम असूनही इतर सर्व धर्मांवरही स्वधर्माइतकीच ज्यांची समदृष्टि आहे, अशा महात्म्यांनीं हें जग भरून राहावें ! पण असे लोक फारच थोडे व क्वचित्च भेटतात. तथापि तेवढ्यावरून, हें सिद्ध आहे कीं, ज्यामध्यें प्रेमामृताचा प्रवाह तुडुंब भरून, अखंड विशालरूपानें वाहत आहे, अशा विशिष्ट कल्पना लोकांच्या मनांत ठसवून देतां येतील. तसें करण्याचा मार्ग एकच आहे. तो **इष्टनिष्ठा**–किंवा **इष्टदेवता** हा होय. अथवा अनेक **ध्येयस्वरूपां**पैकीं, आपणांस आव-

डेल, तें शोधून काढणें हा होय. **धर्मांतील कोणत्याही शाखा मानवांस निरनिराळीं ध्येय स्वरूपें दाखवीत असतात. परंतु हा सनातन वैदिक धर्म परमेश्वराच्या अगदीं निकट नेऊन पोंचविण्याचे हजारों मार्ग दाखवितो.** म्हणजे सर्व जगापुढें तो असंख्य **ध्येय स्वरूपें** ठेवितो, आणि ह्या **इष्टस्वरूपां**त त्या **सच्चिदानंदकंद परमात्म्याचें** एक एक–भिन्नभिन्न स्वरूप दाखविलेलें असतें. तसेंच, मोठ्या दयार्द्र दृष्टीनें भक्तिमार्गानें जाणाऱ्या स्त्रीपुरुषांस असंख्य राजरस्ते हा धर्म दाखवून देतो. ह्या मनुष्याच्या आयुष्क्रमणांत अनुभवरूप मोठमोठाले खडक आडवे येतात, ते सर्व खडक ईश्वरानें स्वतः मानवी अवतार घेऊन, किंवा त्याच्या विभूती निपजून, त्यांनीं पूर्वकालीं फोडफोडून, अनेक रस्ते खुले करून दिले आहेत, व सध्यांही तें काम चालू आहे. आपणाकडे जे जे कोणी येतील, त्यांस **वेदांत** हा आपले बाहू पसरून, जणों अगदीं आलिंगन देण्यास तयार असतो. आज हयात असलेल्यांसच केवळ नव्हे तर पुढें जे होतील, त्यांचासुद्धां आदर करावयास तो उत्सुक असतो. आणि ज्या सत्य व आनंद यांच्या सागरामध्यें एक वेळ बुचकळी मारल्यास, मनुष्य मायाजाळांतून मुक्त होतो, आणि पूर्ण स्वतंत्र होत्साता अक्षय्य सुखामध्यें लोळण घेतो, त्या सत्याच्या वसतिस्थानीं नेऊन सोडण्यास त्यानें कंबर कसलेली आहे.

मोक्षप्राप्तीचे जे भिन्नभिन्न मार्ग दर्शविलेले आहेत, त्यांचा तिटकारा करूं नये, किंवा ते झूट आहेत, असें म्हणूं नये, असें भक्तियोगांत निक्षून सांगितलें आहे. तथापि वाढीस येणाऱ्या रोपासभोंवतीं त्याचें मोठें झाड होऊं लागेपर्यंत कुंपण घातलेंच पाहिजे. कारण अध्यात्मिक प्रवृत्तीचें रोप आपल्या कोंवळेपणीं कल्पना व निरनिराळीं ध्येय स्वरूपें त्यांच्या फेरबदलानें लौकरच मरून जाण्याचा संभव असतो. कित्येक लोक धर्मस्वातंत्र्याच्या नांवाखालीं एकामागून एक ध्येय स्वरूपें बदलीत असतात, व हें सर्व नुसत्या पोकळ जिज्ञासेखातरच चाललेलें असतें. त्यांना नव्या गोष्टी ऐकण्याचा एक प्रकारचा हृद्रोगच लागलेला असतो, नव्हे, ते धर्मपिसेच झालेले असतात! त्यांस नव्या गोष्टी ऐकून, थोडीशी एक प्रकारची तार चढवून घेण्याची हौस असते. परंतु एकदां हें तारेचें सुख थोड्या वेळानें संपून गेलें कीं, त्यांस पुन्हां नव्या तारेची हांव सुटते. धर्म हा अशा लोकांस बुद्धिरूप प्याल्यानें झोंकण्याचें मद्य होय! यापलीकडे त्यांची धर्माविषयीं कांहीं कल्पना नसते. भगवान् रामकृष्ण ह्मणतातः—“कित्येक लोक मोत्यांच्या शिंपल्यासारखे असतात. स्वाती नक्षत्राच्या सुमारास पावसाचे कांहीं थेंब शिंपल्यांत धरण्याकरितां, शिंपल्यांतील किडा, समुद्राच्या तळचा आपला ठाव सोडून, पाण्याच्या सपाटीवर येतो, आणि शिंपला उघडा टाकून तरंगत राहतो. पावसाचा एखादा थेंब आंत पडतांच तो समुद्राच्या

तळीं बुडी मारितो आणि त्या थेंबाचें सुंदर मोतीं बनेतों-पर्यंत, तो तेथेंच राहतो." इष्टनिष्ठेच्या उत्पत्तीचें, ह्या लहानशा चुटक्यामध्यें रसभरीत व जोरदार भाषेनें प्रतिपादन केलें आहे. ही एकनिष्ठा किंवा एका इष्टदेवतेचीच भक्ति नवशिक्यांस भक्तीचा अभ्यास करितांना फार अवश्यक आहे. महाभक्त हनुमानाप्रमाणें त्यानें नेहमीं ह्मणत असावें कीं, "जरी श्रीचा व सीतेचा पति हे दोन्ही एकाच परमेश्वराचे अवतार आहेत, किंवा व्यक्त स्वरूपें आहेत, हें मला ठाऊक आहे, तरी माझें सर्वस्व कायतें तो एक कमलमुख रामच होय;" किंवा महाभगवद्भक्त तुळशीदास म्हणतो, त्याप्रमाणें त्यानें म्हणत असावें कीं:—"सर्वांपाशीं बसावें; सर्वांचीं नामें घ्यावीं; नेहमीं होकार देत असावें; व सर्वांतील माधुर्यझरी लुटीत असावें. पण आपलें आसन मात्र ढळूं देऊं नये." असें करितां करितां, भक्त जर मन:पूर्वक प्रेम ठेवील, तर ज्ञानसूर्याची उज्वल प्रभा फांकून, ह्या एवढ्याशा लहान बीजापासून, प्रचंड वृक्ष वाढीस लागेल, व वटवृक्षाप्रमाणें त्याच्या शाखा मुळें व पारंब्या सर्व बाजूंनीं पसरत जाऊन, तो सव धर्मक्षेत्रांसही आपल्याच पोटांत कवळून घेईल. खरा भक्त असेल तो ह्या मार्गानें चालल्यास, निरनिराळ्या नांवांनीं व स्वरूपांनीं, निरनिराळ्या ध्येयस्वरूपांच्या किंवा इष्टदेवतांच्या रूपानें, धर्माच्या ह्या भिन्नभिन्न शाखा, ज्या ईश्वराच्याठायीं आपली इष्टनिष्ठा आहे, त्याचीच पूजा करीत आहेत, असें त्यास प्रत्यक्ष दिसूं लागेल.

# प्रकरण १० वें.

## भक्तियोगाचीं साधनें व पद्धति.



भक्तियोगाचें साधन व तो सिद्धीस नेण्याची पद्धति ह्यासंबंधीं **भगवान् रामानुज** आपल्या **वेदांतसूत्रां**वरील टीकेमध्यें येणेंप्रमाणें लिहितातः—"ब्रह्माची प्राप्ति ही, विवेक, मनोविकारांचें दमन, अभ्यास, यज्ञकर्म, मनःशुद्धि, बल अत्यानंदाचा प्रतिकार इत्यादि साधनांनीं होते." **रामानुजाचार्यां**च्या मताप्रमाणें, शुद्ध आहार कोणता व अशुद्ध आहार कोणता हें किंवा अशाच तऱ्हेच्या इतर गोष्टींचा ज्यानें विचार करितां येतो, तो **विवेक** होय. त्यांचें ह्मणणें तीन प्रकारांनीं आहार अशुद्ध होतो. पहिला प्रकारः—अन्नाच्या अंगच्या गुणानें जसें; कांदा, लसूण इत्यादि. प्रकार २ राः—तें दुष्ट किंवा अनाचारी मनुष्यांच्या हातून आलें असल्यास. प्रकार ३ राः—बाहेरून त्याजवर घडणारा वाईट परिणाम जसें:—केंस किंवा किडा पडल्यानें होतें, इत्यादि. श्रुति ह्मणतेः—आहार जेव्हां शुद्ध असतो, तेव्हां आपल्या शरीरांतील सत्व शुद्ध राहतें, आणि तदनुषंगानें स्मरणशक्ति तीव्र होते." हें श्रुतिवाक्य **रामानुजाचार्यांनीं छांदोग्य उपनिषदांतून** घेतलें आहे. ही आहाराची निवडानिवड भक्तांस फार महत्वाची मान-

ली जाते. कित्येक शाखेंतील लोकांनीं त्यांत अतिरेक केला आहे. तरी आहारासंबंधीं प्रश्नामध्यें एक मोठी महत्वाची गोष्ट आढळून येते. सांख्यतत्वज्ञानाप्रमाणें, सत्व, रज, तम हे तीन गुण प्रकृतीचे एकसमयावच्छेदेंकरून, धर्म व द्रव्य होत. हे तीन्ही जेव्हां समतोल असतात, तेव्हां प्रकृति आपल्या मूळ स्थितींत असते, आणि त्यांच्या स्थितींत चलबिचल झाली कीं, त्यापासूनच जगाची उत्पत्ति होते. ह्यावरून अर्थातच हें कळून येईल कीं, प्रत्येक मनुष्याचा देह ह्या तीन तत्वांचाच बनलेला आहे. अध्यात्मिक ज्ञानांत गति होण्यास ह्यांतील 'सत्व' ह्मणून जें तत्व आहे, त्याचेंच मुख्यत्वें शरीरांत प्राधान्य व्हावें लागतें. अन्नाच्या द्वारें जीं कांहीं शरीरपोषक द्रव्यें आपणास मिळतात, त्यांत जो गुण किंवा जें तत्व प्रधान असेल तदनुसारच आपली मनःप्रवृत्ति बनते. आपण जें अन्न सेवन करितों, तें ह्याकरितांच फार काळजीपूर्वक सेवन केलें पाहिजे. तथापि कित्येक शिष्य ह्या नियमांचें उगीच फाजील स्तोम माजवितात, तो मात्र त्यांचाच वेडेपणा होय.! त्याचा दोष गुरूकडे मुळींच लावतां येणार नाहीं.

वर अन्नाचें जरी इतकें महत्व वर्णिलें आहे, तरी तें जरा गौणच होय. कारण वर दिलेल्या उपनिषदांतील वाक्याचा शंकराचार्यांनीं आपल्या भाष्यांत निराळाच अर्थ केला आहे—आहार याचा अर्थ नेहमीं अन्न असें समजतात. त्याच्या मतें:—" अंतर्भागीं (हृदयांत) ज्याचा ज्याचा आपण संग्रह करितों, तें तें आहार होय. आपण

आपल्या आत्म्याच्या उपभोगार्थ इंद्रियविषयक ज्ञानाचा संग्रह करितो, व तोच आहार होय. हें जें इंद्रियविषयक ज्ञान आपण अंतर्यामीं सांठवून ठेवितों, त्याची शुद्धी करणें याचेंच नांव आहारशुद्धि होय. आहारशुद्धि ह्या एवढ्या शब्दाचा अर्थ ऐंद्रिय ज्ञानाची प्राप्ति असा होतो; पण आसक्ति लोभ, व मोह ह्यांपासून तें ज्ञान अलिप्त ह्मणजे शुद्ध पाहिजे. ह्मणून अशा तऱ्हेच्या आहारानें ह्मणजे अशा प्रकारच्या ज्ञानशुद्धीच्या योगानें, अंतःकरण ज्या द्रव्यानें बनलेलें असतें, तें सत्व द्रव्य शुद्ध होऊन, त्यायोगें त्या **ईश्वराचें**, त्या **अनंताचें**, त्याच्या सत्यस्वरूपाचें अखंड चिंतन साहजिकच घडेल. आतां वर ज्या ह्या **उपनिषदां**तील वाक्यावरच्या दोन निरनिराळ्या टीका दिल्या आहेत, त्या दिसण्यांत जरी अगदीं एकमेकांविरुद्ध दिसत आहेत, तरी त्या दोहोंतही सत्य असून, नवशिक्यांना त्यांची माहिती असणें अवश्य आहे. आपल्या ह्या स्थूल मांसमय शरीरापेक्षां, सूक्ष्म शरीर जें आपलें मन त्याचा आहार ह्मणजे निरोध करणें, व सन्मार्गाकडे त्याची प्रवृत्ती करणें, हें अर्थातच अधिक महत्वाचें नव्हे काय? महत्वाचें, यांत शंकाच नाहीं. परंतु सूक्ष्म शरीराचा विरोध करतां येण्यास स्थूल शरीर हें प्रथम ताब्यांत आणणें अत्यवश्यक होय. म्हणून नवशिक्यानें तर परंपरागत गुरूंच्या मुखांतून चालत आलेले आहारासंबंधाचे हे नियम पाळण्याविषयीं विशेष लक्ष पुरविलें पाहिजे. परंतु त्या आहारासंबंधीं कित्येक शाखांचे भक्तलोक विलक्षण धर्मवेडेपणा दर्शवितात. त्याच्यायोगानें धर्म चुलीपाशीं जाऊन सुद्धां बोकळावयास लागतो. असल्या

धर्मवेडेपणानें **अध्यात्मिक** ज्ञानाचा सूर्यप्रकाश प्राप्त करून घेण्याचें नांवसुद्धां काढूं नये. आणि अशा तऱ्हेचें धर्मवेड म्हणजे एक प्रकारचा नास्तिकवादच होय. कारण धड ना ज्ञान; ना भक्ति; ना कर्म. कोणताच मार्ग ह्यानें साध्य होत नाहीं. हें एक प्रकारचें खूळच म्हटलें पाहिजे! हें वेड कित्येकांच्या मनांत खिळून राहतें, त्यांस **ब्रम्हलोका**ची प्राप्ति होण्याचें दुर्घटच! पण त्याऐवजीं वेड्याच्या इस्पितळाची प्राप्ति होणें जास्त संभवनीय असतें!! तर हें म्हणणें संयुक्तिक दिसतें कीं, **मनाची अत्युच ( सात्विक ) स्थिति, प्राप्त करून घेण्यास आहाराची निवडानिवड करणें, हें अत्यवश्यक आहे,** व तसें केल्याशिवाय ती स्थिति सहज साध्य होणें, दुष्कर होय.

आतां नवशिक्यांचें दुसरें कर्तव्य ह्मणजे **मनोविकारांचें नियमन करणें,** हें होय, **मन इंद्रियविषयांपासून परावृत्त करणें, इंद्रियांवर शह चालविणें, आणि मनास आपल्या इच्छेचें दास करून सोडणें, हा धर्मशिक्षणाचा पहिला धडा.** ह्यानंतर अभ्यासासंबंधीं दोन शब्द, मुमुक्षूनें आंग मोडून अभ्यास केल्याशिवाय व झटापटी खाल्ल्याशिवाय आत्म्याला जे कांहीं दैविक साक्षात्कार वगैरे अनुभव घडावयाचे असतात, ते कालत्रयींही घडणार नाहींत. **"मनानें सर्वदा ईश्वराचें ध्यान करीत असावें."** प्रथम प्रथम ईश्वराचें ध्यान करण्याकडे मनाची प्रवृत्ती वळविणें बरेंच कठिण पडेल. परंतु प्रयत्नच

करूं लागल्यास प्रत्येक नवनव्या प्रयत्नास आपलें मनः-प्रवृत्ती वळविण्याचें हें सामर्थ्य दुणावत जाईल. "**हे कुंति-पुत्रा! अभ्यासानें व संन्यासानें त्याची–मनाची–सिद्धि होते.**" असें **भगवद्गीतेंत श्रीकृष्णांनीं** सांगितलें आहे. तसेंच, यज्ञकर्म म्हणून जें वर सांगितलें, त्याचा अर्थ, नेहमींप्रमाणें पंचमहायज्ञ करावे, एवढाच समजावा.

**मानसिक व शारीरिक शुद्धि ह्या जणों काय भक्तिरूप इमारतीचा पाया किंवा तिची फरसबंदी होत.** आहारासंबंधीं विवेक व बाह्य शरीराची शुद्धि हीं दोन्ही सोपीं आहेत. परंतु **अंतःकरणाच्या शुद्धीशिवाय किंवा निर्मलतेशिवाय बाह्यशुद्धि कवडीच्या किंमतीची होय.** ह्या शुद्धी ज्यांच्यायोगानें प्राप्त होतात, त्या गुणांची नांववारी **रामानुजांनीं** दिली आहे, ती येणें-प्रमाणें:—१ सत्य किंवा प्रामाणिकपणा. २ आर्जव किंवा सरलता. ३ दया किंवा निरपेक्ष रीतीनें केलेला उपकार. अहिंसा अर्थात् कायावाचामनेंकरून दुसऱ्यास न दुखविणें. ५ अभिध्या किंवा निर्लोभता. तसेंच, ६ वायफळ विचार करणें व दुसऱ्यापासून आपणास झालेल्या पीडेचा विचार करीत बसणें, हींही वर्ज केलीं पाहिजेत. ह्या नांववारींत विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ह्मणजे **अहिंसा होय.** अहिंसा हा जो धर्म सांगितला आहे, तो सर्व प्राण्यांसंबंधीं होय. कित्येक असें समजतात कीं, मनुष्यमात्रास तेवढें दुखविलें नाहीं ह्मणजे झालें. बाकी खालच्या प्रतीच्या प्रा-

ण्यांस कशाही निर्दयतेनें वागविलें तरी हरकत नाहीं. कित्येक जण तर एकीकडे कुत्रीं व मांजरें पाळीत असतात; मुंग्यांस साखर चारीत असतात; आणि दुसरीकडे आपल्या मानवी बांधवांस कितीही भयंकर रीतीनें वागविण्यास आपण मुखत्यार आहों, असें ते समजत असतात. हा एक विलक्षण नियम आहे कीं, जगांत कोणतीही सुकल्पना, सद्धेतु असूं द्या, तिचा अतिरेक केला कीं, त्या सद्धेतूचा चिवडा झालाच—'अति तेथें माती' व्हावयाचीच.—एखादी चांगली चाल असली तर ह्या अतिरेकामुळें व शब्दशः अर्थासच धरून, तिच्या अर्थाचा अगदीं अनर्थ होऊन बसतो! कित्येक धर्मपंथांतील लोक अंगावरील किड्यांची हिंसा घडेल ह्या भयानें कधीं स्नानच करीत नाहींत. परंतु, त्यांच्या ह्या घाणेरडेपणामुळें, आपण आपल्या मानवी बांधवांस दुःख देण्यास व अनेक रोगांचें बीज पेरण्यास कसे कारणीभूत होतों, हें त्यांच्या स्वप्नींही येत नाहीं. त्यांतल्या त्यांत समाधान मानावयाचें एवढेंच कीं, ते वैदिक धर्माचे अनुयायी नव्हेत!

**द्वेषाचें समूळ उच्चाटन करणें, हेंच काय तें अहिंसेचें मुख्य लक्षण आहे.** अडल्या वेळीं मनुष्य एखादें सत्कृत्य करून जाईल, दानही देईल, अथवा उपाध्यायांच्या आग्रहास्तव किंवा भोळ्या समजुतींच्या आधारावरही मनुष्य तसें सत्कृत्य करील, ती गोष्ट निराळी! परंतु मनुष्यजातीचा खरा भक्त तोच कीं, ज्यास मत्सर शपथेसही शिवत नाहीं. आपण आज ज्यांना जगावरील थोर पुरुष म्हणतों, ते सर्व एखाद्या छोट्याशा पदवीकरितां, थोड्याशा

कीर्तिलोभास्तव अथवा इवल्याशा सुवर्णाच्या लालचीनें एकमेकांचा हेवादावा करण्यास प्रवृत्त होतात. जोंपर्यंत मत्सररूप पिशाचाची अंतःकरणांत बाधा आहे, तोंपर्यंत खऱ्या अहिंसेचें नांवही घेणें नलगे! गाय किंवा शेळी हीं जनावरें कमीं मांस खात नाहींत, पण तेवढ्यानेंच तीं मोठीं अहिंसक योगी बनतात, असें म्हणतां येईल काय? तसेंच एखाद्यानें अमक्याचें किंवा तमक्याचें सेवन केलें नाहीं, म्हणून वनस्पत्याहारी प्राण्यांहून त्याची योग्यता विशेष समजली जाणार आहे काय? मुळींच नाहीं. एखादा मनुष्य एकीकडे अगदीं गवत खाऊन राहतो, परंतु एकीकडे बापड्या निराधार बायांस व पोरक्या पोरांस फशीं पाडतो, किंवा पैशाकरितां अशींच दुष्ट कृत्यें करतो, तर तो साधु होईल काय? नाहीं. तर तो शुद्ध पशु, इतकेंच नव्हे तर महापशु होय!! **ज्याच्या अंतःकरणांत कोणत्याही प्राण्यास दुखविण्याचा विचारसुद्धां येत नाहीं, जो आपल्या कट्ट्या दुस्मानांचें वैभव पाहूनही मुदित होतो, तोच खरा योगी; व तोच सर्वांचा गुरु होय.** मग तो साऱ्या जन्मभर जरी डुकराचें मांस खात असला, तरी फिकीर नाहीं! म्हणून आपण नेहमीं हें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, बाह्यशुद्धि हीं केवळ अंतःशुद्धीला पोषक म्हणूनच केली पाहिजे, आणि एकापरी बाह्यशुद्धि जेथें कांहीं कारणांमुळें असाध्य असेल, तेथें अंतःशुद्धिच मुख्य मानली पाहिजे. परंतु जें राष्ट्र किंवा जी व्यक्ति, अंतःशुद्धि—कीं जी धर्माची केवळ प्राणभूत—

ती विसरेल, आणि ह्या बाह्य तंत्रांस किंवा आचार-विचारांसच मगरमिठी घालून बसेल, त्या राष्ट्राची किंवा व्यक्तींची कशी दशा होईल, हें सांगतां येत नाहीं. हे बाह्य आचारविचार, आंतील अध्यात्मिक जीवनाचीं द्योतकें होत, म्हणूनच त्यांना इतकें महत्व देतात. पण तीं जर आंतील जीवनास सुप्रकाशित करीत नाहींत, असें वाटेल, तर बेलाशक दयामाया झुगारून देऊन, त्यांस चुरडून टाका.

**भक्तियोग** सिद्धीस नेण्याचें आणखी एक साधन म्हणजे **अनवसाद** किंवा बल होय. श्रुति म्हणतेः—ह्या आत्म्याची प्राप्ति दुर्बल मनाच्या पुरुषांस होणार नाहीं.' ह्यांत शारीरिक व मानसिक दौर्बल्य ह्या दोहोंचाही अंतर्भाव होतो. 'मनानेंही घट्ट आणि शरीरानेंही घट्ट' असे जे असतील, तेच शिष्य होण्यास अधिकारी होतील, नाहीं तर खुजे व खुरटे अशा लोकांच्या हातून काय व्हावयाचें आहे? योगाच्या अभ्यासानें शरीरांतील अदृश्य शक्तींपैकीं, एखादी जर अगदीं थोड्याशा अंशानें जागृत झाली, तर त्यांचा चुराडा होऊन जावयाचा! होतकरू किंवा जवान, सदृढ किंवा निकोप, आणि शरीरानें खबरदार, अशांच्याच हातानें योगाची तड लागणार! म्हणून शारीरबल हें अत्यंत अवश्यक आहे. कारण इंद्रियनिरोध करतांनां प्रतिक्रिया होऊन जो कांहींएक धक्का बसतो, तो सोसण्यास शरीरबल अवश्य असावें लागतें. ज्याला म्हणून भक्त व्हावयाचें असेल, त्याचें

शरीर निरोगी व खबरदार असलें पाहिजे. ह्या योगांपैकीं एखादा योग जेव्हां एखादा अशक्त मनुष्य साध्य करूं पाहतो, तेव्हां त्यास कांहीं तरी दुःसाध्य रोग जडतो, किंवा त्याच्या मनाला क्षीणता तरी येते. अर्थातच जाणूनबुजून शारीरबलाची हानि करणें, हें अध्यात्मज्ञानाचें अनुपान होत नाहीं. तसेंच मनानें जे क्षीण असतात, त्यांनाही आत्मप्राप्ति होणार नाहीं. ज्यास भक्त व्हावयाचें असेल, त्यानें नेहमीं आनंदी असावें. पाश्चात्य देशांत ज्यास कधींही हंसें येत नाहीं, तो मोठा धार्मिक समजला जातो. वर्षाकाळांतील घनतिमिरश्रीप्रमाणें त्याची चर्या असावी; त्याचा चेहरा लांबट असावा; व नेहमीं ओंठासओंठ लागलेला असावा. अशीं धार्मिक मनुष्याची कल्पना असते. परंतु अस्थिपंजरवत् देह धारण करणारे, ज्यांची मुद्रा तिरसट, चेहरा लांबट, असे पुरुष वैद्यांचीं कुळें मात्र मोठीं छान शोभतील !! बाकी त्यांस योग्याचें पद मिळण्याचें नांवच नको. ज्याचें मन प्रसन्न असेल, तोच कोणतेंही काम तडीस लावील. अशा मनःस्थैर्यानेंच असंख्य संकटांतून आपली वाट फोडून काढतां येते. ह्या मायाजालांतून आपला मार्ग शोधून काढणें, हेंच काय तें अतिशय कठिण काम आहे, व तें अलोट इच्छासामर्थ्याशिवाय व्हावयाचें नाहीं.

तथापि अनुद्धर्ष किंवा अति हर्षही टाकला पाहिजे. या अति हर्षानें खरा विचार करण्यास आपण अयोग्य ठरतों. तसेंच, त्यायोगानें आपल्या मनःशक्तीचाही पुष्क-

ळदां व्यर्थ व्यय होतो. जसजशी इच्छा बळकट होत जाईल, तसतसे आपण मनोविकारांस हार जाणार नाहीं. अत्यानंदाप्रमाणें अति गांभीर्यही उपयोगाचें नाहीं. ज्यावेळीं मन स्थिर, शांत व समतोल असतें, त्या वेळींच **अध्यात्मिक** अनुभव घडण्याचा संभव असतो.

झालें, ह्याप्रमाणें भक्तानें ईश्वरावर प्रेम करूं लागण्यास शिकावें.

**भक्तियोग पूर्वार्ध ( गौणीभक्ति ), समाप्त.**

# भक्तियोग.

## उत्तरार्ध.

## प्रकरण १ लें.

## पराभक्ति.

## सर्वसंगपरित्याग.



येथर्पयत खालच्या प्रतीची जी **गौणी** भक्ति, तिचा विचार झाला. आतां **पराभक्ति** (म्हणजे उच्च स्वरूपी भक्ती) कडे मोर्चा फिरवूं. ह्या **पराभक्ती**च्या अभ्यासालाही थोडीशी तयारी लागते. तिच्यासंबंधानेंही दोन शब्द येथें बोलूं. ही तयारी करावी लागते ती फक्त **आत्म्या**च्या शुद्धीकरितां नामोच्चार करणें, मंत्रतंत्रें, नानाविध विधी, इत्यादि गोष्टी **आत्म्या**च्या शुद्धयर्थेच होत. परंतु सर्वांत मोठें शुद्धीचें साधन, कीं ज्याविना भक्तीचें वर जें उच्च स्वरूप सांगितलें, तेथें आपण पोंचणार नाहीं, असें एकच आहे. तें म्हणजे **सर्वसंगपरित्याग** होय. ह्या **परित्यागा**चें नांव ऐकतांच, पुष्कळांच्या अंगावर शहारा येतो. तरी ह्या साधनाशिवाय **आत्म्या**ची प्रगति व्हावयाची नाहीं. सर्व योगांमध्यें **सर्वसंगपरित्याग** हें मुख्य साधन

धरलेलें आहे. हा **परित्याग** म्हणजे धर्मरूपी इमारतींत प्रवेश करावयाची पहिली पायरी; किंवा धर्मरूपचक्राचा मध्यबिंदु; अथवा धर्माचा प्राण. फार काय सांगावें? **परित्याग हीं धर्माची केवळ दुसरी मूर्ति होय.** आपला **आत्मा** जेव्हां ऐहिक गोष्टींपासून परावृत्त होऊन, मनःसागराच्या खबदडींतील खोल खोल वस्तूंचा तपास लावण्यास उद्युक्त होतो; जेव्हां जड व स्थूल वस्तूंचा विचार करतां करतां व त्याशीं खेळतां खेळतां, आपण जडमय होऊन नाश पावूं लागतो, असें त्यास कळून चुकतें; आणि म्हणूनच तो जेव्हां या जड सृष्टीपासून पराङ्मुख होतो; तेव्हांच **परित्याग** म्हणजे काय आहे तो आपणास कळून येतो, व तेव्हांच खऱ्या धर्माची जागृति होते. **कर्मयोगी** हा आपल्या फळाची आशा सोडून, संन्यास साध्य करतो. तो आपल्या श्रमांच्या फळाशीं मुळींच आसक्त नसतो. तो इहपरलोकीं कोणत्याही फळाची इच्छा करीत नाहीं. सर्व सृष्टी हि **आत्म्याच्या** अनुभवाकरितां केलेली आहे; व **आत्म्याच्या** सर्व अनुभवांचें फल म्हणजे, तो अनादिकालापासून, ह्या सृष्टीपासून अगदीं अलिप्त आहे, ह्या तत्वाची ओळख होणें, हें होय, हे **राजयोगी** पक्के जाणून असतो. मानवी **आत्म्यास** आपण **आत्म**तत्वच आहों, हें समजलें पाहिजे, व त्याचें प्रत्यक्ष ज्ञानही झालें पाहिजे. तसेंच, जड तत्वांशीं आपला संबंध फार थोडक्या कालापर्यंतच आहे, व तो असणारही तितकाच, हेंही त्यास कळून आलें पाहिजे. तेव्हां **राजयोग्याला** सृष्टीच्या अनुभवावरून संन्यास घडतो. **ज्ञानयोग्याचा** संन्यास

अनुभवण्यास सर्वांस जड जातो, व तो अतिशय कठिणही आहे. कारण, त्याला प्रथमपासूनच सृष्टि हा केवळ भ्रम आहे, असें धरून चालावें लागतें. त्याची अशी भावना असते कीं, सृष्टींत ज्या ज्या कांहीं शक्तींचे परिणाम घडून येतात, ते ते सर्व एका **आत्म्याचे**च होत, आणि सृष्टीच्या अंगचें असें कांहींच नाहीं. अगदीं आरंभापासूनच **आत्मा** हाच सर्व ज्ञानाचा व अनुभवाचा ठेवा आहे. सृष्टि नव्हे, हें तो जाणत असतो. म्हणूनच तो सृष्टिजन्य सर्व बंधनापासून मुक्त होण्यास, एकदम झटूं लागतो. ही मृगजलवत् सृष्टि व तसेच इतर सृष्ट पदार्थ, ह्यांचें आसन तो मनोगृहांतून पार दूर झुगारून देतो, आणि अशा तऱ्हेनें त्या सर्वांचा ठावठिकाणच अगदीं नाहींसा झाल्यावर आपणासच आपले ठिकाणीं अनुभवण्याचा प्रयत्न करूं लागतो.

सर्व **परित्यागांत भक्तियोगाचा परित्याग** मात्र अति सोपा व सुलभ आहे. येथें जोरजुलमाचें कांहीं काम नाहीं. कोणत्याही गोष्टीचा त्याग करावयाचा नसतो; किंवा आपणापासून कांहीं तोडून टाकावयाचें नसतें. कीं जुलूमजबरीनें आपणास कोणत्याही गोष्टीपासून अलग राहावयाचें नसतें. भक्ताचा परित्याग सुलभ, सोपा व निसर्गाप्रमाणेंच स्वाभाविक आहे. ह्या भक्ताच्या परित्यागाचें उदाहरण, थोड्या बहुत अंशानें, ठोकळ मानानें कां होईना, पण आपल्या नेहमींच्या व्यवहारांत दृष्टीस पडतें खरें. एखाद्या मनुष्याचें प्रथमतः एखाद्या स्त्रीवर प्रेम बसतें. कांहीं दिवसांनीं तेंच प्रेम दुसऱ्या एखाद्या स्त्रीवर जडतें, व मग तो पहिलीस टाकून देतो. पहिलीवरील त्याचें प्रेम

हळूं हळू, आपोआपच वितळून जातें, तें इतकें कीं, त्यास पुन्हां तिचें स्मरणसुद्धां होत नाहीं. त्याचप्रमाणें एखाद्या स्त्रीचें एखाद्या पुरुषावर प्रेम बसतें. तेंच कालांतरानें दुसऱ्या एखाद्यावर जडतें, आणि अनायासेंच पहिल्या मनुष्याची तिला आठवण राहत नाहींशी होते. आपण ज्या शहरांत राहतों, तें शहर एखाद्याला आवडत असतें. मग तो स्वदेशाचा अभिमानी बनतो. आणि अर्थातच पुढें आपल्या शहराबद्दल जी त्याची भक्ति असते, ती आपोआप लुप्त होते. तसेंच, कित्येक महात्मे जगतावर प्रेम ठेवतात, व त्यांना कोणत्याही रीतीनें दुःख न होतां, व विशेष प्रकारची खटपट न पडतां, त्यांची स्वदेशभक्ति व त्यांस जो काय पराकाष्ठेचा स्वदेशाभिमान वाटत असतो, तो तेव्हांच नाहींसा होतो. अशिक्षित मनुष्याची विषयसुखावर अतोनात आसक्ति असते. त्याला जसजसें शिक्षण मिळूं लागतें, तसतशी बुद्धिविषयक सुखाची त्यास गोडी लागत जाते, व विषयसुखेच्छा हळूहळू मंदावते. एखादा लांडगा किंवा कुत्रा आपलें भक्ष्य जें काय अधाशीपणानें खात असतो, व त्यापासून जें काय त्यास अनुपम सुख होत असतें, तें व तसें सुख मनुष्यास षड्रसान्नभोजनानेंदेखील होणार नाहीं. परंतु मनुष्यास बुद्धिविषयक अनुभव व मर्दुमकी ह्यांचा जो कांहीं आनंद लाभतो, त्याची कल्पना त्या जीवांच्या स्वप्नींही येत नाहीं. प्रथमतः हें कमी प्रतीच्या ऐंद्रिय सुखापासून प्राप्त होतें. तथापि जसजशी प्राणिमात्रास उच्च स्थिति (मानसिक उन्नति) प्राप्त होते, तसतशी खालच्या प्रतीच्या सुखावरची त्याची आसक्ति कमी होत जाते. मानव-

जातींत मनुष्य जितका जितका पशुकोटीच्या जवळजवळ जाईल, तितकी तितकी त्याच्या मनांत विषयसुखेच्छा प्रबळ होत जाते. पण तोच मनुष्य जितका जितका सुशिक्षित व उच्च प्रतीचा असेल, तितका तितका त्याचा मानसिक उपभोगांकडे जास्त जास्त ओढा लागत जातो. म्हणून जेव्हां एकादा मनुष्य बुद्धि व विचार ह्यांच्या कक्षेच्याही वरील स्थितीस जाऊन पोंचतो, तेव्हां खरें **अध्यात्मिक** ज्ञान व **ईश्वरसाक्षात्कार** म्हणून जें काय आहे, त्याचा त्यास अनुभव घडतो. तेथें त्याची अशी कांहीं आनंदमय स्थिति असते, कीं तीपुढें विषयसुखें व बुद्धिविषयक सुखेंसुद्धां फिकीं पडतात. ठीकच आहे. चंद्र जेव्हां पूर्ण प्रकाशित असतो, तेव्हां अर्थातच तारका फिक्या पडतात. पण तोच सूर्य उगवूं द्या, कीं चंद्रही लोपूं लागतो. **भक्तियोग** साधण्याकरितां, जो **परित्याग** मदतीस घ्यावा लागतो, तो दुसऱ्या कोणत्याही गोष्टीचा बिघाड करून होत नाहीं. तर तो स्वाभाविक रीतीनेंच अंगांत बाणला पाहिजे. जसें, चांगल्या झगझगीत तेजापुढें, त्यापेक्षां कमी प्रतीचें अर्थात् लिकलिकणारें तेज अंधक अंधक होतां होतां, शेवटीं अगदीं लोपून जातें, तद्वतच आपलें सर्व प्रेमभांडार ईश्वरासच वाहिल्यानें, ऐंद्रियसुखें, व बुद्धिविषयक सुखें कोठल्या खबदडींत दडी मारून, पुसट पुसट होतां होतां, पार गडप होऊन जातात. हें ईश्वरप्रेम वाढतां वाढतां, **पराभक्ती**च्या उच्च स्वरूपास **भक्त** पोंचतो. **पराभक्ति म्हणजे उत्तम भक्ति होय.** ही सुरू झाली म्हणजे कनिष्ठ प्रतीचे पूजन-

प्रकार चट सारे नाहींसे होतात. अशा प्रकारची ईश्वरभक्ति ज्याच्या अंगीं बाणली, त्याजपासून, पूजा अर्चा आपआपला गाशा गुंडाळून चालत्या होतात; पुस्तकांवर दडपण पडतें; आणि प्रतीका, देवळें, प्रार्थनामंदिरें, धर्म व त्यांच्या शाखा, देशाभिमान, व राष्ट्राभिमान इत्यादि सर्व, भक्तीच्या पहिल्या पायरींत आढळणारी लहानसहान बंधनें व लाडकाळ्या देशोधडीस लागतात. त्याच्या स्वतंत्रतेस (प्रेमास) आड येणारें असें कांहींच उरत नाहीं. एकाएकीं एखादें जहाज लोहचुंबकाच्या पर्वताजवळ जावें. व मग त्याचे लोखंडी खिळे, व कांबी लोहचुंबकाच्या आकर्षणानें उचटून जाऊन, फळ्या सुटून जशा स्वच्छंदपणें पाण्यावर तरंगत राहाव्या त्याचप्रमाणें त्या दयाघनाच्या कृपाप्रसादानें आत्म्याचे सर्व खिळे व कोयंडे (बंधनें) सुटे होऊन, तो पूर्ण स्वच्छंदानें प्रेमसागरांत डुबूं लागतो. भक्तीच्या सिध्यर्थ जो परित्याग अंगीं बाणावा लागतो, त्याचेंही असेंच आहे. म्हणजे त्यांत कठोरपणा व कोरडेपणा हीं मुळींच नाहींत. तो घडवून आणतांनां कांहीं झटापट किंवा दाबादाबी असें कांहीं करण्याची जरूर नाहीं. भक्ताला आपल्या अंतःकरणांतील एकाही भावनेचा निरोध करावा लागत नाहीं. तो जें काय करितो, तें एवढेंच कीं, त्या भावनांचा वेग अतिशय करून, त्यांची धांव तो परमेश्वराकडे वळवितो.

# प्रकरण २ रें.

## भक्तीनेंच औदासीन्य उद्भवतें.



ह्या जगांत आपणास प्रेमाचा प्रभाव पदोपदीं दिसून येतो. समाजामध्यें जें कांहीं चांगलें, थोर, आणि उदात्त विचाराचें कृत्य दिसून येतें, तें तें सर्व प्रेमाच्या प्रभावाचें फल आहे. इतकेंच नव्हे, तर जें जें कांहीं वाईट—नव्हे, शुद्ध रानटी—दिसून येतें, तें तें सुद्धां सर्व यः प्रेमाचेंच फल होय. फरक एवढाच कीं, ह्या दुसऱ्या ठिकाणीं प्रेमाची दिशा बरोबर नसते. नवराबायकोंमध्यें जें शुद्ध व पवित्र प्रेम दिसून येतें, तेंही हेंच. तसेंच कनिष्ठ प्रतीच्या इंद्रियसुखांत दृग्गोचर होणारा प्रभावही ह्याचाच. भावना मूळची आहे एकच, परंतु निरनिराळ्या उपाधींनीं, तिचीं निरनिराळीं रूपें झालेलीं असतात. एखाद्यास दुसऱ्याचें बरें करावेसें वाटतें; आपणाजवळ जें काय असेल तें गरीबगुरीब—तडीतापडी—अशांस द्यावेसें वाटत असतें. तों दुसरीकडे दुसऱ्या एखाद्यास, लोकांचे गळे कापावे, त्यांजवळ जें कांहीं डबोलें असेल, तें बुचाडून घ्यावें, असें वाटत असतें. पण हीं दोन्ही तऱ्हेचीं कृत्यें—बरीं वाईट—करण्यास त्यांस तें प्रेमच प्रेरणा करितें. अंतर एवढेंच कीं, पहिल्या मनुष्याचें दुसऱ्यांवर जितकें प्रेम आहे, तितकेंच त्या दुसऱ्याचें स्वतःवर असतें. दुसऱ्याची

दिशा मात्र चुकलेली आहे, व पहिल्याची बरोबर आहे. अग्नीच्या साहाय्यानें आपणांस स्वयंपाक करितां येतो, पण त्याच अग्नीनें मुलांचा हात भाजतो. तथापि हा अग्नीचा दोष नव्हे, तर त्याचा बरावाईट उपयोग करणाराचाच. म्हणून प्रेम अथवा एकमेकांत मिळून मिसळून वागण्याची उत्कट इच्छा—दुजाभाव टाकून, दोन अंतःकरणांची एक होण्याची इच्छा—व सरते शेवटीं सर्वांचीच एक होण्याची इच्छा—हीच नीच किंवा श्रेष्ठ स्वरूपानें (प्रेमाच्या रूपानें) जिकडे तिकडे व्यक्त होत आहे. **भक्तियोग हें उच्च प्रतीच्या प्रेमाचें शास्त्र आहे.** म्हणजे प्रेमभावनेला कोणतें वळण द्यावें; तिला आपल्या ताब्यांत कसें ठेवावें; तिला कसें चालवावें; तिचा कसा उपयोग करावा; तिला उच्च विषयाकडे कसें फिरवावें, त्यापासून उत्तम व दिव्य फळें कशीं प्राप्त करून घ्यावीं, आणि अखेरीस परमानंदास कशी गांठ घालावी, हें सर्व हा योग दाखवून देतो, 'हें सोडून द्या,' किंवा 'तें सोडून द्या,' असें तो सांगत बसत नाहीं. 'अहो! प्रेम—प्रेम—ईश्वरविषयक प्रेम बाळगा, असेंच तो सांगत असतो; आणि जो त्या परात्पर गुरूच्या प्रेमरसांत एकदां डुबूं लागला, त्याच्या मनास इतर नश्वर पदार्थांची कल्पनासुद्धां शिवत नाहीं.

**हे प्रेमस्वरूपा! तूं केवळ प्रेमाचा पुतळा आहेस. ह्या पलीकडे तुझी स्तुति करण्यास आमची मति कुंठीत होते. तूं सौंदर्याचा ठेवा आहेस. हे विभो! लावण्याचें भांडार जें आपण तें मूर्तिमंत सौंदर्यच**

आहां. दुसरें काय?" खरोखर! आपण या जगांत येऊन जें काय करावयाचें तें एवढेंच कीं, आम्ही ज्या सौंदर्याच्या लालसेनें ह्या जगांत एवढा उपद्व्याप करीत असतों, तीच सौंदर्यलालसा, ईश्वर हीच सौंदर्याची अंतिम मूर्ति आहे, असें कल्पून, त्याजकडे वळवावी. सुंदर स्त्रीच्या मुखांत किंवा गगनाच्या चांदण्यांत, किंवा ज्यांच्या योगानें आकाश रत्नखचित दिसूं लागतें, त्या तारकांत, अथवा आकाशांत पदकाप्रमाणें शोभायमान जो चंद्र, त्यांत तरी सौंदर्य आलें कोठून? खरोखरच यच्चयावत् पदार्थांत चमकणाऱ्या ईश्वरी सौंदर्याच्या चिमुकल्या हिरकणीचेंच हें केवळ दिग्दर्शन होय. "तो स्वयंतेजानें झळकत असतो. म्हणूनच दरोबस्त वस्तू प्रकाशमय दिसतात. त्याच्याच तेजानें सर्व वस्तू प्रकाशित होतात.' ही जी भक्तीची अत्युच्च स्थिति, ती प्राप्त झाल्यावर, निमिषार्धांत आपलें औट घटकांचें व्यक्तिसाम्राज्य विस्मृतिसागरांत गडप होऊन जातें. ह्या विषयसृष्टींतील आपस्वार्थीपणाची आसक्ति टाकून द्या; मनुष्य जातीचें कल्याण व्हावयास मनुष्य हाच काय तो मध्यबिंदु असें कल्पूं नका; **आपण प्रेक्षकाप्रमाणें किंवा विद्यार्थ्याप्रमाणें जगापासून अलिप्त राहून, सृष्टिचमत्कारांचें अवलोकन करा; व्यक्तिविषयक, कोणत्याही मनुष्यावर तुमची आसक्ति असेल, तर काढून टाका व सर्वांवर समदृष्टि ठेवा;** आणि मग ह्या जबरदस्त प्रेमाच्या प्रभावाचा जगावर कसा ठसा उमटतो, हें क्षणभर पाहत रहा. कधीं कधीं

असें करितांनां थोडीशी घस सोसावी लागते. परंतु ती कशाकरतां? तर फक्त तो अत्युच्च प्रेमाचा दुर्ग सर करतांनां, जी झटापट करावी लागते, तिच्याकरितांच! केव्हां केव्हां छोटीशी टक्करच खेळावी लागते; किंवा एखादे वेळेस ठोकरही लागल्यासारखी वाटते. पण हीं सर्व भक्तीच्या मार्गांत लागावयाचींच. आपण त्यांपासून जणों काय, अलिप्त राहून, ह्या संकटांस बेतानें वाट द्यावी. ह्या जगत्क्रमणाच्या चक्रांत जेथपर्यंत आपण सांपडलों आहों, तेथपर्यंत ही सर्व धडपड अशीच चालावयाची. परंतु जेव्हां आपण नुसते प्रेक्षक किंवा विद्यार्थी या दृष्टीनें जगापासून दूर राहूनच हें विश्व पाहूं लागतों, तेव्हां तो ईश्वर प्रेमरूपानें निरनिराळ्या असंख्य वाटांनीं व्यक्त होऊन आपल्यासमोर उभा राहतो.

"जेथें जेथें यत्किंचित् तरी सुखाचा लेश सांपडतो—मग तो ऐंद्रिय सुखाचा कां होईना—तेथें तेथें त्या अनादि आनंदस्वरूपाची नुसती चमक असतेच असते." अगदीं कनिष्ठ प्रतीच्या सुखानें जरी म्हटलें तरी, ज्यानें म्हणून अंतःकरण आकर्षित होतें, ती सर्व त्या ईश्वरी आनंदाची एक लहानशी चमक असते. संस्कृतांत ईश्वरास जीं अनेक नांवें आहेत, त्यांतच **हरि** हें एक नांव आहे. त्याचा अर्थ चित्त हरण करणारा असा होतो. आणखी मनुष्यांचें अंतःकरण वेधून टाकण्याची शक्ति एक त्या **परमात्म्यासच** आहे. खरोखर **आत्मतत्वास** मोहून टाकण्याची जर कोणाची मगदूर आहे तर एक त्या **प्रभूचीच**. ह्या जड नाशिवंत पदार्थांनीं त्याचें आकर्षण होईल काय? छेः! छेः! अशी गोष्ट

आजपर्यंत घडली नाहीं, व पुढें घडणारही नाहीं. एखाद्या इंदुवदनेच्या सौंदर्यास भुलून जाऊन, मनुष्य जो तिच्या पाठीमागें लागून लाळ घोटीत बसतो, त्याचें कारण ह्या नाशिवंत जड द्रव्याचे मूठभर कण हेंच काय? छेः! छेः! मुळींच नव्हे. ह्या जड द्रव्याच्या पलीकडे ईश्वरी प्रेम व त्याची आकर्षक शक्ति हीं असतात, व त्यांचाच हा खेळ होय. अज्ञानी मनुष्यास हें कळत नाहीं. तरी जाणूनबुजून असो कीं अजाणतेपणानें असो, त्याचें चित्त जें वेधलें जातें, तें त्या **प्रभूच्याच** शक्तीनें होय. तेव्हां सर्वांत नीच प्रतीच्या चित्तवेधकतेंतही त्या **ईश्वराचाच** अंश असतो. 'माझ्या लाडक्या! पतिव्रता आपल्या पतीवर जें कांहीं निस्सीम प्रेम ठेवते, तें केवळ नवऱ्याकरितांच नव्हे. तर तें सर्व प्रेम, जो **प्रभू** त्याच्या अंतर्यामीं वास करतो, त्याच्याकरितांच होय.' पतिव्रता स्त्रिया हें जाणून असोत वा नसोत; कसेंही झालें तरी जी गोष्ट खरी ती खरीच. 'हे माझ्या लाडक्या! स्त्रीकरितांच कोणी आपल्या स्त्रीवर प्रेम करीत नसतो, तर तिच्या अंतरीं जो **आत्मा** वास करीत असतो, त्याजकरितांच त्याचें तिजवर प्रेम बसतें.' त्याचप्रमाणें मुलें किंवा ह्या जगांतील इतर कोणीतीही वस्तु आपणास जी फार प्रिय असते, ती तीमध्यें वास्तव्य करणाऱ्या **आत्म्या**शिवाय दुसऱ्या कोणत्याही कारणानें प्रिय अशी वाटणार नाहीं. **ईश्वर म्हणजे एक मोठा लोहचुंबकच होय,** आणि **आम्ही लोहकणाप्रमाणें आहों.** तो आपणां सर्वांस एकसारखा आकर्षीत असतो, आमचा ह्या जगांत जो एवढा खटाटोप

चालला आहे, तो सर्व ह्या लोहचुंबकासच जाऊन भिड-ण्याकरितां होय. खरोखर ह्या जगामध्यें आपण जी एवढी खटपट करीत असतों, ती नुसती आपल्याच हिताकरितां थोडीच असते ! मूर्ख लोकांस आपण खरोखरी काय करीत आहों, हें मुळींच कळत नाहीं. परंतु ह्या वर लिहिलेल्या सर्व—व्यापी लोहचुंबकास जाऊन भेटण्यासाठींच त्याच्या सर्व आयुष्याचा व्यय होतो. **आमच्या ह्या टीचभर आयु-ष्यांत ज्या सर्व झटापटी व हा अवाढव्य खटा-टोप चाललेला असतो, त्या सर्वांचा रोख त्या परमा-त्म्यास सरते शेवटीं जाऊन भेटणें व शेवटीं तद्रूप होणें, हाच होय.**

तथापि **भक्तियोग्याला** ह्याचें इंगित माहीत असतें, आणि तें त्यालाच कळून येतें. त्यानें असल्या शेंकडों झटापटी खाल्लेल्या असतात, आणि त्यांचें इंगित काय आहे, हेंही तो पाहून ठेवीत असतो. पुन्हां त्यांची कट-कट होऊं नये, म्हणून तो मनापासून झटत असतो. त्याला सर्वत्रांस टाळून, एकदम आपल्या त्या **हरीशीं** गांठ घाला-वयाची असते. **भक्ताचा** परित्याग तो हाच. ह्या विराट्-स्वरूप जगदाकर्षक **प्रभूच्या** आकर्षणशक्तीनें भक्त इतका कांहीं कापला जातो, कीं दुसऱ्या कोणत्याही वस्तूनें त्याजवर इतकी आकर्षणक्रिया घडावयाचीच नाहीं. हा जो अनंत प्रेमसागर त्याच्या अंतःकरणांत लोटतो, त्याच्या पुरामध्यें इतर बारीकसारीक ऐहिक सुखांस जागाच नसते. खरेंच; ती मिळणार तरी कशी? म्हणजे, **भक्ताचा परि-**

त्याग हें एक तऱ्हेचें **वैराग्यच आहे**. त्याच्या ईश्वरविषयक निस्सीम प्रेमानें ईश्वरेतर पदार्थांवर त्याची मुळींच आसक्ति राहत नाहीं.

भक्ती साध्य करावयाची शेवटली पायरी ती ही झाली. हें वैराग्य एकदां अंगीं बाणलें, म्हणजे **पराभक्ति** म्हणून जी अत्युच्च पायरी आहे, तिला **आत्म्यानें** जाऊन भेटावें, म्हणून सर्व साधनांचीं द्वारें खुलीं होतात, आणि ह्यानंतरच **पराभक्ति** म्हणून काय चीज आहे, ती आपणास कळूं लागते. ज्या मनुष्याचा ह्या **पराभक्ती**च्या अंतःपुरांत प्रवेश होतो, त्यालाच **भक्ती**चे भिन्न भिन्न प्रकार, व तिला साधनीभूत चिन्हें, लक्षणें, हीं **अध्यात्मिक** अनुभवास कुचकामाचीं होत, असें सांगण्याचा अधिकार येतो. सर्वांभूतीं प्रेम किंवा बांधवप्रेम म्हणून एक अत्युच्च स्थितीचें प्रेम मानतात, तें त्या एकट्याच्याच अंगीं मुरलेलें असतें. बाकी सर्वांच्या निव्वळ कल्पना होत! त्याला भेद किंवा आपपरभाव कसला तो दिसतच नाहीं. त्या प्रेमसागरानें त्याचें मनोरूप पात्र इतकें कांहीं कांठोकांठ भरलेलें असतें कीं त्यास मनुष्य हा केवळ मनुष्य असा न दिसतां, तो त्याला आपल्या जिवाचा ताईत जो **हरी** तोच दिसत असतो. चंद्रप्रकाश व सूर्यप्रकाश हेही त्यास त्या **हरी**चेच प्रकाश आहेत, असें भासतें. जेथें जेथें म्हणून सौंदर्य किंवा भव्यपणा असेल, तेथें तेथें भक्तास त्याचाच वास आहेसा भास होतो. अशा तऱ्हेचे भक्त अद्यापि जगावर हयात आहेत, आणि कोणत्याही कालांत ते असणार नाहींत, असें कधींही घडाव-

याचें नाहीं. अशा भक्तास जरी सर्पानें दंश केला, तरी तो त्या प्रभूकडूनच एक दूत आला होता, असें तो समजतो. खरोखर वर सांगितलेलें मानवजातीचें बंधुत्व प्रतिपादण्याचा अधिकार अशांसच पोंचतो. त्यांनीं क्रोधास जिंकिलेलें असतें, आणि द्वेष किंवा मत्सर ह्यांचें वारें सुद्धां त्यांच्या मनास स्पर्श करीत नाहीं. मग त्यांचें प्राप्त फळ कोठून बाहेर पडणार? ह्या बाह्य, ऐंद्रिय व जड अशा जगताची कल्पना त्यांच्या कधीं स्वप्नांतसुद्धां यावयाची नाहीं. तेव्हां क्रोध त्यांच्या मनास कोठून शिवणार? कारण उच्च प्रेमाच्या प्रभावानें जगद्रूपी नाटकाच्या पडद्यामागें खरें तत्व काय आहे, हें त्यास धडधडीत दिसत असतें.



## प्रकरण ३ रें.

## भक्तियोगाचा राजमार्ग व त्याची गुरुकिल्ली.



अर्जुन श्रीकृष्णास विचारतो*:—"कोणी चित्तैक्यवृत्तीनें तुझें निरंतर भजन करीत असतात; आणि कोणी अभेद ब्रह्माचें ध्यान करीत असतात, ह्यांपैकीं श्रेष्ठ योगी कोण?" त्यावर भगवान् उत्तर देतातः—"जे माझे ठायीं चित्तैकाग्र्य करून, माझी निरंतर पूजा करितात व जे उच्च

---

* भगवद्गीता बारावा अध्याय पाहावाः—

अर्जुन उवाचः—

एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते ।
ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥ १ ॥

ह्यावर उत्तर पुढील ओळींनें सहा श्लोकः—

श्री भगवान् उवाचः—

मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।
श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमाः मताः ॥ १ ॥
ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते ।
सर्वत्रगमचिंत्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ॥ २ ॥
संनियम्येंद्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः ।
ते प्राप्नुवंति मामेव सर्वभूतहिते रताः ॥ ३ ॥

तन्हेच्या भक्तीनें परिपूर्ण असतात, तेच माझे खरे उपासक होत. त्यांसच सर्वांत श्रेष्ठ अर्थात् योगींद्र ह्मणावें. इंद्रियांचा निरोध करून, सर्वत्र समदृष्टी ठेवून, सर्वभूतीं दया करून जे त्या अचिंत्य, अचल, अवर्णनीय, निराकार, सर्वव्यापी, व नित्य अशा ब्रह्माची उपासना करतात, तेही मलाच पावतात. असें जरी आहे, तरी जे त्या अव्यक्त अशा परब्रह्माची उपासना करितात त्यांचा पंथ मोठा बिकट आहे. त्यांच्या या झटापटींत अनेक संकटें असतात. कारण शरीर धारण न करणाऱ्या अशा त्या निराकार ब्रह्माची वाट कळणें किंवा त्या वाटेनें जाणें, हें काम अति कठिण आहे. पण जे मजवर सर्व भार घालून, आपलीं सर्व कर्में मलाच अर्पण करतात, आणि माझें ध्यान करून, पूजा करतात—जे इतर सर्व फळांची आसक्ति सोडून माझी उपासना आरंभितात, त्यांस मी स्वतः हात देऊन जन्ममृत्यूच्या भोंवऱ्यांतून वर उचलून घेतों. कारण त्यांचें मन मींच वेधलेलें असतें.—" ज्ञानयोग व भक्तियोग ह्या दोहोंचाही

क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम्।
अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ ४ ॥
ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः।
अनन्येनैव योगेन मां ध्यायंत उपासते ॥ ५ ॥
तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात्।
भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥ ६ ॥

वर जीं दोन अवतरणें दिलीं आहेत, त्यांत अनुक्रमें ह्या श्लोकांचें जवळ जवळ भाषांतर आहे.— (भाषांतर कर्ता).

ह्यांत उल्लेख आहे. दोहोंचीही वरच्या उताऱ्यांत व्याख्या देऊन, कक्षा ठरविलेली आहे, असें ह्मणावयास हरकत नाहीं.

ज्ञानयोग हा उदात्त, गहन व अपरंपार आहे. पण चमत्कार पहा! प्रत्येक मनुष्यास वाटत असतें कीं, आपणास जें जें कांहीं साधावयाचें असतें, तें तें सर्व तत्वज्ञानानें साध्य करितां येईल. पण खरोखरी पाहूं गेलें तर तत्वज्ञानाच्या तत्वांप्रमाणें आपलें जीवित कंठणें हें फार कठिण काम आहे. तत्वज्ञानाप्रमाणें आयुःक्रमण करूं लागलें असतां, हजारों संकटें ओढवण्याचा अतोनात संभव असतो. जगामध्यें दोन तऱ्हेच्या व्यक्ती दृष्टीस पडतात. कांहीं **दैवी** स्वभावाच्या व कांहीं **आसुरी** स्वभावाच्या. **आसुरी** स्वभावाच्या लोकांस शरीराची जोपासना करणें, हेंच आपलें जीवितसर्वस्व असें वाटतें, आणि **दैवी** स्वभावाच्या मनुष्यांस देह हा **आत्म्या**च्या सुधारणेचें साधन आहे, असें वाटतें. **आसुरी** लोक आपल्या तत्वांच्या सिद्ध्यर्थ—प्रमाणांसाठीं—**वेदां**चा आधार देत बसतात. **ज्ञान हें मनुष्याच्या चांगल्या प्रवृत्तीस जसें चांगलेंच वळण देतें, तसेंच वाईट मनुष्याच्या वाईट कृत्यांसही तेंच प्रमाणही होऊन बसतें.*** व हेंच ज्ञानयोगास एक

* यास उत्कृष्ट उदाहरण एका ठगाचें आहे. कर्नल स्लीमन साहेबांची व एका ठगाची एकदां एके ठिकाणीं गांठ पडली. तेव्हां समोरच बोट करून ठग साहेबांस सांगतो:—

" साहेब! येथें ३०० मनुष्यें मारून म्यां पुरलीं आहेत." त्यावर साहेब त्यास विचारतात:—

"अरे! इतक्या मनुष्यांचे जीव घेतलेस, इतक्या हत्यांचें

मोठें भय आहे. **भक्तियोग हा साधा, शांत व रमणीय अशा स्वरूपाचा आहे.** भक्त ज्ञानयोग्याप्रमाणें कधींही उंच भराऱ्या मारीत बसत नाहीं. म्हणूनच त्याला कधीं इतक्या मोठ्या खड्ड्यांत पडावें लागत नाहीं. **आत्म्याचीं** बंधनें गळून जात तोंपर्यंत तो स्वतंत्र झाला, असें अर्थात‌च म्हणतां येणार नाहीं. मग तो धार्मिक मनुष्य कोणत्याही पंथाचा कां असेना ?

**परमेश्वरभक्तीनें** पावन झालेल्या **गोपी**जनांचे आत्मबंधक पाश किंवा सदसद्रूपी पापबंधनें कशीं तुटून गेलीं होतीं, हें खालील उताऱ्यावरून दिसून येईल. "**ईश्वर**चिंतन करतांनां, त्यांना जो आनंदातिरेक झाला, त्यायोगानें सत्कर्मप्रवृत्तीस बद्ध करणाऱ्या फलांपासून त्या मुक्त झाल्या. हीं कर्माचीं फलें नष्ट झालीं, तरी **गोपींना हरि** साध्य होईना. त्यामुळें त्यांच्या अंतरात्म्यांत जो विरहाग्नि भडकला, त्याच्यायोगानें त्यांच्या मनांत जीं असत्कर्में बीजरूपानें वास करीत होतीं, त्यांचीं राखरांगोळी उडाली." व ह्या रीतीनें त्या स्वतंत्र झाल्या.

**"तच्चिन्ताविपुलाल्हादक्षीणपुण्या च या तथा। तदप्राप्तिमहादुःखविलीनाशेषपातका॥ निरुच्छ्वासतया मुक्तिं गतान्या गोपकन्यकाः। .... .... ...."**

---

अघोर पातक जोडलेंस, ह्यांत तुला कांहींच वाटलें नाहीं ?" ठग उत्तर देतोः–" साहेब! कोण कोणास मारतो ?"

'उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते।'

ह्या भगवद्वचनाप्रमाणें ठगानें तत्वज्ञानाचें निरूपण केलें.–(भा. क.)

भक्तियोगांतील मुख्य गुरुकिल्ली ती ही, मनुष्याच्या अंतःकरणांतील निरनिराळ्या भावना, मनोविकार व प्रवृत्ती ह्या मूळच्या कांहीं वाईट नव्हेत. फक्त त्या काळजीपूर्वक ताब्यांत आणल्या पाहिजेत. तसेंच त्या उच्च पथाकडे वळतील अशी त्यांस दिशा दाखविली पाहिजे, कीं त्यायोगेंकरून उत्तमत्वाचें सर्वस्व अशी जी उच्च स्थिति, त्या स्थितीस मनोविकार किंवा त्या भावना प्राप्त व्हाव्या. सर्वांत उत्तम दिशा ती हीच कीं, जेणेंकरून आपण **ईश्वरा**सन्निध जाऊन पोंचतों. तीहून इतर कोणतीही दिशा गौण होय. आपल्या आयुष्यामध्यें सुख व दुःख ह्या अगदीं सर्वसाधारण गोष्टी, व पुनः पुनः घडून येणाऱ्या भावना होत. मनुष्यास जेव्हां धन किंवा अशीच एखादी ऐहिक वस्तु न मिळाल्याबद्दल दुःख होतें, तेव्हां तो आपल्या त्या भावनेस वाईट दिशा देत आहे, असें समजावें. तथापि **दुःखेंही केव्हां केव्हां पथ्यावर पडतात.** मनुष्याला, आपणास त्या **प्रभू**ची भेट झाली नाहीं, किंवा त्याचें आपणास दर्शन घडलें नाहीं, म्हणून जर दुःख वाटत असेल, तर तें दुःख त्यास **मोक्षपदा**ची प्राप्ती करून देईल. आपणांस मूठभर मोहरा मिळाल्या असतां जेव्हां आनंद होतो, तेव्हां आपण मनोविकारास ( आनंदास ) भलतेंच वळण दिलें असें होतें. तर तें वळण बदलून, त्यास दुसरें उत्तम वळण दिलें पाहिजे. एखाद्या अत्युत्तम हेतूकडे त्याचा मोर्चा फिरवावा. अशा तऱ्हेच्या **सद्धेतूकडे लक्ष वेधून आपणास जें सुख होतें, तोच उत्तम तऱ्हेचा**

आनंद समजला पाहिजे. त्याचप्रमाणें इतर मनोविकारांचेंही समजावें. भक्ताच्या दृष्टीनें ह्या मनोविकारांत कांहीं चूक आहे, असें मुळींच नाहीं, आणि ह्मणूनच, त्या सर्वांस एकत्र करून, ते आपणास एका परमेश्वराकडे अचूक नेऊन पोंचवितील अशी त्यांची तो योजना करितो.



# प्रकरण ४ थें.

## भक्तीचीं व्यक्त स्वरूपें.



प्रेमाचीं—भक्तीचीं निरनिराळीं स्वरूपें आहेत. **पूज्यभाव** हें पहिलें स्वरूप होय. देऊळ किंवा एखादें पवित्र तीर्थ, ह्यांविषयीं लोकांच्या मनांत पूज्यभाव वागत असतो. तो कां बरें? कारण, तेथें देवाची पूजा चालत असते, व असें जेथें तीर्थ आहे, तेथें देव हा असणारच, अशी लगेच कल्पना होते ह्मणून. कोणत्याही देशांतील लोक धर्मगुरूंस इतके पूज्य कां बरें मानतात? तर मनुष्याच्या मनांत त्यांजविषयीं पूज्यभाव असणें साहजिक आहे. कारण ते ईश्वराविषयींच उपदेश करीत असतात. तेव्हां मुळाशीं दृष्टी देतां **पूज्यभाव हें एक प्रेमाचें अपत्य आहे.** ज्याविषयीं आपल्या मनांत प्रेम नसतें, त्याविषयीं आपल्या मनांत कधींही पूज्यभाव उत्पन्न होणार नाहीं.

प्रेमाचें दुसरें स्वरूप म्हणजे प्रीति किंवा ईश्वरचिंतनापासून सुख होणें, हें होय. मनुष्यप्राण्यास इंद्रियोपभोगांत केवढें सुख वाटत असतें बरें? ते नाहीं तेथें जातात, व अनेक संकटांशीं टक्कर खेळावयास सिद्ध होतात, कां कीं, जी वस्तु आपणास अभीष्ट आहे, व जिच्याकडे इंद्रियांचा ओढा आहे, ती प्राप्त व्हावी. आतां भक्त होण्यास

जें काय पाहिजे असतें, तें हें कीं, आपला अशा तऱ्हेचा विलक्षण ओढा ईश्वराकडे लागला पाहिजे.

ह्यानंतरचें प्रेमाचें स्वरूप ह्मणजे **विरह** होय. ह्या दुःखांत एक तऱ्हेचें अप्रतिम माधुर्य असतें. कारण विरह ह्मणजे प्रियवस्तु एकाएकीं नाहींशी झाल्यानें होणारें दुःख. एखाद्या मनुष्यास, ईश्वरप्राप्ति न झाल्यामुळें किंवा सर्व जगांत जिचें ज्ञान होण्यास योग्य अशा वस्तूचें ज्ञान न झाल्यामुळें अतोनात दुःख होतें, व त्यामुळें चैन पडेनासें होऊन, तो वेड्याप्रमाणें दिसूं लागतो. ही जी मनाची स्थिति होते, तिचेंच नांव विरह. इतर कितीही वस्तू जरी पुढें असल्या, तरी त्यास आपल्या जिवाच्या कलिज्यावांचून त्यास जी अगदीं तळमळ लागून राहते, ती कांहीं केल्या जात नाहीं, अशी ह्यावेळीं मनाची स्थिति होते. **(एकरतिविचिकित्सा.)** आपण व्यवहारांत कितीदां तरी ह्या व्यवहाराचा अनुभव घेत असतों. जेव्हां एखाद्या पुरुषाचें एखाद्या स्त्रीवर खरें प्रेम असतें किंवा एखाद्या स्त्रीचें पुरुषावर असतें, तेव्हां त्या उभयतांसही आपल्या प्रिय वस्तूशिवाय इतर कोणतीही वस्तु पुढें आल्यास तिचा साहजिकच अगदीं तिटकारा येतो. **पराभक्तीचा** पूर्ण अंमल घडल्यावर, प्रियवस्तु विरहित अन्य वस्तूंचे विषयीं, एक तऱ्हेचें औदासीन्य मनांत येऊं लागतें. ईश्वरेतर कोणत्याही गोष्टीसंबंधीं बोलण्याचा अगदीं वीट येतो. "त्याचेंच चिंतन करा, आणि इतर वायफळ शब्दांस अगदीं फांटा द्या." **(अन्या वाचं विमुंचथ,).** जे त्याच्याचविषयीं सदोदित बोलत असतात, त्यांचा मात्र भक्तांशीं परिचय घडतो.

पण जर कोणी इतर कोणत्याही गोष्टीविषयीं बोलत असेल, तर तो त्यास दुःसह होतो.

ह्याच्याही पुढची भक्तीची स्थिति ह्मणजे त्या **प्रिय वस्तूकरितांच आपलें जीवित ठेवावयाचें.** त्यांचेंच चिंतन घडत असतें, ह्मणून जीवित सुखावह वाटत असतें. **(तदर्थप्राणस्थान).** तें नसेल तर एक क्षणभरही जीवित ठेवावयाचें नाहीं. त्या प्रियवस्तूचें स्मरण होत आहे, ह्मणूनच हें जीवित धारण करण्यांत कांहीं गोडी आहे. अशा तऱ्हेनें भक्तीची परिपूर्णता झाली, कीं **(तदीयता)** तद्रूपता प्राप्त होते. जेव्हां भक्तास ईप्सित मनोरथ तडीस गेल्यानें धन्यता वाटूं लागते, ह्मणजे जेव्हां त्यास **परमात्मा** वश होतो, अर्थात् त्याचा जणों काय संगच घडतो, तेव्हां त्याचा स्वभावच बदलून जातो, आणि मन शुद्ध अगदीं 'पवित्र गंगाजळ, होऊन जातें. त्याच्या जीवित्वाचें साफल्य होतें. तथापि असले भक्त पुढेंही आपलें आयुष्यक्रमण करीत असतातच.* पण तें केवळ त्याचें पूजन घडावें ह्मणून. कारण जगांतील सुखाचा ठेवा कायतो तोच असतो. त्यास ते कधींही सोडणार नाहीत. "हे राजा! त्या हरीचा एकेक गुण असा आहे कीं, ज्यांच्या इहलोकांतील सर्व कामना तृप्त झालेल्या असतात, ज्यांच्या सदसत्प्रवृत्तिरूप सर्व ग्रंथी तुटून गेलेल्या

* ह्याचें प्रत्यक्ष उदाहरण भगवद्भक्त तुकारामाचें जीवितसाफल्य पूर्वींच झालेलें होतें. पण पुढेंही त्याचें तसेंच आयुष्यक्रमण चाललें होतें. तें कां? तर तुकारामबोवाच सांगतात:-

तुका ह्मणे आतां। राहिलों उपकारापुरता. —(भा. क.)

असतात, तेदेखील ह्या एका प्रेमास्तव ईश्वराचें भजन करीत असतात." तो प्रभु असा आहे कीं, "सर्व देव त्याचें पूजन करीत असतात; आणि सर्व मुमुक्षू व ब्रह्मज्ञानी त्याच्याच चरणरजांत लोळत असतात.–" **यं सर्वे देवा नमस्यन्ति । मुमुक्षुवो ब्रह्मवादिनश्चेति ।**–असा ह्या प्रेमाचा प्रभाव आहे. जेव्हां मनुष्य आपलेपणास अगदीं विसरून जातो, व त्याचें अंधममत्व नाहींसें होतें, तेव्हांच त्यास तद्रूपता प्राप्त होते, मग त्याला प्रत्येक वस्तू पवित्र दिसूं लागते कारण ती परमेश्वरकृत असते. ह्या आपल्या ऐहिक प्रेमामध्येंसुद्धां, आपल्या जिवाच्या कालियाची एखादी अन्य वस्तुसुद्धां आपणास कोण प्यार असते! आपल्या हृदयस्वामिनीची एखादी केंसांची बट जरी असली, तरी ती मोठ्या आवडीनें आपण जिवापलीकडे बाळगून ठेवतों. त्याचप्रमाणें जेव्हां एखादा मनुष्य **परमेश्वरभक्ती** करूं लागतो, तेव्हां त्यास ही तत्कृतसृष्टि ही जीव कीं प्राण वाटूं लागते.



## प्रकरण ५ वें.

# सर्वांभूतीं प्रेम व त्या प्रेमानेंच आत्म्या- च्याठायीं लीन होणें.



समष्टि किंवा सर्व साधारण असें तत्व आपल्या मनांत भरूं लागण्यापूर्वीं ह्या सर्वसाधारण त- त्वाची जी **व्यष्टि** ह्मणजे विशिष्ट वस्तु, तीवर आपलें प्रेम कसें बरें जडणार? परमेश्वर हा **स- माष्टि** किंवा विश्वाचें सर्वसाधारण व त्याजहून वेगळें असें एक तत्व आहे, आणि सर्व दृश्य विश्व हें **व्याष्टि** किंवा विशिष्ट वस्तु होय. तेव्हां **समष्टीवर** आ- पलें प्रेम जडेल, तरच हें विश्व आपणास आवडूं लागेल. कारण **समष्टी**मध्यें ह्या लाखों लहान लहान वस्तू एकवट- लेल्या असतात. **हिंदुस्थानांतील** तत्वज्ञानी लोक विशिष्ट वस्तूबद्दलच विचार करून राहत नाहींत, तर विशिष्ट वस्तूकडे एकदां घाईघाईनें दृष्टी फेंकून ह्या विशिष्ट वस्तू- चा, ज्या सर्वसाधारण तत्वांत किंवा स्वरूपांत समावेश होईल, तें तत्वही शोधून काढितात. सर्वसाधारण तत्वांचा शोध करणें, हा **भारतवर्षीय** तत्वज्ञान व धर्म ह्यांचा उद्योग चाललेला असतो. ज्ञानी लोक वस्तूंचें ऐक्य शोधून काढण्यांत गुंतलेले असतात. कां कीं सर्वसाधारण व

जगाचें एकच असें जें तत्व, तें जाणल्यानें सर्व वस्तूंचें ज्ञान होईल. भक्ताची निराळीच खटपट चाललेली असते. ज्या एकावर प्रेम जडल्यानें हें सर्व विश्वच प्रेममय होऊन जाईल, तो एक सर्वसाधारण, सर्वांचा मूळ पुरुष, भक्त शोधून काढीत असतो. जगांत सर्व शक्तींचें सर्वसाधारण मूळ-स्वरूप जें काय आहे, कीं जें शक्तिस्वरूप साध्य करून घेतलें असतां, सर्व जगतावरही अंमल चालवितां येईल, तें शोधण्यांत **योगी** गढून गेलेला असतो. हिंदुस्थानांतील लोकांचें सर्व चित्त, त्या देशाचा इतिहास चाळून पाहिल्यास—शास्त्र घ्या, अध्यात्मशास्त्र घ्या, तत्वज्ञान घ्या, प्रेम घ्या किंवा इतर कोणतीही बाबत घ्या—सर्वच बाबतींत त्या सर्वसाधारण तत्वाचा शोध करण्यांतच गढून गेलें आहे, असें आढळून येतें. भक्ताच्या दृष्टीनें असा निर्णय ठरतो कीं, जर आपण एकामागून एक व्यक्ती घेऊन आपलें सारखें प्रेम बसवूं लागलों, तर असें करतां करतां वर्षेंच्या वर्षे नव्हे कोडो-गणती युगेंच्या युगें जरी लोटलीं तरी, सर्व जगाच्या एक लक्षांश भागावरही आपलें प्रेम पुरतें जडलेलें नाहीं, असें आपल्या दृष्टोत्पत्तीस येईल. पण जेव्हां मुख्य कल्पनेशीं गांठ पडते, ह्मणजे ईश्वर हा जगांतील सर्व प्रेमशक्तीचा एकवटलेला मूर्तिमंत पुतळा होय, किंवा जगांतील स्वतंत्र अथवा मुक्त, बंधनयुक्त किंवा मुमुक्षु अशा सर्व आत्मतत्वांचें एकीकरण होय, हें जेव्हां कळून येतें, तेव्हांच **सम-प्रेम** किंवा सर्वभूतीं प्रेम असें ज्यास ह्मणतात, तें प्रगट करितां येईल. ईश्वर हा **समष्टि** व सर्व विश्व हें त्या ईश्वराचें भेदविशिष्ट रूप होय. ह्या **समष्टीवर** आपलें प्रेम

जडूं लागलें कीं, वस्तूंचें प्रेम त्यांत अंतर्भूत होतेंच, व नंतर सर्व जगावर समदृष्टीनें प्रेम ठेवणें, व परोपकारार्थ देह झिजविणें, ह्या सर्व गोष्टी आपोआपच घडून येतात, नाहीं तर जगावर उपकार करणें ह्मणजे कांहीं थट्टा नव्हे! अशी उपकार करण्याची बुद्धि **परमेश्वरा**वर अवर्णनीय प्रेम जडल्याशिवाय कधींही व्हावयाची नाहीं. "प्रत्येक वस्तु परमेश्वराची आहे, आणि तो तर माझ्या जिवाचा लाल. माझें त्यावर विलक्षण प्रेम जडलेलें आहे." असें भक्त ह्मणत असतो. याप्रमाणें सर्व वस्तू **परमेश्वरा**च्याच असल्याकारणानें प्रत्येक वस्तु त्याला पवित्र व प्रियकर वाटते. सर्व प्राणिमात्र त्याचीं मुलें किंवा त्याचें शरीर अथवा त्याचींच व्यक्त स्वरूपें होत. तर मग आपण कोणत्याही जीवास दुखवूं नये, तर त्यावर प्रेमबुद्धिच ठेवावी, असें नाहीं का सिद्ध होत? **ईश्वरा**च्या प्रेमाबरोबर अर्थातच जगांतील प्रत्येक वस्तु मनुष्यास आवडू लागते. जितकें जितकें आपण त्याच्या जवळ जवळ जाऊन पोंचूं, तितकें तितकें सर्व वस्तु त्यांतच समावेश पावतात, असें आपणांस दिसून येईल. जसजशी **पराभक्ति** साध्य होते, तसतसा त्यास **ईश्वर** जेथें तेथे दिसूं लागतो. याप्रमाणें आपले **अंतःकरण** ह्मणजे प्रेमाचा एक अखंड झराच बनून जातो. व प्रेमाच्या ह्याहीपेक्षां उच्च स्थितीप्रत आपण जाऊन पोंचतों. तेव्हां जगांतील व वस्तूंतील लहान लहान भेद चट् सारे निघून जातात. मनुष्य हा मनुष्याप्रमाणें दिसत नसून ईश्वरच भासूं लागतो. प्राणी हा प्राणीसा भासत नाहीं; व वाघ पाहिला ह्मणजे ईश्वरच व्याघ्ररूपानें जात

आहे, असें वाटूं लागतें. ह्याप्रमाणें भक्ति जेव्हां कळसास पोंचते, तेव्हां प्रत्येक वस्तु, प्रत्येक जीव व प्रत्येक आत्मा ह्यांचीच पूजा सुरू होते.

**एवं सर्वेषु भूतेषु भक्तिरव्यभिचारिणी ।**
**कर्तव्या पंडितैर्ज्ञात्वा सर्वभूतमयं हरिम् ॥**

" हरि हा प्रत्येक प्राणिमात्रांत वास करीत असतो, असें जाणून ज्ञात्यानें सर्वांभूतीं अहेतुक प्रेम करावें" असे अलोट, सर्वांस पोटांत आकळणारें जें हें प्रेम, तें अंगीं बाणल्यावर आपलेपणा ह्मणून काय तो उरतच नाहीं, व कशीही गोष्ट घडली तरी ती सुखकारकच वाटते. हें त्या प्रेमाचें फल होय. (अप्रातिकूल्य.) मग भक्ताचा आत्मा, दुःख जरी मूर्तिमंत पुढें येऊन उभें राहिलें तरी त्याचें उलटें आगतस्वागतच करू लागतो. दुःखाचा डोंगर जरी कोसळला, तरी तो ह्मणतोः—'यावें. संकटमहाराज! काय? आपणही त्या प्रेमसागरांतूनच आलां असणार?' साप जरी आला तरी तो ह्मणतोः—"यावें महाराज, मृत्यु जरी आला, तरी त्यास असला भक्त प्रसन्न वदनाने भेटावयास जाईल. " असली मंडळी माझ्या दर्शनाला चालून येतात, हें मी माझें भाग्य समजतों. तुम्हां सर्वांचें क्षेम असो!" भक्त आपल्या ह्या निरहंकार पूर्णस्थितीमध्यें—कीं जी स्थिति परमेश्वरनिर्मित म्हणून जें जें काय असेल त्यावर व खुद्द निर्माणकर्त्यावर प्रेम ठेविल्यानें प्राप्त होते तींत—आपल्या सुखदुःखाविषयीं अगदीं बेफिकीर असतो. दुःखासंबंधीं कधींही त्याची कुरकूर असावयाचीच नाहीं. अशा तऱ्हेचा प्रेमसागर जो ईश्वर त्याजवर अनन्यगतिक भार

टाकून राहणें, मोठमोठ्या मर्दुमकीच्या तरवारबहादूरीपेक्षांही अधिक श्रेयस्कर आहे, ह्यांत कांहीं शंका नाहीं.

साधारणतः मनुष्यमात्रास शरीर हेंच आपलें सर्वस्व वाटत असतें. त्यांचें जग काय तें तेवढेंच; आणि सुखाची कल्पना सारी इंद्रियसुखापुरतीच ! ही इंद्रियें व विषय यांची पूजारूप **डाकीण** हात धुवून आमच्या पाठीस लागली आहे. आपण कितीही जरी बडबडलों, व ज्ञान नभोमंडळांत कितीही जरी भराऱ्यांवर भराऱ्या मारल्या, तरी आपल्या मनाची स्थिति शुद्ध गिधाडासारखीच असते. ह्मणजे आपलें मन खालीं असलेल्या एखाद्या मांसाच्या इवल्याशा तुकड्यावर बसलेलें असतें. पह्रा.—वाघाच्या तडाक्यांतून आपल्या शरीराचें रक्षण कां करावयास पाहावें ? वाघाला तें कां खाऊं देऊं नये ? खाऊं दिल्यास वाघास तरी संतोष होईल. आतां हें जरी अति झालें असें वाटेल, तरी पण हाच खरा **आत्मत्याग** व हीच खरी **ईश्वरभक्ति** होय. वर सांगितलेली स्थिति कीं, जी केवळ काल्पनिक **आत्मत्यागा**ची हद्द होय, ती आपणास प्रत्यक्षः प्राप्त होईल काय ? प्रेममय असा जो धर्म, त्याचें हें केवळ शिखर होय. तेव्हां अर्थातच त्याची उंची इतकी—गगनचुंबित—आहे कीं, तेथून खालीं पाहतांना डोळे अगदीं फिरून जातील. ह्या जगांतील फारच थोडे पुरुष इतक्या उंचीवर गेलेले असतात, पण इतक्या उंचीवर पोंचण्याच्या आधीं पूर्ण भक्ताच्या पदवीस पोंचलें पाहिजे. कोणत्याही तऱ्हेचा **आत्मत्याग** करावयास जेव्हां तयार व्हावें, तयारच नुसतें नव्हे, तर एका पायावर

सर्वदां उभें असावें, तेव्हांच पूर्ण भक्त व्हावें. एरवीं नांव-सुद्धां काढूं नये! आपला देह उत्तम किंवा साधारण स्थितींत पाहिजे त्यास राखतां येईल. तथापि आपलें शरीर किती केलें तरी जावयाचेंच; तें कांहीं शाश्वतचें नव्हे. तेव्हां ज्यांचीं शरीरें परोपकारार्थ खर्चीं पडतात, तेच धन्य होत. 'धन किंवा प्रत्यक्ष प्राणसुद्धां साधु लोक परोपकारार्थ खर्चीं घालण्यास तयार असतात. ह्या जगांत मरणाइतकी ठाम घडणारी दुसरी कोणतीच गोष्ट नाहीं. तेव्हां एवींतेवीं जाणारच. मग तें सत्कृत्यार्थच गेलेलें काय वाईट?' फार झालें तर पन्नास किंवा शंभर वर्षें आयुष्य आम्हीं कसें तरी कंठितों. पण पुढें काय? जें जें म्हणून संयोगानें घटलेलें आहे, त्याचा नाश हा होणारच. सूक्ष्म तत्वांचा बनलेला जो हा आमचा देह, तो आज ना उद्यां नाश पावून, त्याचें पृथक्करण झालेंच पाहिजे. **येशू ख्रिस्त, महंमद** व **बुद्ध** हे त्याच पंथाला गेले. तसेंच, जगांतील दुसऱ्याही मोठमोठ्या धर्मगुरूंनीं तोच रस्ता सुधारला! 'ह्या नश्वर जगतांत प्रत्येक वस्तूच्या कपाळीं नाश हा नेमलाच आहे! तेव्हां आमचें कर्तव्य एवढेंच कीं, जितका काळ आपल्या हातांत वस्तु असते, तेवढ्यां-तच तिजपासून आपण अत्युत्तम लाभ करून घेतला पाहिजे.' असें भक्त म्हणत असतो. तसेंच जन्माचें खरें सार्थक म्हटलें म्हणजे प्राणिमात्रांच्या उपयोगार्थ देह झिजविणें, हेंच होय. ह्या जगामध्यें जो आपस्वार्थीपणा दृष्टीस पडतो, त्याचें कारण हें शरीर म्हणजेच आपण, ही भयंकर कल्पना सर्वांच्या मनांत असते. आपलें ज्यावर

स्वामित्व चालत आहे, तें जें शरीर, तेंच आपण व तेंच आपलें सर्वस्व होय. ह्या भ्रामक समजामुळें, आपणास वाटत असतें कीं, ह्या देहाची जोपासना करण्यांत व त्याला संतोषविण्यांत आपण होतील तेवढ्या उपायांनीं झटलें म्हणजे झालें! आपण ह्या शरीराहून वेगळे आहों, हें जर आपणांस कळूं लागेल, तर आपण भांडणार तरी कोणाशीं? किंवा कलह तरी कोणाशीं करणार? कारण एका शरीराच्या कल्पनेबरोबर सर्व आपस्वार्थी कल्पनांची विल्हेवाट लागते. म्हणून भक्त म्हणतो कीं, जगामधील सर्व वस्तू जणों काय नाहींतच अशी कल्पना करून चालणें, म्हणजेच खरा **आत्मत्याग** होय. जसजशा गोष्टी घडून यावयाच्या असतील, तसतशा घडूं द्या. 'तुझी इच्छा असेल तसेंच घडूं दे' (Thy will be done) ह्या **बायबलांती**ल वाक्याचा अर्थ तरी हाच आहे. म्हणजे आपलें मानसिक दौर्बल्य व मनाच्या इंद्रियविषयक उड्या, ह्या सर्व ईश्वरेच्छाच आहेत, असें समजून, सर्व जगांत कलह व रणकंदन माजविण्यांत कांहीं अर्थ नाहीं, हें उमजावें. आतां हें खरें कीं, ह्या आपस्वार्थीपणापासूनही चांगलें निष्पन्न होण्याचा संभव असतो. परंतु ह्याचें कारण ईश्वर दूरदर्शी आहे, एवढेंच खरें. म्हणूनच पूर्णावस्थेप्रत पोंचलेल्या भक्ताची इच्छा, कोणतेंही काम, आपल्या इच्छे-नुरूप स्वतंत्र रीतीनें करण्याची असूं नये. "प्रभो! कोणी तुझ्या नांवानें उंच उंच देवळें बांधतात; कोणी तुझ्या नांवानें मोठा धर्मादाय करतात. पण मी पडलों दरिद्री—अगदीं अकिंचन—माझें ह्मणून असलेलें एवढें हें

शरीर मात्र मी तुझ्या चरणीं अर्पण करितों. तर हे प्रभो! शरणागताचा अव्हेर करूं नको." खऱ्या भक्ताच्या अगदीं अंतःकरणापासून अशीच प्रार्थना बाहेर पडावयाची. ज्याची अंतःकरणवृत्ति वरच्याप्रमाणें रंगून गेली आहे, त्याला त्या प्रभूच्या चरणारविंदीं आपलें सर्वस्व अर्पण करणें, ह्यांतच सर्व संपत्ति व अधिकार, दरोबस्त लाभ व उपभोग, ह्यांहूनही शतगुणित ऐवज मिळतोसें वाटत असतें. अशा प्रभूस सर्वस्व अर्पण करणाऱ्या भक्ताची शांति अगदीं अनुपमेय असून, आपल्या बुद्धीस अगम्य असते. अप्रातिकूल्य ह्मणून जी वर स्थिति सांगितली, तीमध्यें त्याला आपल्या हिताहिताविषयीं औदासीन्य वाटत असतें, व सहजगत्याच त्याला कांहीं अडथळे येत नाहींत. ह्या उत्तमोत्तम आत्मत्यागाच्या स्थितींत आसक्ति साफ धुवून जाते. मग ती कसल्याही स्वरूपाची कां असेना? ज्याच्या हातून सर्व वस्तूंची सृष्टि, स्थिति व लय होत असतो, त्या प्रभूचें सर्वांस आकर्षिणारें प्रेम मात्र त्याच्या मनांत वागत असतें. हें जें ईश्वरविषयक प्रेम तें आत्म्यास बांधीत नाहीं, इतकेंच नव्हे तर त्याचे असलेले सर्व पाश तोडून टाकतें.



## प्रकरण ६ वें.

—:०:—

### भक्तास श्रेष्ठज्ञान व उच्च प्रतीची भक्ति हीं एकच होत.



उपनिषदांत परज्ञान व अपरज्ञान असे ज्ञानाचे दोन भेद कल्पिलेले आहेत, आणि भक्ताच्या दृष्टीनें पाहतां, **परज्ञान** व **पराभक्ति** ह्या दोहोंत भेदच नाहीं. **मांडुक्योपनिषदांत** असें ह्मटलें आहे:—

**द्वे विद्ये वेदितव्ये इति ह स्म यद् ब्रम्हविदो वदन्ति परा चैवापरा च। तत्रापरा ऋग्वेदो यजुर्वेदःसामवेदोऽथर्ववेदःशिक्षा कल्पो व्याकरणं निरुक्तं छंदो ज्योतिषमिति अथ परा यया तदक्षरमधिगम्यते ॥**

"**ब्रम्हज्ञानी** लोक असें स्थापित करतात कीं, **पराविद्या** व **अपराविद्या** असे ज्ञानाचे सारखे दोन भेद आहेत. ह्यांपैकीं **अपराविद्येंत, ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद, शिक्षा** अथवा स्वरोच्चारशास्त्र, कल्प अथवा कर्मविधि, व्याकरण, निरुक्त अथवा व्युत्पत्ति, छंदःशास्त्र व ज्योतिषशास्त्र इत्यादींचा समावेश होतो. व **पराविद्या** ती ही कीं, जेणेंकरून निर्विकार **प्रभूची** ओळख पटते." ह्यावरून **ब्रम्हज्ञान** हेंच **श्रेष्ठज्ञान होय.** असें स्पष्ट ध्वनित झालें. आतां **देवीभागवतांत**

**पराभक्ती**ची व्याख्या दिली आहे, ती येणेंप्रमाणें:— "आपण एका भांड्यांतून दुसऱ्या भांड्यांत तेल ओतीत असतां त्याची जशी संतत धार चालते, तद्वतच आपण **प्रभूचें** अखंड—संतत—चिंतन करूं लागलों, कीं ती पराभक्ति होते." **ईश्वरा**चे ठायीं मनाचा जो अखंड लय लागतो, व तदनुषंगिक जी निश्चित अनुरक्ति उत्पन्न होते, तेंच **ईश्वर**भक्तीचें किंवा प्रेमाचें उच्च स्वरूप होय. आणि इतर सर्व स्वरूपें किंवा भक्तीचे जे भिन्न भिन्न प्रकार, ते सर्व ही **पराभक्ती** साध्य करण्याचीं साधनें होत. ह्याच **पराभक्ती**ला **रागानुग** म्हणजे प्रेमास अनुसरणारी भक्ति असें म्हटलेलें आहे. जेव्हां मनुष्याच्या अंतःकरणांत ह्या अगाध प्रेमाचें बीज रुजेल, तेव्हां त्याचें मन एकट्या **ईश्वरा**चेंच एकसारखें चिंतन करून राहील, व त्यास दुसरें कांहीं आठवणारच नाहीं. तो स्वतः होऊन तर आपल्या मनांत दुसऱ्या कोणत्याही विषयास जागा देणार नाहीं, आणि त्याचा **आत्मा** अक्षय्य विजयी होऊन, त्यास अशी शुद्धि प्राप्त होते कीं, कोणाच्याही साहाय्यावांचून मन व जड प्रकृति ह्यांचे पाश त्यास तोडून टाकतां यावे. त्यालाच आपल्या हृदयमंदिरांत **ईश्वरा**ची पूजा करतां येईल. अशालाच धर्मतत्वें, धर्मपुस्तकें, धर्मचिन्हें विधी किंवा संस्कार ह्यांपैकीं कशाचीही जरूर राहणार नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यापासून त्यास कांहीं फायदाही व्हावयाचा नाहीं. परंतु अशा तऱ्हेची **ईश्वर-भक्ति** साध्य होणें भगीरथ प्रयत्नाचें काम आहे! सामान्यदृष्ट्या जेथून कांहीं तरी प्रतिफळ मिळण्याची आशा

असते, तेथेंच मनुष्याचें प्रेम जडतें. पण कोणत्याही रूपानें, त्या प्रेमाचा मोबदला जर मिळणार नाहीं, तर तेथें मनुष्याची उदासीन वृत्ति दृष्टीस पडते. तथापि जेथें प्रीतीचा मोबदला मिळणार नाहीं, अशा ठिकाणींही क्वचित् प्रसंगीं मनुष्याचें प्रेम असल्याचें दिसून येतें. अशा प्रकारचें प्रेम म्हणजे दीपज्योतीवरील पतंगाप्रमाणेंच होय. पतंगाचें दीपज्योतीवर विलक्षण प्रेम असतें, म्हणून तो तिजवर झडप घालून कडकडून भेटतो, व शेवटीं भाजून मरतो. बरें; इतकें होऊन तरी त्याची खोड जाते का ? छे:! जित्याची खोड मेल्याशिवाय कशी जाणार? त्याला स्वभावत:च दिव्याच्या ज्योतीची आवड असते. ह्या जगांत प्रेमाचीं जीं जीं स्वरूपें दृष्टीस पडतात, त्या सर्वांतही, ज्यावर आपला स्वभावत:च ओढा असतो, त्यावर आपण जें प्रेम करतो, तें नि:संशय अति श्रेष्ठ होय. आणि **अध्यात्मिकज्ञान**क्षेत्रांत अशा तऱ्हेच्या प्रेमाचें बीज रुजून रोप सारखें वाढीस लागलें, म्हणजे कालांतरानें, त्यास **पराभक्ती**चीं सर्वोत्कृष्ट फळें लकटूं लागतात.



## प्रकरण ७ वें.

## भक्तीचा अथवा प्रेमाचा त्रिकोण.



भक्तीचा एक त्रिकोण आहे, म्हटल्यास चालेल. तिचा एक एक कोण म्हणजे तिचें एक एक अभिन्न लक्षण होय. आतां तीन कोण असल्यावांचून त्रिकोण व्हावयाचा नाहीं, हें तर सिद्धच आहे. त्याप्रमाणें अर्थातच तीन लक्षणें असल्याखेरीज भक्तीचाही त्रिकोण होणार नाहीं. ह्या भक्ति त्रिकोणाचा पहिला कोण हाः—**प्रतिफलांची वांछा नसणें.** जेथें जेथें म्हणून ही वांछा असेल, तेथें तेथें खरें प्रेम असणार नाहीं. कारण तसें झाल्यानें भक्ति ही नुसती विक्रीची वस्तु होईल. आपल्या भक्तीबद्दल **ईश्वरा**नें आपणास हें फळ द्यावें किंवा तें फळ द्यावें, अशी वांछा जोंपर्यंत आपल्या मनांत खेळत आहे, तोंपर्यंत खऱ्या भक्तीचा अंकुर फुटणें, म्हणजे 'मुसळाला अंकुर' फुटण्याप्रमाणेंच अशक्य आहे. त्यानें प्रसन्न होऊन आपणास ईप्सित फल द्यावें, ह्या हेतूनें जे **ईश्वर**पूजन करतात, त्यांस तेंच फल जर मिळालें नाहीं तर ते त्याची पूजा करणार नाहींत हें खास! परंतु भक्ताची गोष्ट तशी नसते. त्याला प्रेम—भक्ती करावयाला **ईश्वरा**सारखा योग्य विषय दुसरा कोणताच दिसत नसतो, आणि त्याशिवाय भक्ताचा प्रेम करण्यांत

दुसरा कोणताही हेतु नसतो. अशी एक गोष्ट सांगतात कीं एक राजा एकदां एका वनांत गेला, तेथें त्यास एक ऋषि भेटला; राजा त्याशीं बोलतां बोलतां त्याचें चातुर्य व निर्मळ मनोभाव पाहून फार खुष झाला व ऋषीस कांहीं धन देऊं लागला. राजा म्हणाला:—"ह्या देणगीचा आपण स्वीकार केल्यास, मजवर मोठा अनुग्रह होईल." ऋषीनें "छे! छे! नको" म्हणून म्हटलें कीं, "राजा! ह्या वनांतील फळें हीं मला खावयास पुरेशीं आहेत; पर्वतशिखरावरून झुळझुळ वाहत येणाऱ्या झऱ्यांचें निर्मळ पाणी मला प्यावयास मिळत आहे; मला नेसावयास वृक्षांपासून वल्कलें हवीं तितकीं होत आहेत; आणि निवांत गिरिकंदरें हे मला रहावयास वाडे आहेत. मग मला आतां तुझ्यापासून काय किंवा दुसऱ्या कोणापासून काय, कांहीं घ्यावयास उरलें आहे काय? कांहींच नाहीं." त्यावर राजा म्हणाला:—"महाराज! केवळ मजवर अनुग्रह म्हणून याचा आपण स्वीकार करावा, आणि माझ्या नगरांत येऊन, माझ्या वाड्यास एकदां पाय लावून, तेथेंच राहावें." अशी बराच वेळ मनधरणी केल्यावर राजाचें म्हणणें ऋषीनें मान्य केलें व मग ऋषीस घेऊन राजा वाड्यांत गेला. नंतर त्या ऋषीस राजानें द्यावयाचें तें देतांनां राजा मनांत वर मागूं लागला कीं, 'मला धन दे, संपत्ति दे, राज्य दे व आरोग्य दे.' परंतु ही राजाची अंतर्याचना संपते न संपते तों ऋषि मुकाट्यानें उठून राजवाड्यांतून चालता झाला. हें पाहून राजा गोंधळला आणि "महाराज! आपण चाललां कोठें? मीं दिलें त्याचा आपण स्वीकार केला नाहीं." असें तोंडानें ओरडत ऋषीच्या मागें धावं

लागला. ऋषि मागें वळून म्हणाला "भिकारी कोठचा? मी कांहीं भिकाऱ्याच्या घरीं याचना करावयास आलों नाहीं, तूं तर अगदीं भिकारी दिसतोस; तेव्हां तूं मला देणार तें काय? तुझ्यासारख्या भिकाऱ्याकडून कांहीं घेण्याइतका मी मूर्ख नाहीं. जा मूर्खा! जा, परत जा; माझ्यामागून येऊं नको." अशा भिकाऱ्यामध्यें व खऱ्या भक्तामध्यें 'जमीनअस्मानाची तफावत' असते, हें नेहमीं ध्यानांत वागविलें पाहिजे. मोक्षाच्या किंवा अशाच दुसऱ्या फलाची इच्छा धरून, ईश्वराचें पूजन केलें असतां, त्याचीही तितकीच किंमत ठरते! प्रेमांत कधीं प्रतिफलाची इच्छा नसावी. प्रेम ही भावनाच फार मनोरम आहे, व याकरितांच आपण प्रेम करीत असावें. भक्त ईश्वराची पूजा करीत असतो, त्याचें कारण तरी त्याला तसें केल्याशिवाय राहवतच नाहीं, हें होय. एखादा सुंदर देखावा दृष्टीस पडला तर आपणास त्याची आवड उत्पन्न होते, पण त्यापासून आपल्यास कांहीं तादृश फायदा व्हावा, ही कल्पना आपल्या गांवींही नसते. त्याचप्रमाणें त्या देखाव्यालाही पण आपल्यापासून कांहीं मागावयाचें नसतें. तथापि त्याच्या नुसत्या दर्शनानेंच मनाला एका तऱ्हेची उत्तम स्थिति प्राप्त होते; आपल्या अंतःकरणांतील सर्व ताप शमतात, आणि तेवढ्या वेळेपुरता कां होईना, पण तो आपणास मरणाची अगदीं विस्मृती पाडतो, आणि जवळ जवळ ब्रह्मानंदांत आपणास बुडवून टाकतो. ह्याचेंच नांव खरें प्रेम, व ह्याच तो भक्तित्रिकोणाचा पहिला कोण. ईश्वरापाशीं आपल्या प्रेमाबद्दल एक कपर्दिकही मागूं नका.

आपण मोठे कर्णोदार आहों, अशी कल्पना करून चालावें, म्हणजे आपलें प्रेम त्या **प्रभूस** अर्पण करावें, पण त्यापासून उलट कांहींही घेऊं नये.

भक्तित्रिकोणाचा दुसरा कोण म्हणजे **प्रेमामध्यें भीतीचा लेशही नसणें**, हा होय. जे **ईश्वरा**ला भितात व त्यामुळें त्याजवर प्रेम ठेवतात, ते मनुष्यांत अगदीं नीच मनुष्य होत! त्यांमध्यें मनुष्यपणाच नसतो म्हटल्यास चालेल. त्यांना **ईश्वर** हा एक अजस्र प्राणी आहेसा वाटतो. त्याच्या हातांत एक दंड व चाबूक आहे, व ते जर त्याची आज्ञा न पाळतील तर तो चाबूक त्यांच्या पाठीवर बसेल ही त्यांची भित्रेपणाची कल्पना असते! शिक्षेच्या भयानें **ईश्वराचें** पूजन करणें हा अगदीं कनिष्ठ मार्ग होय. अशा तऱ्हेचें पूजन हें भक्तीचें अगदीं अडाणी स्वरूप आहे. जेथें भयाचा लेश तरी आहे, तेथें प्रेम तरी कसें उद्भवेल? प्रेम हे साहजिकच भयापेक्षां उच्च प्रतीचें आहे. एखादी तरुण लेकुरवाळी रस्त्यानें जात असतां, जर एखादा कुत्रा तिच्या आंगावर धांवून आला तर ती भिऊन जाते, व आसपासच्या एखाद्या घराचा आसरा धरते. पण तीच आपलें मूल कडेवर घेऊन रस्त्यानें जात आहे असें समजा, आणि कुत्राचसा काय पण प्रत्यक्ष पंचानन येऊन त्याला त्या मुलावर उडी घालूं द्या, मग ती आई कोठें असेल असे तुम्हांस वाटतें बरें? अर्थात् काळाच्या दाढेप्रमाणें जो तो सिंहाचा विक्राळ जबडा, तेथेंच ती दृष्टीस पडेल. प्रेमामुळें तिची भयाची कल्पना सर्व विलयास गेलेली असते! भयाच्या मुळाशीं एक प्रका-

रचा द्वैतभाव असतो. म्हणजे जग निराळें व आपण निराळें ही त्याची मूळ कल्पना होय. जितकी जितकी माझी स्वतःविषयींची कल्पना अगदीं लहान प्रमाणाची —संकुचित—असेल, व जितकें जितकें त्यांत आपस्वार्थीप-णाचें वारें जास्त असतें, तितकें तितकें माझें भय अधिक असावयाचें! ह्या प्रचंड जगदुद्धींत आपण एका खस-खसीच्या दाण्याप्रमाणें आहों, अशी कल्पना असेल तर त्या मनुष्यास भय कसलें तें मुळींच वाटणार नाहीं, आणि आपण या अकटोविकट विश्वांतील एक रजःकण आहों, ही समजूत जसजशी बुजत जाईल, तसतसें भय दुणावत जातें. भीतीचा एक बिंदु जरी मनांत असला, तरी तो प्रेमाच्या आड येईल. प्रेम व भय ह्या दोन्ही भावनांचें एके ठिकाणीं कधींही पटावयाचें नाहीं. भक्तांस ईश्वराची भीति मुळींच कामाची नाहीं. 'ईश्वराचें नामोच्चरण व्यर्थ करूं नये.' अशी जी बायबलांत आज्ञा आहे ती ऐकून भक्ताला हंसूंच येईल. भक्तिमार्गांत निंदा कशी असूं शकेल? जितकें जितकें आपण त्याचें नांव अधिक घेऊं, तितकें तितकें चांगलेंच. मग तें कोणत्याही रीतीनें कां घ्याना? कारण भक्ताचें त्याजवर प्रेम असतें, म्हणूनच तो त्याचें नांव घेत असतो.

भक्तित्रिकोणाचा तिसरा कोण म्हटला म्हणजे भक्तीचा —ध्यानधारणेचा किंवा ध्येय स्वरूपाचा—जो विषय[१] असेल,

१ येथें मूळांत आय्डीयल् ( Ideal ) हा शब्द आहे. हा सर्व प्यारिग्राफ संपेतोंपर्यंत हा एकच शब्द सारखा पुष्कळ ठिकाणीं आला आहे, व त्याचा अर्थही फार व्यापक आहे. आणखी मरा-

तो असा–इतका मनोरम–असला पाहिजे कीं, तोच एक साध्य करण्यांत भक्तांस आपल्या जिवाचें सार्थक वाटावें. कारण तो विषय असा नसल्यास त्यावर आपली भक्ति तरी कशी जडावी? कधीं कधीं ह्या विषयाची निवड बरोबर झालेली नसते. परंतु ज्या मनुष्याची त्यावर भक्ति जडते, त्यास तोच एक विषय जीव कीं प्राण वाटतो. एखाद्याला हें आपलें **ध्येयस्वरूप** अगदीं दुष्ट प्राण्यांतही आढळून येतें, व दुसऱ्या एखाद्याला तें उत्तम प्राण्यामध्यें आढळून येतें, तथापि त्या प्राण्यांशीं, अर्थात् त्याच्या जड-स्वरूपाशीं, त्यास कांहीं करावयाचें नसतें. त्यांची त्या आपल्या **ध्येयस्वरूपा**वर किंवा **काल्पनिक सर्वांगपरिपूर्ण वस्तूवर**मात्र भक्ति असते. मनुष्याचें अतिश्रेष्ठ **ध्येयस्व-रूप–मनोरम व सर्वगुणसंपन्न वस्तु**–काय जें, त्यालाच **ईश्वर** हें नांव आहे. शहाणा असो कीं मूर्ख असो; साधु असो कीं भोंदू असो; पुरुष असो कीं स्त्री असो; सुशिक्षित असो की अशिक्षित असो; सुसंस्कृत असो कीं प्राकृत

ठींत ह्याच अर्थाचा व ह्याच्या तोडीचा दुसरा शब्द नाहीं. कोणी कोणी आयडीयल् ह्याचा अर्थ 'विशिष्ट कल्पना' असा करितात. पण तो येथें बिलकुल जुळत नाहीं. याकरितां येथें त्यास आम्हीं अर्थानुरोधें काय शब्द योजिले आहेत, ते सांगून ठेवतों. ध्यान-धारणेचा विषय, ध्येयस्वरूप, काल्पनिक सर्वांगपरिपूर्ण वस्तु, कल्पनेनें बनविलेला पुतळा, प्रेमस्वरूपविषय, आराध्यदैवत, मनो-रम व सर्वगुणसंपन्न वस्तु, आणि ध्येय किंवा काल्पनिक परिपूर्ण स्वरूप, हे सर्व शब्द त्या एकाच शब्दाच्या अर्थास प्रतिबिंबात्मक म्हणून योजले आहेत.—(भा. क.)

असो; कसाही मनुष्य असला तरी, **ईश्वर** हेंच त्याचें अत्युच्च–हृदयंगम–**ध्येयस्वरूप** होय. सर्व शक्तिमत्तेच्या, भव्यपणाच्या, व सौंदर्याच्या सर्वोत्कृष्ट कला जेथें अगदीं 'मी मी' म्हणत एकवटल्या आहेत, किंवा जेथें त्यांची केवळ मूसच ओतली आहे, तोच तो **प्रेमस्वरूपविषय** किंवा **कल्पनेनें बनविलेला सर्वशक्तिमान् व सौंदर्यानें नखशिखांत ओतून काढलेला पुतळा–ईश्वर–होय.** ध्येयस्वरूप किंवा **काल्पनिक परिपूर्ण स्वरूप** काय तें हेंच होय. प्रत्येकाच्या मनामध्यें **ध्येयस्वरूपें** म्हणून साहजिकच कांहीं तरी असतात. किंबहुना मन हें कांहीं ध्येयस्वरूपावांचून असणें शक्यच नाहीं, असें म्हटल्यास कांहीं हरकत नाहीं. मनुष्याचा स्वभाव जो निरनिराळ्या रीतीनें व्यक्त होत असतो, तो तरी, हीं आपापलीं **ध्येयस्वरूपें,** ह्या नेहमींच्या व्यवहारांत व्यक्त करून दाखवावीं एवढ्याकारितां प्रत्येकाची जी झटपट चालत असते, तिचाच परिणाम होय. समाजांत हरहमेश ज्या निरनिराळ्या चळवळी जिकडे तिकडे चाललेल्या दृष्टीस पडतात, त्या सर्व तरी काय असतात? तर भिन्न भिन्न आत्म्यांचीं भिन्न भिन्न **ध्येयस्वरूपें** उन्नत होऊं लागून त्यांचींच तीं स्पष्ट रूपें बाहेर येऊं लागतात, असें म्हटलें पाहिजे. म्हणजे जें अंत–निदिध्यासाप्रमाणें चाललेलें–असतें, तेंच बाहेर यावयास पाहत असतें, आणि त्याचा जो परिणाम, तोच त्या चळवळी होत. मनुष्यसमाजांत ज्यांचा चिरकालिक परिणाम झालेला दिसतो, त्या शक्ती

म्हणजे सर्वांवर निरंतर सत्ता चालविणाऱ्या **ध्येयस्वरूपा**-चाच तो जोम होय. लाखों वर्षें झगडा केल्यावर जन्मांचे जन्म व्यर्थ घालविल्यावर मनुष्यास असें आढळून येतें कीं, आपल्या मनांतील **ध्येयस्वरूपा**प्रमाणें बाह्य स्थितींना रूपें देणें किंवा तदनुसार त्यांची रचना करणें, हें अगदीं व्यर्थ आहे. हें एकदांचें त्यास कळून चुकलें कीं तो आपलें **ध्येयस्वरूप** व्यक्त करून दाखविण्याचा नाद सोडून देतो, आणि **ध्येयस्वरूपाचें**च ध्यान कल्पून, त्याची अति प्रेमानें पूजा करूं लागतो. **ध्येयस्वरूप** ह्या दृष्टीनें जें हें **काल्पनिक परिपूर्ण स्वरूप** असतें, त्यांत लहान लहान प्रेमविषयांचाही समावेश होतो. प्रत्येक मनुष्यास हें कबूल केलेंच पाहिजे कीं, कामांधास आपलें प्रियपात्र शुद्ध कुब्जेचा अवतार जरी असलें, तरी तें रंभेहूनही अप्रतिम वाटत असतें.¶ आतां, तिऱ्हाईत मनुष्य

¶ इंद्राची एक कथा नेहमीं ऐकण्यांत येते, ती वरील विधानास अनुसरूनच असल्यामुळें येथें देतोंः—

इंद्रास एकदां आपल्या सभेंत अतिसुंदर लावण्यवती अप्सरा असल्याबद्दल फार आढ्यता वाटूं लागली. एके समयीं एक ऋषि इंद्रसभेंत गेला. त्यास इंद्र गर्वानें विचारूं लागला कीं, "महाराज! माझ्या सभेंत जशा सुंदर अप्सरा आहेत अशा भूमंडळावर कोठें आहेत काय?" ऋषि म्हणालाः—"हो! पृथ्वीवर तुझ्या अप्सरांची कांहींच किंमत नाहीं. चल, तुला प्रत्यक्ष अनुभव हवा तर दाखवितों." नंतर ते दोघेही पृथ्वीवर आले, व ऋषीनें एक गाढव व त्याची मादी एके ठिकाणीं चरत होतीं, तिकडे बोट करून, "त्या गाढवापुढें तुझी अप्सरा नेऊन उभी कर" म्हणून सांगि-

त्यानें प्रीतिपात्र बरोबर निवडलें नाहीं असें म्हणेल, परंतु कामरसिकास कुब्जा मुळींच दिसत नसून, शुद्ध अप्सराच दिसत असते. तेव्हां कुब्जा असो कीं अप्सरा असो, आपलीं प्रीतिपात्रें आपल्या ध्येयस्वरूपामध्यें बसविण्याचीं तीं केंद्रस्थानें होत. जन ज्याची साधारणतः पूजा करीत असतो, तें काय असतें? निस्सीम भक्ताच्या प्रेमभावानें फुलून गेलेल्या अंतःकरणांत जे सर्वव्यापक व सर्व ध्येयस्वरूपांचेंही ध्येयस्वरूप वसत असते, तें तर खास नव्हेच! स्त्रीपुरुषें सामान्यतः ध्येय कल्पून ज्याची ज्याची पूजा करितात, तीं तीं, त्यांचीं ध्येयस्वरूपें किंवा आराध्यदैवतें होत. प्रत्येक मनुष्य आपल्या स्वतःच्या ध्येयस्वरूपाचा आरोप बाह्य जगावर करतो, व नंतर त्याच जगाची आपण पूजा करीत असतो. दुष्ट मनुष्यांचा देवही दुष्ट व क्रूरच असतो! ह्याचें कारण तरी हेंच. कारण त्यांचेंच जें सर्वोत्कृष्ट ध्येयस्वरूप असेल, त्याचेंच ते पूजन करणार व ह्याचमुळें चांगल्या मनुष्याचें ध्येयस्वरूप किंवा ईश्वरकल्पना उदात्त असतें. इतर मनुष्याच्या ध्येयस्वरूपाहून त्याचें फारच निराळें—लोकोत्तर—असतें.

---

तळें, आणि पाहतात तों, तें गाढव त्या रंभेकडे ढुंकूनही पाहीना. त्यास आपली मादीच अप्रतिम वाटूं लागली. असो.

तात्पर्य काय कीं, कामी जनांस "कुब्जासुद्धां रंभेहून अप्रतिम वाटत असते."—(भा. क.)